# श्रीनामदेवमहाराज

आणि

## त्यांचे समकालीन संत.



ज. र. आजगांवकर

श्रीशिवछत्रपतिकुलभूषण

# श्रीराजाराम महाराज छत्रपति

जी. सी. आय्. ई.

**करवीर संस्थानाधिपति**

यांस

हा ग्रंथ, त्यांच्या परवानगीनें,

अत्यंत आदरपूर्वक

समर्पण करितों.

श्रीमन्महाराजसाहेबांचा नम्र सेवक,

**जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर,**

**ग्रंथकर्ता.**

# अनुक्रमणिका





# प्रस्तावना

जुन्या मराठी कवींचीं चरित्रें लिहून प्रसिद्ध करण्याचा हा उद्योग मी आज सुमारें २५ वर्षें करीत आहें व ईश्वरकृपेनें आतांपर्यंत या ग्रंथाचे आठ भाग ( सुमारें २५०० पृष्ठें ) छापून प्रसिद्ध करण्यास मी समर्थ झालों हें त्या संतांच्याच कृपाप्रसादाचें फळ होय. ह्या ग्रंथाची उपयुक्तता विद्वान् लोक आतां प्रांजलपणें कबूल करूं लागले आहेत हें येथें नमूद करण्यास मला आनंद वाटतो. ' मराठी ज्ञानकोशा ' सारख्या प्रमाण-ग्रंथांतील बहुतेक सर्व जुन्या मराठी कवींचीं चरित्रें महाराष्ट्र कविचरित्रांतील लेखांच्या आधारानें लिहिण्यांत आलीं आहेत आणि पुणें मुंबईच्या कॉलेजांतील मराठीचे अध्यापक आणि अभ्यासक यांनीं मजपाशीं, " तुमच्या कविचरित्राचा आम्हांस फार उपयोग होतो, " अशी कबुली मोकळ्या मनानें दिली आहे. आपण इतके परिश्रम करून लिहिलेल्या ग्रंथाचा थोडा तरी उपयोग लोकांस होत आहे हें ऐकून कोणत्या ग्रंथकारास आनंद झाल्याशिवाय राहील ?

महाराष्ट्र कविचरित्राच्या या आठव्या भागांत प्रसिद्ध संतकवि आद्य नामदेव आणि त्यांचे समकालीन संत यांचीं शक्य तितकीं विस्तृत चरित्रें, त्यांच्या कवितेंतील निवडक वेंच्यांसह, आतांपर्यंत उपलब्ध झालेल्या सर्व माहितीचा उपयोग करून लिहिलीं आहेत. हीं चरित्रें लिहिण्याचे कामीं ज्या जुन्या नव्या ग्रंथांचें फार साहाय्य झालें त्यांची यादी येथें देतों:—

| | |
|---|---|
| नामदेवी गाथा | रा. मुळेकृत नामदेवचरित्र |
| निवृत्तिनाथांचे अभंग | सकल संतगाथा |
| भक्तविजय | श्रीज्ञानेश्वर महाराजांचा कालनिर्णय |
| भक्तलीलामृत | |
| संतलीलामृत | रा. ' पांडुरंग शर्मा ' यांचे लेख |
| रा. भावेकृत ' महाराष्ट्र सारस्वत. ' | भारत--इतिहास--संशोधक मंडळाचीं पुस्तकें |

जुन्या संतकवींचीं चमत्कारमय चरित्रें लिहिणाराच्या मार्गांत कोणकोणत्या अडचणी आहेत याचा बिलकुल विचार न करितां कांहीं अविचारी आणि एकांगी टीकाकार असल्या ग्रंथांवर इतकी कडक टीका करतात कीं तिच्या योगानें

पातळ कातडीचा एखादा नवशिक्या ग्रंथकार कदाचित् कायमचाच बुजून जावयाचा. अलौकिक चमत्कार ही एक मोठी नाजूक बाब आहे. कोणत्याही देशांतला कोणताही साधु घ्या, त्याच्या चरित्रांत एक दोन चमत्कार अगदीं हटकून आढळावयाचे; आणि आमच्या महाराष्ट्रीय साधुसंतांच्या चरित्रांत तर असल्या अलौकिक चमत्कारांचांच भरणा विशेष. बरें एखाद्या अर्वाचीन चारित्रकारास असले चमत्कार मान्य नसल्यामुळें त्यानें सगळ्या चमत्कारांच्या कथा गाळून कांहीं संतचरित्रें लिहिलीं तर आज शेंकडों वर्षें परंपरेनें चालत आलेल्या चमत्कारमय कथांच्या अभावीं, चमत्कारावर विश्वास ठेवणारा, किंबहुना, चमत्कार हेंच साधुत्वाचें एक प्रमुख लक्षण मानणारा महाराष्ट्रांतील बहुजनसमाज, तसलीं चरित्रें हातीं धरण्यास कधींही तयार होणार नाहीं. ज्ञानदेवानीं भिंत चालविली आणि रेड्याच्या मुखानें वेद बोलविले; चांगदेव वाघावर बसून आले आणि त्यांनीं सर्पाचा चाबूक केला; नाथांनीं स्वर्गांतील पितर जेवविले आणि पाषाणाच्या नंदीकडून कडबा खावविला; नामदेवांनीं दगडाच्या मूर्तीकडून अन्नग्रहण करविलें आणि मेलेली गाय जीवंत केली; तुकारामबुवांच्या अभंगांच्या वह्या इंद्रायणीच्या उदकांत तेरा दिवस सुरक्षित राहिल्या आणि स्वतः बुवा सदेह वैकुंठास गेले, या सर्व चमत्कारांवर बहुजनसमाजाचा पूर्ण विश्वास. या चमत्कारांचा बिलकुल उल्लेख न करितां वरील संतांचीं चरित्रें जर कोणी लिहिलीं तर कोणताही ग्रंथप्रकाशक असलीं चरित्रें फुकटावारीही छापण्यास तयार होणार नाहीं. बरें, चमत्कारांवर विश्वास न ठेवणाऱ्या पाश्चात्य विद्याविभूषितांकडून असल्या ग्रंथांस भरपूर आश्रय मिळण्याची अपेक्षा करावी तर ती पूर्ण होणें शशशृंगलाभाइतकेंच जवळ जवळ शक्य आहे! ज्या वर्गांतून असल्या प्रकारच्या ग्रंथांचे बेदरकार टीकाकार पुढें येतात त्या वर्गांत या ग्रंथांचा खप कमी व ज्या वर्गांतील लोकांत असले ग्रंथ मोठ्या प्रमाणावर खपतात त्या लोकांस परंपरेनें चालत आलेल्या अलौकिक चमत्कारांची मोठी आवड; अशा स्थितींत, या परस्परविरुद्ध समजुतींच्या लोकांस संतुष्ट करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ग्रंथकाराची अवस्था "म्हातारा आणि त्याचा बैल" या गोष्टींतील म्हाताऱ्याप्रमाणें कशी अनुकंपनीय होत असेल याची कल्पना सहृदय वाचकांनींच करावी. सगळेच अलौकिक चमत्कार सारखेच विश्वसनीय न मानणाऱ्या माझ्यासारख्या लेखकानें, वरील कारणास्तव, आपल्या ग्रंथांत चमत्कारकथांचा समावेश केला म्हणून त्याजवर कडक टीकेची आग पाखडणें म्हणजे आपल्या लोकांच्या

धार्मिक भावनाविषयींचें स्वतःचें अज्ञान प्रगट करणें होय. बहुजनसमाजाच्या अभिरुचीकडे लक्ष्य देऊन, ग्रंथ लिहितांना जें विशिष्ट धोरण ग्रंथकारास राखावें लागतें, त्यासंबंधानें अनुदारपणाची कठोर टीका करण्यापूर्वी, आणि बायाबापड्यांस फसविल्याचा आरोप ग्रंथकारावर करण्यापूर्वी, टीकाकारांनीं, उपरिनिर्दिष्ट अडचणींचा एकदां शांतपणें विचार करावा, अशी, सर्व संतचरित्रकारांच्या वतीनें, सर्व टीकाकारांस माझी नम्र विनंति आहे. त्याचप्रमाणें सगळ्या सुशिक्षित हिंदूंचे परमपूज्य परात्परगुरु कै. सर डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं प्रो. कोसंबी यांच्या ‘ बुद्धलीलासारसंग्रह ’ नामक ग्रंथावर अभिप्राय देतांना, चमत्कारांविषयीं जें स्वतःचें मत नमूद केलें आहे, तेंही या उथळ टीकाकारांनीं जरूर लक्ष्यांत ठेवावें. सरसाहेब म्हणतातः——

**“ कोणत्याही धर्माचे प्रवर्तक आणि तत्संबंधानें प्रसिद्धीस आलेले साधुपुरुष, यांनीं केलेल्या अद्भुत चमत्कारांविषयीं कथा त्यांच्या अनुयायांत प्रचलित असतात, आणि अनुयायी धर्मग्रंथांतही त्यांचा उल्लेख असतो; त्यांचा सर्वथा परित्याग करितां नये. कां कीं, त्यांत कधीं कधीं तथ्याचा अंश असतो; आणि तो नसला तरी त्या कथांच्या योगें अनुयायी वर्गाच्या मनाची स्थिति, आणि ज्या काळीं त्या कथा प्रवृत्तींत आल्या त्या काळच्या चालारीति, यांचें ज्ञान होण्यास त्या फार उपयोगी असतात. विवेचक बुद्धीनें तथ्यांश काढणें हें वाचणारांवरती सोंपविलें पाहिजे, आणि तें वाचणारास साध्य व्हावें म्हणून त्या सांग कथा त्यांच्या पुढें ठेविल्या पाहिजेत. ”**

कै. सर डॉ. भांडारकर हे हल्लींच्या एकेश्वरी पंथाचे एक आद्य प्रवर्तक आणि सगळ्या ‘ रॅशनॅलिस्टां’चे आदिगुरु होते, तेव्हां त्यांनीं व्यक्त केलेल्या वरील विचारांस, निदान त्यांच्या अनुयायांकडून तरी योग्य तें महत्त्व दिलें जाईल अशी आशा आहे.

चमत्कार कसे घडतात, याचें लांबलचक विवेचन करीत बसण्याचें हें स्थळ नव्हे, परंतु प्रसंगानुरोधानें दोन शब्द लिहितों. एकनाथ महाराजांनीं आपल्या भागवताच्या १५ व्या अध्यायांत सिद्धींचें विस्तृत वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरमहाराजांनींही ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांत योग्यास प्राप्त होणाऱ्या अमानुष सामर्थ्यांचें खुलासेवार वर्णन केलें आहे. संत हे अनंताच्या निदिध्यासामुळें, त्या अनंताशीं जसजसे साधर्म्य

पावूं लागतात तसतशी अनंताची ' कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुं ' ही शक्ति त्यांच्या अंगीं येऊं लागते. लोहचुंबकानें आकर्षिलेला लोहखंड जसा दुसऱ्या लोहखंडास आकर्षू शकतो, तसाच हा प्रकार आहे व या दृष्टीनें चमत्कारांचा विचार केला म्हणजे त्यांच्या शक्यते- विषयीं शंका घेण्याचें मुळींच कारण नाहीं. चालू काळांत देखील असले अलौकिक चमत्कार करणारे कितीतरी साधु व योगी या आर्यावर्तांत सांपडतील. गेल्या मार्च महिन्यांत मुंबईनजीक खार येथें शेट बालकिसनदास यांच्या घरीं श्री. देवजी महाराज या नांवाचे प्रसिद्ध योगी आले होते ते योगबलानें आपला देह आकुंचित करितां करितां अकस्मात् अदृश्य होतात. आज या विसाव्या शतकांत जर या गोष्टी प्रत्यक्ष घडत आहेत तर तीनशें वर्षांपूर्वीं तुकारामबुवा किंवा दोनशें वर्षांपूर्वीं सोहिरोबानाथ आंबिये हे सदेह गुप्त झाल्याच्या कथा खोट्या कां मानावयाच्या ? **पंतांनीं** स्पष्ट म्हटलें आहे, " कीं सतनु मुक्त झाला **योगाची सिद्धि** हे तुकारामीं." **निगडीकर रंगनाथ** स्वामीनींही " जडदेहा घेउनि वाणी गेला ती ऐका वाणी " या पद्यांत, स्वतःच्या समकालीन तुकारामबुवांच्या सदेह वैकुंठगमनाचा स्पष्ट खुलासा केला आहे.

ज्ञानदेव महाराजांनीं भिंत चालविली या चमत्कारावर विश्वास ठेवण्यास जे तयार नसतील त्यांनीं, इंग्लंडांतील ' फिशर अन्विन् ' या ग्रंथप्रकाशकानें " Cairvoyance and Materialisation " हा ग्रंथ वाचावा अशी त्यांना माझी विनंति आहे. या ग्रंथांत एम्. स्टेफन्स ओस्सोविएक्की नामक एका पोलिश ( पोलंडमधील ) इंजिनियरानें करून दाखविलेल्या अनेक अलौकिक चमत्कारांच्या कथा सप्रमाण आणि सचित्र दिलेल्या असून, त्यांत त्यानें केवळ आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर एक मोठ्या वजनाचा संगमरवरी दगडाचा पुतळा ८ फूट चालवून दाखविल्याची गोष्ट दिली आहे. १९०७ सालीं हिंदुस्थानांत येऊन गेलेल्या एका विद्वान् इंग्रजानें आपल्या प्रवासाची हकीकत प्रसिद्ध केली होती तींत त्यानें, बंगालमधील एका गांवीं, जमिनी- पासून एक हात उंचीवर अधांतरीं समाधि लावून बसलेल्या एका आंग्लविद्याविभूषित हिंदु योग्याची गोष्ट स्वनेत्रांनीं पाहून लिहिली आहे. त्याच सालीं, नासिक जिल्ह्यांत मालेगांव येथें एका जैन यतीनें कांहीं अलौकिक चमत्कार करून दाखविले होते व ते, अहमदनगरचे प्रसिद्ध वकील कै. बळवंत बाबाजी देशपांडे बी. ए. एल्एल्. बी. या प्रसिद्ध ' रॅशनॅलिस्ट ' गृहस्थानीं स्वतः आपल्या डोळ्यांनीं पाहिले होते. या चमत्कारांचें विस्तृत वर्णन पुणें येथील ' सुधारक ' पत्राच्या ता. १० मे १९०७ व ता. ३ जून १९०७ या दोन अंकांत त्यांनीं प्रसिद्ध केलें आहे. जमिनीवरचा

वरवंटा इच्छाशक्तीनें वर उचलून तो अधांतरीं ठेवणें, टेबल चालविणें, चौरंगाकडून छत्री आणविणें व दोन गांवांत किती मैल अंतर आहे तो आंकडा त्याच चौरंगाकडून ठोके मारवून वदविणें वगैरे अनेक चमत्कार, मालेगांवचे त्या वेळचे मामलेदार, मुन्सफ, कै. देशपांडे वगैरे अनेक सुशिक्षित लोकांसमोर सदर जैन यतींनीं करून दाखविले होते, व आजही, शोध केल्यास असले चमत्कार करून दाखविणारे शेंकडों सत्पुरुष या भरतखंडांत खात्रीनें सांपडतील. परंतु मुद्दाम या प्रश्नाच्या मुळाशीं जाऊन त्याचा खरेखोटेपणा पडताळून पाहण्याचा प्रयत्न करतो कोण ? आपल्या बुद्धीस पटत नाहींत इतक्याचसाठीं " हें सर्व झूट आहे " असें ठाम मत ठोकून देणारेच फार ! असो. क्षुद्र मनुष्यप्राण्याच्या सकुंचित बुद्धीस पटत नाहींत इतक्याचसाठीं सर्वच चमत्कारांच्या कथा खोट्या आणि अविश्वसनीय मानणें आणि त्या प्रश्नाचा पायाशुद्ध रीतीनें अभ्यास न करितां, चमत्कारांवर विश्वास ठेवणाऱ्या लोकांचा उपहास करणें म्हणजे विश्वांतील सर्वच गोष्टींचें आकलन करण्यास, त्या विश्वांतला एक क्षुद्र जीव जो मानवप्राणी त्याची बुद्धि पूर्ण समर्थ असून तिला अगम्य असें कांहींच नाहीं, असें मानून, स्वतःची फसवणूक करून घेणेंच होय, असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें असो.

हें नामदेवचरित्र लिहिण्याच्या कामीं ज्या अनेक ग्रंथांचा व लेखांचा मला उपयोग झाला त्यांची यादी या प्रस्तावनेच्या आरंभीं मी दिलीच आहे. त्यांतल्या त्यांत नामदेवी गाथ्यांत छापलेलीं नामदेवचरित्रविषयक प्रकरणें, तीर्थावळी, ज्ञानदेवादि चार भावंडांच्या समाधीचे अभंग वगैरे प्रकरणांचाच, प्रस्तुत ग्रंथास मुख्य आधार असून, त्याच्या खालोखाल महीपतिकृत ' भक्तविजय ' व ' संतलीलामृत ' या दोन ग्रंथांचा उपयोग झाला आहे. उपरिनिर्दिष्ट अभंगबद्ध प्रकरणें खुद्द नामदेवांनींच लिहिलेलीं आहेत असा बहुतेक लोकांचा पूर्वापर समज आहे व मलाही पूर्वीं तसेंच वाटत होतें. परंतु या सर्व अभंगांचा सूक्ष्मदृष्टीनें बरेच दिवस अभ्यास केल्यावर मला असें वाटूं लागलें कीं हे अभंग जरी पुष्कळच प्राचीन आहेत, तरी ते खुद्द नामदेवांनीं लिहिलेले नसून, त्यांच्याच हयातींत त्यांनीं सांगितलेल्या तोंडी माहितीच्या आधारानें पण स्वतः बरीचशी भर घालून त्यांच्या एखाद्या शिष्यानें—बहुतकरून परिसा भागवतानें—रचले असले पाहिजेत. या अभंगांची भाषा व रचनापद्धति पुष्कळच जुनी असून ज्ञानेश्वरींतले बरेच प्राचीन शब्द त्यांत आढळतात. कथानुरोधानें ज्या ज्या अभंगांत ज्याचें भाषण आलें आहे त्या त्या अभंगाच्या शेवटीं त्या त्या सत्पुरुषाचें नांव नमूद केलेलें

आहे. यामुळें, ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान, नामदेव, मुक्ताबाई, विसोबा खेचर, चांगदेव इत्यादि अनेक संतांचीं नांवें निरनिराळ्या अभंगांच्या शेवटीं सांपडतात. कांहीं अभंगांत पांडुरंग व रुक्मिणी यांचीं भाषणें दिलीं आहेत, त्या अभंगांच्या शेवटीं, 'पांडुरंग म्हणे ' किंवा 'रुक्माई म्हणे ' या शब्दांनीं त्यांच्याच नांवाचा निर्देश केलेला आहे. ज्या अभंगांत कोणाचेंही भाषण नसून नुसती कथाच आली आहे त्या अभंगांच्या शेवटीं कोणाचाच नामोल्लेख नाहीं. पडिभरें, चोहटा, दारवंठा, येरू, पोसणें[1], साबडें, आरूष, झणी[2], निडारले, पढियंते, कोमाइलें इत्यादि जुने शब्द व देवो, रावो, लक्षु, साक्षु, संभ्रमु, अवसरु, मतिहीनु, भावो वगैरे शब्दांचीं जुनीं रूपें यांची या अभंगांत रेलचेल आढळते. शिवाय केवळ काव्य या दृष्टीनें पाहिल्यास हे सर्व अभंग फार बहारीचे असून, त्यांत भक्ति, प्रेम, करुण इत्यादि रसांचा अगदीं पूर्ण उत्कर्ष झालेला दिसून येतो. कित्येक ठिकाणचीं भाषणें आणि वर्णनें इतकीं हृदयभेदक आहेत कीं तीं तीं स्थळें वाचतांना किंवा ऐकतांना सहृदय मनुष्यास अश्रुमोचन करणें अपरिहार्य झाल्याशिवाय राहणार नाहीं. असो. याविषयीं पुढें उपोद्घातांत आणखी लिहावयाचें असल्यामुळें, तूर्त या अभंगांच्या कर्तृत्वाचा प्रश्न येथेंच सोडून देणें भाग आहे.

या ग्रंथांत नामदेवांचें चरित्र विस्तारपूर्वक दिलें असून, ग्रंथाच्या शेवटच्या भागांत, तत्कालीन इतर संतकवींचींही चरित्रें त्यांच्या कवितेंतील निवडक उताऱ्यांसह, दिलीं आहेत. शिवाय खुद्द नामदेवांचे आणि त्यांच्या कुटुंबांतील मंडळींचे मिळून सुमारें २३१ निवडक अभंग दिलेले आहेत. ज्यांना ह्या सर्व संतांचे हजारों अभंग वाचण्यास सवड नसेल त्यांनीं निदान या ग्रंथांत दिलेले त्यांचे थोडेसें निवडक अभंग तरी अवश्य वाचावे, अशी त्यांना माझी नम्र विनंति आहे.

महाराष्ट्र कविचरित्राच्या मागील चार भागांच्या छपाईच्या बाबतींत कांहीं उदार स्त्रीपुरुषांकडून जशी मदत मिळाली होती तशी याही भागाच्या छपाईस अनेक स्त्रीपुरुषांकडून बरीच मदत मिळाली असून, **श्री. सर राजाराम महाराज छत्रपति,** सं० करवीर, यांजकडून प्रस्तुत भागाच्या छपाईखर्चासाठीं ५०० रु० ची रकम मिळालेली आहे. **बडोदें दरबारानें**ही याच कार्यासाठीं १५० रु. ची रकम मंजूर केलेली आहे. शिवाय, कविचरित्राच्या पुढील भागांच्या छपाईखर्चासाठीं **श्रीमन्महाराणीसाहेब, सं. धार यांनीं** १००० रु. दिले आहेत. **श्री. बाबासाहेब**

१ पालित, पाळलेला, या अर्थी. उदाहरणार्थ, " नामदेव माझ्या कृपेचें पोसणें. "
२ नकारार्थी; उदाह० " करिसी झणी ' म्हणजे करूं नकोस.

**इचलकरंजीकर** यांनीं आतांपर्यंत या कार्यास ४५० रु. ची मदत केलेली आहे. माझे परमपूज्य राज्यकर्ते **श्री. बापूसाहेब महाराज सरदेसाई, सं. सावंतवाडी,** यांनीं तर स्वतः पुष्कळच मदत केली असून इतरांकडूनही करविली आहे. या सर्व थोर मंडळीचे अत्यंत कृतज्ञतापूर्वक आभार मानण्यापलीकडे माझ्या हातीं काय आहे ? तथापि, ज्या संतांच्या सेवेसाठीं त्यांनीं ही मदत केली त्याच संतांच्या कृपाप्रसादानें ही सर्व मंडळी सुखी असो, अशी सदिच्छा अंतःकरणपूर्वक व्यक्त केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

ह्या ग्रंथांत माझें स्वतःचें असें कांहींच नाहीं, जुन्या ग्रंथांच्या आधारावर हा सगळा डोलारा उभारलेला आहे. " एकेक अक्षराची भीक । जीर्ण कवींतें मागोनि देख । मी सर्वज्ञ कविनायक । ऐसें म्हणविलें लौकिकीं, " असे उद्गार महाकवि मुक्तेश्वर यांनीं स्वतःच्या कवितेसंबंधीं जेथें काढले आहेत, तेथें माझ्यासारख्यानें स्वतंत्र ग्रंथरचनेची शेखी मिरविण्यांत काय हंशील आहे ? या ग्रंथांत कोणत्या उणीवा आहेत, कोणते दोष आहेत वगैरे गोष्टींची मला पूर्ण जाणीव आहे आणि म्हणूनच, " अन्यथा लिहिलें दिसेल ग्रंथीं । तें खोडोनि दूर करावें, " या मुक्तेश्वरांच्याच विनंतीचा मी येथें नम्रतापूर्वक अनुवाद करितों, आणि शेवटीं—

**आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥**
**साळुंकी ते कैसी बोले मंजुळ वाणी । शिकविता धणी वेगळाचि ॥**
**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥**
**तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांवीण ॥**

या अमृतमधुर प्रासादिक संतवाणीनें ही प्रस्तावना पुरी करितों.

मुंबई
ता. १४।५।२७

संतसेवक
**जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर**

---

# मोरोपंतकृत नामदेवस्तुति

## आर्या

श्री नारदमुनिचें जें सुमहद्व्रत तेंचि नामदेवाचें ।
याणें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें ॥ १ ॥
शतकोटि अभंग मुखें कविसत्तम हा सुखें वदे वाहे ।
पूजा न आठवूं दे लक्ष्मीचीही सुखेंच देवा हे ॥ २ ॥
भक्तिप्रताप लोकीं अत्यद्भुत याचि नामदेवाचा ।
परमप्रिय भक्तसखा कीं आम्हा आप्तकाम देवाचा ॥ ३ ॥
बाळपणींच म्हणे हा नामा श्रीविठ्ठलास जेव कसा ।
देव कसा उतरे जो त्याचा होतो स्वयेंचि सेवकसा ॥ ४ ॥
तो शुद्ध नामयाच्या जो गातो आदरें अभंगांतें ।
जें पातक जड इतरां श्रीगंगेच्या तसें न भंगांतें ॥ ५ ॥
परमेश्वरप्रसादें भक्तीं अत्यद्भुता वसे शुचिता ।
रुचि ताप हरी तीनहि न तदुक्ति ब्राह्मणास कां उचिता ॥ ६ ॥
किंबहुना नाम्याची भक्ता दासी जनी तिची वाणी ।
खाणी पातक आणी तरिच खळाच्याहि लोचनीं पाणी ॥ ७ ॥
ज्ञानेश्वर ने तीर्था विरहें चिंता अनामया लागे ।
प्रभु साधु श्रीस म्हणे मम मन विसरे न नामयाला गे ॥ ८ ॥
उद्धव अक्रूर प्रियभक्त श्रुतदेव बहु असे कोटी ।
परि याचि नामदेवीं प्रीति चरमबालकीं तसी मोटी ॥ ९ ॥
निर्जळ देशीं भरला अड घेतां स्मरुनि आळ या तृषितें ।
प्रभुनें तेंवि जपावें भक्तास जसें कृषीवलें कृषितें ॥ १० ॥
उठवी यवनपतिहता धेनु श्रीनामदेव मग तो बा ।
निज कर्ण पिळूनि म्हणे अति पश्चात्तप पापनग तोबा ॥ ११ ॥
झाला हा गुप्त महाद्वारीं जी प्रथम पायरी तींत ।
घालिति जडाहि याचे आपुलिया सदय पाय रीतींत ॥ १२ ॥
न करी जपोनि आंगें बळकट घालूनि काय कच्छ पर ।
त्या नामदेवजीचें श्रीविठ्ठल विश्वनायक च्छपर ॥ १३ ॥
एक जनी हरिभक्ता सिंप्याची हरि हरी म्हणे बटिक ।
तीस दळाया लागे भगवान् वदतील साधु कां लटिक ॥ १४ ॥
प्रभुतें तसेचि संत स्तविती सप्रेम नामदेवास ।
त्यासि मयूर म्हणे बा स्वप्रेमाचाचि लेश दे वास ॥ १५ ॥

# नामदेव.



## उपोद्घात.



**श्रीनारदमुनिचें जें सुमहद्व्रत तेंचि नामदेवाचें ।**
**याणें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें ॥**

मोरोपंत.

महाराष्ट्रांतील वारकरी संप्रदायाचा आद्य प्रवर्तक कोण या प्रश्नाचा स्पष्ट निर्णय जरी अद्याप लागलेला नाहीं तरी वारकरी पंथाचा मुख्य प्रमाणग्रंथ जी ज्ञानेश्वरी तिच्या कर्त्यापेक्षांही, पंढरपुराचें आणि पांडुरंगाचें माहात्म्य वाढविण्याच्या बाबतींत, नामदेवांनीं केलेली कामगिरी अधिक महत्त्वाची आहे, हें शिरोभागीं उद्धृत केलेल्या आर्येच्या " याणें प्रसिद्ध केलें विठ्ठल हें भव्य नाम देवाचें " या अर्धावरून उघड दिसतें. मोरोपंत हे पंढरपुरचे रहिवासी होते आणि " पांडुरंगाचें विठ्ठल हें भव्य नांव नामदेवानींच प्रसिद्ध केलें " ही त्यांनीं दिलेली माहिती, परंपरेनें चालत आलेल्या दंतकथांच्या आधारानेंच दिली असली पाहिजे यांत संशय नाहीं. " घालीन लोटांगण वंदीन चरण । डोळ्यांनीं पाहीन रूप तुझें ॥ प्रेमें आलिंगीन आनंदें पूजीन । भावें ओवाळीन म्हणे **नामा** " हा नामदेवांचा अभंग म्हटला गेल्याशिवाय महाराष्ट्रांतील कोणताही देवकार्योत्सव अद्याप पुरा होत नाहीं. तर, वारकरी संप्रदायांत आणि महाराष्ट्र वाङ्मयांत ज्या नामदेवांची येवढी योग्यता, त्यांच्या चरित्रांतली एकही गोष्ट आज अगदीं खात्रीलायक रीतीनें सांगतां येऊं नये ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? पण वस्तुस्थिति अशी आहे हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. जुन्या आणि नव्या ग्रंथकारांनीं आणि लेखकांनीं आपापल्या लिखाणांत या नामदेवचरित्राच्या बाबतींत इतकी धूळ उडवून दिलेली आहे कीं, तो सगळा धुरळा काढून टाकल्याशिवाय, नवीन लेखकास पुढें पाऊल टाकतां येणें बिलकुल शक्य नाहीं. अगोदर, एकंदर नामदेव किती झाले, येथूनच वादास सुरुवात होते. त्यानंतर मग

ज्ञानदेव आणि नामदेव हे समकालीन होते कीं काय ? विष्णुदास नामा हा कोण ? हल्लीं प्रसिद्ध असलेल्या नामदेवाच्या गाथ्यांतले सगळे अभंग एकाच नामदेवाचे कीं अनेक नामदेवांचे ? इत्यादि, एकाहून एक बिकट असे अनेक प्रश्न उत्पन्न होतात, आणि त्या सर्वांचा निकाल अगदीं निःसंदेह रीतीनें लावणें जवळ जवळ दुरापास्तच आहे. तथापि, नामदेवचरित्राविषयीं जी काय माहिती या घटकेस उपलब्ध आहे, तिच्या आधारानें, वरील सर्व प्रश्नांचीं यथामति उत्तरें या उपोद्घातांत देऊन, नंतर, नामदेवचरित्राकडे वळण्याचा विचार आहे.

नामदेवांच्या प्रसिद्ध गाथ्यांत, आत्मचरित्रात्मक अशीं कांहीं प्रकरणें आहेत, त्यांपैकीं एका प्रकरणांत, नामदेवांच्या बाळपणापासून त्यांच्या बऱ्याच मोठ्या वयापर्यंतच्या पुष्कळ गोष्टी विस्तारानें सांगितलेल्या आहेत. या प्रकरणांतील कांहीं अभंग नामदेवांचे, कांहीं गोणाईचे, कांहीं राजाईचे असे आहेत व त्या सर्वांनीं मिळून हें आत्मचरित्र लिहिलेलें असल्यामुळें तें सर्वथैव विश्वसनीयच असलें पाहिजे असें बहुतेक जुन्या नव्या लेखकांचें मत दिसतें. परंतु हें मत मला मान्य नाहीं. या “ आत्मचरित्रांत ” नमूद केलेली माहिती खोटी आहे असें माझें म्हणणें नाहीं, परंतु हें चरित्र खुद्द नामदेवांनीं लिहिलेलें नसून, त्यांच्याशीं समकालीन असलेल्या किंवा मागाहून कांहीं वर्षांनीं झालेल्या दुसऱ्या कोणी तरी मनुष्यानें लिहिलें असलें पाहिजे, अशी माझी समजूत आहे. ही समजूत होण्यास मुख्य कारण, सदर प्रकरणांतला पुढील अभंग होयः—

**माझें जन्मपत्र बाबाजी ब्राह्मणें ।**
**लिहिलें त्याची खूण सारू ऐका ॥**
**अधिक ब्याणव गणित अकरा शतें ।**
**उगवतां आदित्य रोहिणीसी ॥**
**शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार ।**
**प्रभव संवत्सर शालिवाहन ॥**
**प्रसवली माता मज मळमूत्रीं ।**
**तेव्हां जिव्हेवरी लिहिलें देवें ॥**
**शतकोटी अभंग करील प्रतिज्ञा ।**
**नाममंत्र खुणा वाचुनि पाहें ॥**
**ऐशीं वर्षें आयुष्य पत्रिका प्रमाण ।**
**नामसंकीर्तन नामया वृद्धि ॥**

या अभंगांत दिलेला नामदेवांचा जन्मकाल अगदीं बरोबर असेल व बाबाजी ब्राह्मणानें वर्तविलेल्या भविष्याप्रमाणें तंतोतंत ऐशीं वर्षें नामदेव जगले असतील, परंतु ' हा शतकोटी अभंग करील अशी प्रतिज्ञा देवानें याच्या जिव्हेवर लिहिली आहे, ' असें जें बाबाजी ब्राह्मणानें पत्रिकेंत नमूद केलें तें कोणत्या ज्योतिषशास्त्राच्या आधारानें ? आणि असली असंभाव्य गोष्ट नामदेवांनीं आपल्या अभंगांत नमूद करावी हें केवढें आश्चर्य ? नामदेवांनीं आपल्या वयाच्या २० व्या वर्षापासून, आपल्या कुटुंबांतील सर्व माणसांच्या मदतीनें, शतकोटी अभंगांची प्रतिज्ञा पुरी करण्यास सुरुवात करून आपल्या निधनकालापर्यंत, म्हणजे सुमारें ६० वर्षें, ही अभंगरचना अगदीं अस्खलित रीतीनें चालू ठेवली होती असें जरी गृहीत धरलें तरी, ती प्रतिज्ञा पूर्ण होणें शक्य होतें काय ? नामदेव आणि त्यांच्या कुटुंबांतलीं १४ माणसें मिळून रोज २०० अभंग रचीत असें आपण धरून चालूं; या हिशोबानें ६० वर्षांत फार तर ३० लक्ष अभंग रचून होतील. अशा स्थितींत शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा नामदेवांनीं केली होती असें म्हणणें किंवा त्या म्हणण्यावर विश्वास ठेवणें म्हणजे नामदेव अगदीं व्यवहारज्ञानशून्य होते असेंच समजणें होय. तेव्हां, ही शतकोटी अभंगांची गोष्ट बाबाजी ब्राह्मणानें नामदेवांच्या जन्मकालीं त्यांच्या जन्मपत्रिकेंतच नमूद केली होती असें ज्या अभंगांत म्हटलें आहे तो अभंग स्वतः नामदेवांनीं लिहिला असेल, असें मानण्याइतकी माझी श्रद्धाशीलता जाज्वल्य नाहीं, हें मी प्रांजलपणें कबूल करितों. शिवाय, हे शतकोटी अभंग लिहिण्यास कागद किती लागतील, शाई किती लागेल व त्या अभंगांच्या पोथ्या ठेवण्यास जागा किती लागेल, याचा विचार करावयास नको काय ? तर, दामशेटीस चंद्रभागेच्या कांठीं पडलेल्या एका शिंपल्यांत नामदेव सांपडले ही गोष्ट जशी मागाहून भाविकांच्या श्रद्धेनें बनविली तशीच ही शतकोटी अभंगांची कथा मागाहून कोणी तरी रचली असली पाहिजे हें अगदीं उघड आहे; व असली कथा ज्या अभंगांत सांपडते ते अभंगही मागाहूनच कोणीतरी लिहिलेले असले पाहिजेत हेंही तितकेंच उघड आहे. सगळ्या जुन्या मराठी कवींची जी कविता आज प्रसिद्ध आहे तिची संख्या देखील ३० लक्ष भरणार नाहीं, मग एकट्या नामदेवांनीं शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा करून, आपल्या हयातींत त्यांतले ९६ कोटी अभंग रचिले व उरलेले ४ कोटी अभंग तुकारामबुवांनीं पुरे केले, असल्या भाकडकथांवर कोण कसा विश्वास ठेवील ! अस्तु.

वरील अल्प विवेचनावरून येवढें सिद्ध झालें कीं, नामदेवांच्या गाथ्यांत जे ' आत्मचरित्रपर ' अभंग छापलेले आहेत ते खुद्द नामदेवांनीं लिहिलेले नसून, त्यांच्या

नामदेवांच्या अभंगांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, विसोबा खेचर, गोराकुंभार, चोखामेळा इत्यादि संतांचा उल्लेख आढळतो, यावरून हे सगळे संत समकालीनच होते, हें निःसंदेह रीतीनें सिद्ध होतें. आतां निवृत्तिनाथांची साक्ष पहा, तीही या गोष्टीस पोषक अशीच आहे—

## अभंग

आनंद सर्वांचा काला अरुवार ।
नामया साचार फुंदतुसे ॥ १ ॥
राही रखुमाई सत्यभामा माता ।
आलिया त्वरिता काल्यामाजी ॥ २ ॥
उचलिला नामा प्रेमाचें फुंदन ।
नुघडी तो नयन कांहीं केल्या ॥ ३ ॥
बुझावीत राही रखुमादेवी बाही ।
पीतांबर साई करी हरि ॥ ४ ॥
ज्ञानासी कवळू सोपानासी वरु ।
खेचरा अरुवारु कवळु देत ॥ ५ ॥
निवृत्ति पूर्णिमा भक्तीचा महिमा ।
नामयासी सीमा भीमातीरीं ॥ ६ ॥

२

तंव आनंदला हरि परिपूर्ण लोटला ।
मुक्ताई लाधला प्रेमकवळु ॥ १ ॥
चांगयाचे मुखीं घालीत कवळु ।
आपण गोपाळु दयासिंधु ॥ २ ॥
दिधलें तें तूं घेई पूर्ण तें होई ।
सप्रेमाचे डोहीं संतजन ॥ ३ ॥
नामया विठया नारया लाधलें ।
गोणाई फावलें अखंडित ॥ ४ ॥
राही रखुमाई कुरवंडी करिती ।
जिवें ओंवाळिती नामयासी ॥ ५ ॥
निवृत्ति खेंचर ज्ञानदेव हरि ।
सोपान झडकरी बोलाविला ॥ ६ ॥

३

नुघडुनियां दृष्टि नामा पाहे पोटीं ।
आनंदाची सृष्टि तया जाली ॥ १ ॥
घे रे नाम्या कवळु आनंदाचा होसी ।
तुजमाजी निवासी हरि आहे ॥ २ ॥
नामा पसरी मुख आनंदला तृप्त ।
कवळु पूर्ण भरित हरिराज ॥ ३ ॥
निवृत्तीनें सेविला कवळु हा हरि ।
तूंचि चराचरीं दिससी आम्हां ॥ ४ ॥

या तीन अभंगांत निवृत्तिनाथांनीं, ज्ञानदेव, विसोबा खेचर, नामदेव, चांगदेव, गोणाई, विठा, नारा, सोपान आणि मुक्ताबाई यांचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे व यांत विठा आणि नारा या नामदेवांच्या दोन मुलांचाही ज्या अर्थी उल्लेख आहे त्या अर्थी नामदेव त्या वेळीं वयानें बरेच मोठे होते हेंही उघड दिसतें. वरील संतां-शिवाय, सांवतामाळी, नरहरि सोनार, परिसा भागवत आणि जगमित्र नागा इतक्या संतांचा उल्लेख निवृत्तिनाथांनीं इतरत्र केला आहे.

आळंदी येथील ' पांडुरंग शर्मा ' नामक गृहस्थांनीं ' चित्रमय जगत् ' मासि-काच्या, आगष्ट १९२२ च्या अंकांत, ' ज्ञानेश्वर व नामदेव समकालीन होते काय ? ' या मथळ्याखालीं एक महत्त्वाचा लेख छापला आहे त्यांत त्यांनीं या प्रश्नाचा चांगल्या रीतीनें ऊहापोह करून, प्रसिद्ध गुर्जर साधु नरसी मेहता, यांच्या नामदेवविषयक कवितांच्या आधारानें, ज्ञानदेव व नामदेव हे समकालीन होते, ही गोष्ट सिद्ध करून दाखविली आहे. संवत् १४७० मध्यें, महारा-ष्ट्रापासून शेंकडों कोस दूर असलेल्या सौराष्ट्र ( काठेवाड ) देशांत, जुनागड येथें नरसी मेहता हे नामांकित भगवद्भक्त होऊन गेले. त्यांनीं ' हारमाळा ' नामक एक सुंदर काव्य गुर्जर भाषेंत लिहिलें आहे. नरसी मेहता यांनीं ५०० वर्षांपूर्वी लिहिलेल्या या काव्यांत महाराष्ट्र संत नामदेवांचा पुढीलप्रमाणें उल्लेख आढळतोः—

( पद ११ ) " **रामनुं नाम नामदेवे लीधूं तेनी मोइ जिवाडी गाय** "
( नामदेवानें रामाचें नांव घेतलें तों त्यानें मेलेली गाय उठविली. )
( पद ५३ ) " **ध्रुव अंबरीष प्रल्हाद बिभीषण नामा हाथले दूध पिला । असुर माहे हतो कबिर उद्धारियो नामानुं छापरुं आल्युं छाई** "

( देवा, तूं ध्रुवादिकांचे कोड पुरविलेस, नामदेवाचे हातून तर दूध प्यालास, यवनांत झालेला कबीर तोही उद्धरलास व नामदेवाच्या घराचें छप्पर शाकारून दुरुस्त केलेंस )

( पद ८२ ) " **नरसैयां नागर तूं अविधार। पूर्वे पंढरपुर मोझार। ब्राम्हणे आणी मर्तक गाय। लइ बांधी सुलतान सभाय॥ नामदेव गाय संजीवन करे। तो तुळसी-माळा कंठ धरे। ते नामदेवनी जिवाडी गाय। एवा समरथ वैकुंठराय॥** "

( हे नागर ब्राह्मणा नरसैयां, तूं अविचारी आहेस. हें पहा, पूर्वी पंढरपुरामध्यें मेलेली गाय ब्राह्मणानें सुलतानाच्या सभेंत नेऊन ठेवली. नामदेव तुलसीमाला धारण करितो ( म्हणजे तो भक्त ) तो ही गाय उठवील. ती नामदेवाची गाय उठविली असा हा वैकुंठराणा समर्थ आहे. " येणेंप्रमाणें 'हारमाळा' ग्रंथांतले उतारे देऊन 'पांडुरंग शर्मा' म्हणतात, " यांत नामदेवांच्या हातचें दूध देव प्याल्याचे, त्यांच्या घराचें छप्पर देवानें दुरुस्त केल्याचे व त्यांनीं जिवंत केलेल्या मृतगाईचे उल्लेख स्पष्ट आले आहेत. या सर्व पुराव्यावरून येवढेंच सिद्ध होतें कीं, नरसिंह मेहत्यांचे वेळीं नामदेवांची गणना साक्षात्कारी भक्तांत केली जात होती व त्यांची ख्याति दूरवरच्या प्रांतांतही पसरली होती. तिसऱ्या उताऱ्यांतील **पूर्वे** या शब्दावरून असें सिद्ध होतें कीं, नरसी मेहता व नामदेव यांस समकालीन तर म्हणतां येणार नाहींच, उलट नरसींच्या अगोदर बरींच वर्षें नामदेव समाधिस्थ झालेले असले पाहिजेत; त्याशिवाय त्यांचे विषयीं 'पूर्वे' ( पूर्वी ) असा शब्दप्रयोग नरसींच्या तोंडांत येणार नाहीं. नामदेव आपल्या वयाच्या ८० व्या वर्षीं अदृश्य झाले असें पुराकथाविद् सिद्धवत् मानीत आले आहेत. नामदेव व नरसैयां यांच्यांत निदान तीन पिढ्यांचें अंतर असल्याशिवाय, नामदेवांबद्दल नरसैयांच्या काव्यांत 'पूर्वे' असा पदप्रयोग होऊं शकत नाहीं. किमानपक्ष वीस वर्षांची एक पिढी धरली तरी, नरसैय्यांचे जन्माचे अगोदर निदान साठ वर्षें तरी नामदेव अदृश्य झालेले होते असें मानणें भाग आहे; व नामदेव अदृश्य झाले तेव्हां त्यांचें वय ८० वर्षांचें होतें. म्हणजे नरसैय्यांचा जन्म व नामदेवांचा जन्म यांत सुमारें १४० वर्षांचें अंतर येतें; व ज्ञानेश्वरांचें जन्मवर्ष व नरसैय्यांचा निश्चित झालेला जन्मकाल यांमध्येंही जवळजवळ तितकेंच अंतर राहतें. यावरून पाहतां नामदेव व ज्ञानेश्वर यांचा काल एक येतो. नरसिंह मेहता संवत् १४७० मध्यें जन्मल्याचें कै. इच्छाराम सूर्यराम देसाई आपल्या काव्यदोहनाच्या २४ व्या पानांत सिद्ध

करून दाखवितात. आज संवत् १९७८ आहे. म्हणजे नरसैय्यांचे जन्मास आज ५०८ वर्षें झालीं असें ठरतें. त्याचे अगोदर १४० वर्षें नामदेव झाले. म्हणजे नामदेवांस आज ६४८ वर्षें झालीं. त्याचप्रमाणें शके ११९७ * मध्यें ज्ञानेश्वरांचा जन्म झाला असें आज ग्राह्य मानलें जात आहे. आज शके १८४४ आहे. म्हणजे ज्ञानेश्वरांच्या जन्मास आज ६४७ वर्षें होतात. यावरून ज्ञानदेवांच्या व नामदेवांच्या जन्मकालांत दोन पांच वर्षांचें अंतर येतें व तितकें असल्याचें त्यांचे प्राचीन चरित्रगायक सांगतही आहेत. ”

‘ पांडुरंगशर्मा ’ यांनीं पुढें आणलेला वरील पुरावा ज्ञानदेव आणि नामदेव यांची जोडी फोडण्याचा प्रयत्न करणाऱ्या ‘ भारद्वाजा ’ दि लेखकांस अगदीं निरुत्तर करणारा आहे असें मला वाटतें. आतां, एक भाषेचा मुद्दा तेवढा शिल्लक राहिला. ज्ञानदेव आणि नामदेव हे जर समकालीन होते तर त्या दोघांच्या भाषेंत येवढी तफावत कां ? प्रतिपक्षीयांचा हा प्रश्न अगदीं समर्पक आहे यांत संशय नाहीं. ‘ पांडुरंग शर्मा ’ यांनीं आपल्या पूर्वनिर्दिष्ट लेखांत व कै. श्रीपति बुवा भिंगारकर यांनीं आपल्या ‘ ज्ञानेश्वर-कालनिर्णय ’ या निबंधांत या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु इतर भक्कम पुराव्यानें व विशेषतः ज्ञानदेवांचे बंधु आणि गुरु निवृत्तिनाथ यांनीं नामदेवांचा व नामदेवानीं निवृत्ति–ज्ञानदेवादिकांचा आपआपल्या कवितेंत स्पष्ट उल्लेख केलेला असल्यामुळें, ज्ञानदेव–नामदेवांचें समकालीनत्व जर पूर्णपणें सिद्ध होत आहे तर या भाषेच्या मुद्दयाची फारशी मातब्बरी नाहीं असें मला वाटतें. शिवाय नामदेवांची भाषा, ज्ञानदेवांच्या भाषेहून सोपी व अर्वाचीन दिसते म्हणून जर नामदेवांस १४ व्या शतकांत ढकलावयाचें तर ज्ञानदेवांच्या भाषेपेक्षां मुकुंदराजांची भाषाही सोपी व अर्वाचीन असल्यामुळें त्यांनाही, आदिकवीच्या खुर्चीवरून उचलून चौदाव्या शतकांत कां ढकलून देऊं नये ? अस्तु.

आतांपर्यंत केलेल्या अल्प विवेचनावरून, वाचकांची खात्री होईल कीं, ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानदेव आणि प्रसिद्ध संत नामदेव हे समकालीन होते. आतां ‘ नामदेव ’ या नांवाचे साधु आणि कवि महाराष्ट्रांत एकंदर किती होऊन गेले या प्रश्नाचा थोडक्यांत विचार

* हा ज्ञानदेवांचा जन्मशक खरा धरल्यास शके १२१२ त ज्ञानेश्वरी पुरी झाली त्या वेळीं ज्ञानदेव १५ वर्षांचे होते व त्यांनीं १४ व्या वर्षींच ज्ञानेश्वरीच्या रचनेस प्रारंभ केला असें मानावें लागेल! यापेक्षां, शके ११९३ हा दुसरा जन्मशक अधिक विश्वसनीय दिसतो. **ग्रंथकर्ता.**

करूं. प्रसिद्ध असलेल्या नामदेवाच्या गाथ्यांत कमींत कमी पांच नामदेवांची कविता सांपडतेः—

**१ ज्ञानदेवसमकालीन नामदेव.** निवृत्तिनाथांच्या अभंगांत याच्या नांवाचा उल्लेख आढळतो. बाकीच्या सर्व नामदेवांच्या कवितेहून याची कविता फार प्रेमळ व सरस असल्यामुळें, ती सहज ओळखून काढतां येते. याच्या कांहीं अभंगांत ‘ नामा ’ येवढाच नामोल्लेख असून, कांहीं अभंगांत ‘ केशवाचा नामा ’ व ‘ विष्णुदास * नामा ’ अशींही नांवें आढळतात.

**२ विष्णुदास नामा.** याचें ओवीबद्ध महाभारत प्रसिद्ध आहे. शिवाय, एकादशी-माहात्म्य, तुलसीमाहात्म्य, उपमन्यूची कथा वगैरे याचीं अनेक ओवीबद्ध फुटकळ प्रकरणें आहेत. गाथ्यांतील अभंगांत याचेही थोडेबहुत अभंग असण्याचा संभव आहे. याची भाषा सुमारें तीनशें वर्षांपूर्वीची जुनी दिसते. केंदूर येथील कान्हो पाठकांच्या घराण्यांत **नामा पाठक** या नांवाचा एक संतकवि होऊन गेलेला असून, जैमिनी अश्वमेधावर त्याचा एक प्राकृत ओवीबद्ध ग्रंथ आहे. महाभारतकर्ता विष्णुदास नामा हाच नामा पाठक असावा अशी अनेक कारणांमुळें माझी ठाम समजूत झाली आहे. विष्णुदास नामाकृत महाभारताच्या कांहीं हस्तलिखित प्रतींत, कर्त्यानें स्वतःचा

* यासंबंधानें, ‘ महाराष्ट्र सारस्वत ’ कर्ते कै. विनायकराव भावे यांनीं आपल्या सदर ग्रंथांत आपलें मत येणेंप्रमाणें नमूद केलें आहे. “ मात्र त्या ( नामदेवाच्या ) गाथ्यांत नामा विष्णुदासाचे आलेले अभंग कदाचित् दामाशेटीचा मुलगा जो नामदेव त्याचे असूं शकतील; व भारतांतील ‘ नामा ’ म्हणजे ‘ नामा विष्णुदास ’ हाच असूं शकेल. ‘ नामदेव ’ व ‘ नामा विष्णुदास ’ या दोहोंत स्पष्ट फरक असा आहे कीं, एक ज्ञानेश्वराचा समकालीन होता व दुसरा ज्ञानेश्वरानंतर दोन अडीचशें वर्षांनीं होऊन गेला. तसेंच पहिल्याचा गुरु निःसंशय ‘ विसोबा खेचर ’ व दुसऱ्याचा ‘ चिंतामणि ’ होय. या दोघांचेही अभंग आहेत, पण ते इतके मिसळून गेलेले आहेत कीं, त्यांतून कोणता अभंग कोणाचा हें ठरविणें जवळ जवळ अशक्य झालें आहे. शिवाय ‘ विष्णुदास ’ या शद्बानेंही बराच घोंटाळा झालेला असावा. साधारणतः सर्व कवि आपणास प्रेमभरांत, ‘ विष्णुदास ’ म्हणतात. त्या ठिकाणीं आपलें स्वतःचें नांव ‘ विष्णुदास ’ असें सुचविण्याचा त्यांचा भाव केव्हांही नसतो. भारतकार ‘ विष्णुदास नामा ’ व स्वतःस सहजगत्या ‘ विष्णुदास ’ म्हणविणारा ज्ञानेश्वरसमकालीन भक्त नामदेव यांच्या नामसादृश्यामुळें अजाण लेखक फसून जाऊन घोंटाळा वाढला यांत संशय नाहीं. ” रा. भावे यांचा हा अभिप्राय अगदीं शब्दशः बरोबर आहे.

उल्लेख ' नामा पाठकु ' या नांवानें केलेला आढळतो, ही गोष्ट या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. " येई हो विठ्ठले माझे माऊलीये " ह्या प्रसिद्ध व लोकप्रिय पद्याचा कर्ता हाच नामदेव असावा असें वाटतें. ' आलिया गेलिया हातीं धाडीं निरोप । पंढरपुरीं आहे माझा मायबाप, ' असे उद्गार, खुद्द पंढरपुरांतच वास्तव्य करणाऱ्या, ज्ञानदेवसमकालीन नामदेवाच्या तोंडून येणें शक्य नाहीं.

**३ बालक्रीडाकर्ता नामदेव.** याचे बालक्रीडेचे अभंग फार गोड आहेत, पण त्यांची भाषा बरीच अर्वाचीन दिसते. यानें आपल्या एका अभंगाच्या शेवटीं, " नामा मनीं आठवी खेचरचरण । तयाचे कृपेनें सिद्धी जावो, " असा विसोबा खेचरांचा उल्लेख केला आहे, व त्यामुळें हा विसोबा खेचराचा शिष्य ज्ञानदेवसमकालीन पहिला नामदेव असावा असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु ग्रंथारंभीं यानें शालिवाहन शकाच्या चौदाव्या शतकांत होऊन गेलेला ' बहिरा पिसा ' ऊर्फ ' बहिरा जातवेद ' ऊर्फ ' बहिरंभट ' याचा उल्लेख एका अभंगांत केला आहे ! तेव्हां, ज्ञानदेव समकालीन विसोबा खेचराचा शिष्य नामदेव, चौदाव्या शतकांतल्या कवीचा उल्लेख आपल्या कवितेंत कसा करील ? पण या ' बालक्रीडा ' कर्त्यानें, आपला गुरु या नात्यानें ' विसोबा खेचरा'चाही उल्लेख केला असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. अशा स्थितींत हें कोडें उलगडणें फार कठीण आहे व त्याच्या उलगड्याशीं प्रस्तुत विषयाचा फारसा संबंधही नाहीं.

**४ हिंदी कविता रचणारा नामदेव.** या नामदेवाची हिंदी कविता पुष्कळ आहे. कै. तुकाराम तात्या यांनीं प्रसिद्ध केलेल्या नामदेवी गाथ्यांत या नामदेवांचीं सुमारें १७५ पद्यें दिलीं आहेत. आश्चर्याची गोष्ट ही कीं, यांपैकीं कांहीं पद्यांत ज्ञानदेवकालीन नामदेवचरित्रांतल्या कांहीं कथा वर्णिलेल्या आढळतात. उदाहरणार्थ पुढील पद्यें पहाः–

( १ )

**दूध पिवो रे मेरे गोविंदराय ॥ ध्रु० ॥**
**काला बछेरा कपील गाय । दूध दुहावन नामा जाय ॥ १ ॥**
**सुन्नेका कछुवा दूधने भरिया । पिवो नारायण आगे धरिया ॥२॥**
**परवाकी मूरत दुध नहिं पीवत । शिर पछार पछार नामा रोवत॥३॥**
**ऐसा भक्त मैं कबहु न पाया । नामदेवनें देव हंसाया ॥ ४ ॥**

अर्थ—अरे माझ्या गोविंदराया, दूध पी. काळें वासरूं आणि कपिली गाय. दूध काढायाला नामा जातो. त्यानें सोन्याचा गडवा भरून दूध काढलें आणि देवाच्या मूर्ती-

पुढें धरून, तिला दूध पिण्याचा आग्रह तो करूं लागला. परंतु दगडाची मूर्ति दूध कशी पिणार ? म्हणून नामदेव आपल्या कपाळावर हात मारून रडूं लागला. मी असला भक्त कधीं पाहिला नाहीं. नामदेवानें देवासदेखील हंसविलें.

नामदेवचरित्राच्या कांहीं भागावर एखाद्या हिंदी कवीनें ही कविता केलेली दिसते.

( १ )

**हीन दीन जात मेरी पंढरिके राया ।**
**ऐसा तुमने नामा दरजी कायकू बनाया ॥ १ ॥**
**टाळ विना लेके नामा देउळमें गया ।**
**पूजा करते ब्रम्हन उन्ने बाहिर ढकलाया ॥ २ ॥**
**देऊळके पिछे नामा अलक पुकारे ।**
**जिधर जिधर नामा उधर देउळही फिरे ॥ ३ ॥**
**नाना वर्ण गवा उनका एक वर्ण दूध ।**
**तुम कहाके ब्रम्हन हम कहाके सूद ॥ ४ ॥**
**मन मेरी सुई तन मेरा धागा ।**
**खेचरजीके चरनपर नामा शिंपी लागा ॥ ५ ॥**

या पद्यांत, नामदेवांनीं आंवढ्या नागनाथाचें देऊळ फिरविलें त्या कथेचें वर्णन असून, शेवटीं विसोबा खेंचराचाही उल्लेख केलेला आहे ! तेव्हां आतां ही हिंदी कविता, शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकांतल्या *नामदेवाची म्हणावयाची कीं काय ? मोठा बिकट प्रश्न आहे.

**५ नामा शिंपी.** हा तुकारामबुवांच्या पश्चात् झालेला एक सामान्य प्रतीचा कवि होय. यानें अनेक संतांचीं चरित्रें अभंगवृत्तांत वर्णिलीं आहेत. ‘ नामा ’ ‘ शिंपी नामा ’ व ‘ नामदेव ’ अशीं तीन प्रकारचीं नांवें यानें आपल्या कवितेंत घातलीं आहेत. असो.

यांशिवाय, आणखी एक महानुभाव पंथी नामदेव होऊन गेला असल्याचा उल्लेख, ‘ महिकावतीची बखर ’ या पुस्तकांत सांपडतो.

येथपर्यंत केलेल्या अल्प विवेचनावरून, दामशेटीचा मुलगा नामदेव हा सर्वांत जुना व पहिला नामदेव असून, ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेवाचा तो समकालीन होता हें सिद्ध झालें. महाराष्ट्रांत आज सहाशें वर्षें संत म्हणून ज्याची विशेष प्रसिद्धि आहे तो हाच नामदेव व त्याचेंच चरित्र या ग्रंथांत द्यावयाचें आहे. इतर नामदेवांशीं तूर्त आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं.

---

* नामदेव या नांवाचा एक हिंदी कवि उत्तरहिंदुस्थानांत पूर्वीं होऊन गेलेला असून त्याची कविता हिंदी काव्यसंग्रहांत छापलेली आढळते.

# श्रीनामदेवचरित्र.



## पूर्वार्ध.



### प्रकरण पहिलें.



**शिंपियाचे कुळीं जन्म मज झाला ।**
**परि हेतु गुंतला सदा शिवीं ॥ १ ॥**
**रात्रीमाजी शिवीं दिवसामाजी शिवीं ।**
**आराणूक जीवीं नाहीं माझ्या ॥ २ ॥**
**सुई आणि सातुळी कात्री गज दोरा ।**
**मांडिला पसारा सदा शिवीं ॥ ३ ॥**
**नामा म्हणे शिवीं विठोबाचे अंगीं ।**
**त्याचेनि मी जगीं धन्य झालों ॥ ४ ॥**

नामदेवांच्या ज्या आत्मचरित्राचा उल्लेख उपोद्घातांत केला आहे त्याच्या आरंभींचा वरील अभंग आहे. हें आत्मचरित्र खुद्द नामदेवांनीं व त्यांच्या कुटुंबांतील मंडळीनें लिहिलें आहे अशी आजपर्यंतच्या लेखकांची समजूत दिसते, परंतु ज्या कारणांमुळें मला ही समजूत चुकीची वाटते तीं कारणें उपोद्घातांत मी दिलेलीं असल्यामुळें त्यांची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. तथापि नामदेवांचें हें जुन्यांतलें जुनें चरित्र असल्यामुळें, योग्य तेवढें महत्त्व त्याला केव्हांही दिलेंच पाहिजे व म्हणूनच त्यांतील माहितीचा उपयोग प्रस्तुत चरित्रलेखनाच्या कामीं यथाप्रसंग अवश्य केला जाईल. याशिवाय ' **नामदेवकृत आदि व वंशावळि** ' या नांवाचें एक प्रकरण असून त्यांत नामदेवांच्या पूर्वजांचा सविस्तर वृत्तांत दिलेला आहे असें **मुळेकृत** नामदेवचरित्रावरून समजतें, परंतु हें प्रकरण कोणत्याही विद्यमान नामदेवी गाथ्यांत सांपडत

नाहीं. तथापि **मुळे** यांनीं, त्या प्रकरणांतील सर्व माहिती आपल्या नामदेवचरित्रांत दिलेली आहे, आणि तीच सारांशरूपानें मी येथें देत आहें.

श्रीक्षेत्र कऱ्हाडनजीक कृष्णातीरीं **नरसी[1] ब्राम्हणी** या नांवाचें एक खेडें होतें, तें नामदेवांच्या पूर्वजांचें मूळ ठिकाण होय, असें रा. मुळे यांनीं आपल्या पुस्तकांत लिहिलें आहे. परंतु इ. स. १९२६ त पुणें येथें भरलेल्या, भारत–इतिहास–संशोधक मंडळाच्या संमेलनांत, दक्षिण हैदराबाद येथील हायकोर्टाचे न्यायाधीश न्या. मू. केशवराव यांनीं अशी माहिती दिली कीं, " नामदेवाचें जन्मस्थान जें नरसी ब्राम्हणी तें मोगलाईतील परभणी जिल्ह्यांत आहे. तेथें नामदेवाची समाधीही[2] आहे. नामदेव औंढ्या नागनाथाच्या दर्शनास जात असे हेंही याच नरसी गांवाशीं जमतें. " न्या. केशवराव यांनीं दिलेली ही माहिती महत्त्वाची आहे. औंढ्या नागनाथाच्या दर्शनास वरचेवर जाणारा नामदेव कऱ्हाडानजीक रहात असेल, हें संभवनीय दिसत नाहीं. कारण औंढ्या नागनाथ हें स्थान मोगलाईत–कऱ्हाडपासून शेकडों मैल अंतरा-वर–आहे. तेव्हां परभणी जिल्ह्यांतलें नरसी ब्राह्मणी हेंच गांव नामदेवांचें जन्मस्थान होय, असें नक्की समजण्यास हरकत नाहीं. असो. या नरसी ब्राम्हणी गांवांत सुमारें ८०० वर्षांपूर्वीं **यदुशेट रेळेकर** या नांवाचा एक शिंपी रहात असे. तो कापड विकण्याचा धंदा करीत असे. त्याची स्त्री मोठी पतिव्रता होती. यदुशेट हा मोठा भगवद्भक्त आणि एकवचनी होता. तो अतिथि अभ्यागतांचा यथाशक्ति परामर्श घेत असे. पुढें त्यास एक मुलगा झाला, त्याचें नांव **हरिशेट.** तोही मोठा हरिभक्तिपरायण होता. त्याची बुद्धिमत्ता व भगवन्निष्ठा पाहून **चिमणशेट सोनटक्के** नामक गृहस्थानें आपली **वायजाबाई** नांवाची मुलगी त्यास दिली. इतर पुष्कळ लोक पंढरीस जातात हें पाहून हरिशेटही एकदां पंढरीस गेला. तेथील एकंदर सोहळा पाहून तो त्या ब्रह्मानंदांत इतका रमून गेला कीं,

१ कऱ्हाडनजीकच्या या नरसी ब्राह्मणी गांवास हल्लीं कोणी ' भयेनरसिंगपुर ' व कोणी ' कोळें नरसिंगपुर ' असें ह्मणतात, असें रा. मुळें यांनीं लिहिलें आहे.

२ नामदेवांनीं पंढरींत पांडुरंगासमोर समाधि घेतली अशी कथा जुन्या ग्रंथांत आहे व अद्यापही तेथें ' नामदेवाची पायरी ' हें स्थान प्रसिद्ध आहे; नामदेव हे जातीनें शिंपी असल्यामुळें त्यांस संन्यास व समाधि घेण्याचा अधिकार नव्हता, मग पंढरपुरांत त्यांची समाधि कशी ? कदाचित् त्यांच्या अस्थींवर ही पायरी उभारली असेल.

परत आपल्या गांवीं आल्यावरही, त्याला ध्यानीं मनीं स्वप्नीं पंढरीशिवाय कांहीं दिसेना! पुढें तो प्रत्येक आषाढी कार्तिकीचे वारीस पंढरीस जाऊं लागला. कांहीं दिवसांनीं त्याचा बाप यदुशेट हा एकाएकीं मरण पावला व त्याची बायको त्याजबरोबर सती गेली. आईबापांच्या वियोगामुळें हरिशेटास मोठें दुःख झालें. पुढें कांहीं दिवस गेल्यावर त्याला एक मुलगा झाला, त्याचें नांव त्यानें **गोपाळशेट** असें ठेविलें. गोपाळशेटाचें लहानपणीं थोडेंसें अध्ययन झालें होतें. पुढें तो १५ वर्षांचा झाल्यावर **गोपाळ माधवशेट कोरडे** नामक शिंपी गृहस्थानें **गंगाबाई** नामक आपली मुलगी त्यास देऊन त्याचें लग्न केलें. विवाहसमारंभ पुरा होतो न होतो तोंच **हरिशेट** यांची पत्नी **बायजाबाई** ही मरण पावली. त्याबद्दल **हरिशेटानें** फारसें दुःख न करितां आपला मुलगा गोपाळशेट यास व्यापाराची चांगली माहिती करून देऊन, स्वतः दुकान चालविण्यास सांगितलें. सुदैवानें **गोपाळशेट** याचा व्यापार चांगला भरभराटीस आला. पुढें, **गोपाळशेट** यास दोन वर्षांचे अंतरानें दोन पुत्र झाले. पहिल्याचें नांव **गोविंदशेट** व दुसऱ्याचें **रघुशेट. हरिशेट** याचा पंढरीच्या[१] वारीचा क्रम चालू होताच, परंतु तो वयोवृद्ध झाल्यामुळें आपल्यामागें हा क्रम कसा चालेल याची त्यास काळजी पडली. तेव्हां, "तुमच्यानें हा क्रम जितके दिवस चालवेल तितके दिवस तुम्ही तो चालवा, पुढें तो मी स्वतः चालू ठेवीन," असें आश्वासन **गोपाळ**शेटानें त्यास दिलें. तेव्हां म्हाताऱ्याची काळजी दूर होऊन त्यास बरें वाटलें. पुढें आषाढीची वारी जवळ आली तेव्हां मुलानें बापास विचारलें, "बाबा, तुम्ही जातां कीं मी जाऊं?" **हरिशेट** म्हणाला, "मी जरी आतां फार क्षीण झालों आहें, तरी येवढी एक वारी करावी अशी माझी फार इच्छा आहे. तेव्हां या खेपेस मीच जातों." इतकें बोलून, मुलाचा व सुनेचा निरोप घेऊन तो पंढरीस गेला. तेथें चंद्रभागेचें स्नान वगैरे करून, एकादशीच्या दिवशीं तो राउळांत गेला आणि देवास आलिंगन देऊन आणि चरणांवर मस्तक ठेवून म्हणाला, "देवा, आतां माझ्यानें येणें होणार नाहीं. शरीर फार क्षीण झालें आहे तरी आतां मला आपल्या चरणीं ठाव दे." इतकें बोलून त्यानें देवाच्या पायांस घट्ट मिठी मारली. तों, देवानें त्याची शेवटची विनंति ऐकून त्यास स्वस्वरूपीं मिळविलें.

---

१ वारकरी संप्रदाय ज्ञानदेव आणि नामदेव यांनीं सुरू केला अशी आपली आजपर्यंतची समजूत; पण वरील हकीकतीवरून, हा संप्रदाय फार जुना असला पाहिजे हें उघड दिसतें.

इकडे **गोपाळशेट** हा व्यापारांत आणि संसारांत इतका गढून गेलेला होता कीं, पंढरपुराहून आलेल्या वारकऱ्यांचे तोंडून बापाच्या मृत्यूची हकीकत ऐकून त्याला क्षणमात्र वाईट वाटलें येवढेंच. पण, तुमच्या पश्चात् मी पंढरीची वारी करीन असें जें बापास त्यानें वचन दिलें होतें तेंही त्यानें पाळलें नाहीं. लोकांनीं त्यास या गोष्टीची पुष्कळ वेळां आठवण दिली पण त्यानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. पुढें, कांहीं दिवसांनीं त्याची बायको **गंगाबाई** व धाकटा मुलगा **रघुशेट** हीं दोन दिवसांचे आंतच अकस्मात् मृत्यु पावलीं. त्यामुळें **गोपाळशेट** शुद्धीवर येऊन, बापास दिलेलें वचन आपण पाळलें नाहीं, त्याचा हा परिणाम, असें त्यास वाटलें; व पुढच्या वारीपासून पंढरपुरास जाण्याचा त्यानें निश्चय केला व तो पाळला. त्याचा वडील मुलगा **गोविंदशेट** हा वयांत आल्यावर **रेणुकजी भोंग** नामक गृहस्थानें आपली **रासाबाई** नामक मुलगी त्यास दिली. **गोविंदशेट** कामकाजांत हुशार असल्यामुळें **गोपाळशेटानें** दुकानाचें सर्व काम त्याजकडे सोंपविलें. पुढें कांहीं दिवसांनीं **गोविंदशेटास** एक पुत्र झाला, त्याचें नांव **नरहरशेट**. **नरहरशेटाच्या** मागून झालेल्या दुसऱ्या मुलाचें नांव **जिवाजीशेट** असें ठेविलें. हीं दोन्ही मुलें लहानपणापासूनच हरिभक्तीविषयींची आपली आवड व्यक्त करूं लागलीं. कांहीं दिवसांनीं **गोपाळशेट** मृत्यु पावला. त्याच्या पश्चात् पंढरीची वारी **गोविंदशेटानें** चालविली. **नरहरशेट** व **जिवाजीशेट** यांस **गोविंदशेटानें** त्या कालच्या पद्धतीप्रमाणें चांगलें शिक्षण दिलें होतें. पुढें एकदां दिवाळीचा सण आला तेव्हां **गोविंदशेटाचे** मनांत आलें कीं, आपण सर्व कुटुंबासह श्रीक्षेत्र पंढरीस जाऊन तेथील दिवाळीचा सोहळा पहावा; व कार्तिकीची वारी करून परत यावें. मग त्यानें आपल्या बायकोस या—संबंधानें विचारलें, तेव्हां धाकटा मुलगा **जिवाजी** याची प्रकृति नीट नसल्यामुळें तिनें पंढरीस येण्याचें नाकारलें व त्यालाही, तुम्ही जाऊं नका म्हणून सांगितलें. परंतु तिचें न ऐकतां, आपला थोरला मुलगा **नरहरि** यास बरोबर घेऊन गोविंदशेट पंढरीस गेला. तेव्हां, **रासाबाईचें** माहेर जवळच असल्यामुळें, धाकटा मुलगा **जिवाजी** यास घेऊन ती माहेरीं गेली व कांहीं दिवसांनीं तेथेंच एकाएकीं मृत्यु पावली. इकडे **गोविंदशेट** पंढरीहून परत आपल्या गांवीं आल्यावर त्याला ही हकीकत समजली तेव्हां तो आपल्या बायकोच्या माहेरीं जाऊन, **जिवाजी**स घरीं घेऊन आला. कांहीं दिवसांनीं त्यानें आपल्या दोन्ही मुलांची लग्नें केलीं. **नरहरशेट** यास **बुधाजी माणके** याची **लिंबाबाई** नामक मुलगी व **जिवाजीस पांढरकामे**

आडनांवाच्या एका गृहस्थाची **काशीबाई** या नांवाची मुलगी वधू केली. **नरहरशेट** यानें बापाबरोबर पंढरीचा सोहळा पाहिलेला असल्यामुळें त्याला त्या स्थलाची फार गोडी लागली. **गोविंदशेट** याजबरोबर तो मधून मधून पंढरीच्या वारीस जात असे. पुढें **नरहर** शेट यास एक पुत्र झाला, त्याचें नांव **दामशेट**. हा उग्रसेनाचा अवतार होता असें जुन्या ग्रंथांत लिहिलें आहे. **दामशेट** पांचसहा वर्षांचा झाल्यावर **गोविंदशेट** यास देवाज्ञा झाली. त्याच्या पश्चात् **नरहरशेट** यानें पंढरीच्या वारीचा क्रम पुढें चालविला. एका वारीच्या वेळीं ती सर्व मंडळी पंढरपुरास गेली असतां, द्वादशीच्या दिवशीं **नरहरशेट** व त्याची बायको **लिंबाबाई** यांची प्रकृति[1] एकाएकीं फारच बिघडली, तेव्हां वारी पुढें चालविण्याचें काम **दामशेटी**कडे सोंपवून त्यांनीं देह ठेवले. **दामशेटी**स मोठें दुःख झालें. पुढें तो आपल्या मामाच्या आग्रहावरून कांहीं दिवस आपल्या आजोळीं जाऊन राहिला. तेथून तो परत आपल्या गांवीं—**नरसी ब्रम्हणी** येथें आल्यावर, **कल्याणी**[2] येथील **गोविंदशेट सवदागरकर** याच्या **गोणाबाई** नामक मुलीशीं त्याचें लग्न झालें."

वर दिलेली नामदेवांच्या पूर्वजांची हकीकत, ज्या 'अभंगबद्ध' नामदेवचरित्राचा उल्लेख पूर्वी केला आहे, त्यांत दिलेली नाहीं. ही हकीकत **मुळेकृत** नामदेवचरित्रांतून येथें उतरून घेतली आहे. अभंगबद्ध नामदेवचरित्रांत दिलेली माहिती अशी आहे:— मोंगलाईंत **कल्याणी** नामक एक गांव आहे तेथें ( सुमारें ७०० वर्षांपूर्वी ) **गोमा** या नांवाचा एक हरिभक्त शिंपी रहात असे. त्याच्या पत्नीचें नांव **उमा**. तिला **नरहरी**ची उपासना होती. या उमेच्या पोटीं **गोणाई** नामक एक कन्या जन्म पावली. या गोणाईचें लग्न **नरसी ब्रह्मणी** नामक गांवच्या **दामशेटी** नामक शिंप्याबरोबर झालें. **गोमा** शिंप्याचें गोत्र विश्वामित्र व **दामशेटी**चें गोत्र भारद्वाज. लग्न झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं **गोणाई**स एक मुलगी झाली तिचें नांव **आऊबाई**. **दामशेटी** मोठा हरिभक्त होता. गांवाबाहेर एक देऊळ होतें तेथें जाऊन तो रोज निष्ठापूर्वक भजन करीत असे, व मूर्तीस नैवेद्य दाखविल्याशिवाय अन्नग्रहण करीत नसे. पुत्रप्राप्तीसाठीं **गोणाई**नें देवास नवस केला होता. पुढें कांहीं दिवसांनीं तिला एक

१ हा प्रकार बहुधा पटकीमुळें झाला असावा.

२ प्रसिद्ध संतकवि **शिवरामस्वामी** हे कल्याणी येथेंच राहत असत.

पुत्र झाला, तेच संतशिरोमणि **नामदेव** होत. ज्या कुलांतले **यदुशेटा**पासून पुढचे सर्व पुरुष महाभगवद्भक्त होऊन गेले, त्या कुलांत **नामदेवां**सारखा संतशिरोमणि निपजावा यांत कांहीं आश्चर्य नाहीं. महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व प्रसिद्ध संतांचे पूर्वज असेच भगवद्भक्त होते, ही गोष्ट **नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास** इत्यादिकांच्या चरित्रांवरून दाखवितां येईल. असो.

**नामदेवां**च्या जन्मकालाविषयीं पुढील अभंग प्रसिद्ध आहे—

**अधिक ब्याण्णव गणित अकराशतें । उगवतां आदित्य रोहिणीसीं ॥ शुक्ल एकादशी कार्तिकी रविवार । प्रभव संवत्सर शालिवाहन शक ॥**

बावाजी या नांवाच्या ब्राह्मणानें नामदेवांची जन्मपत्रिका तयार केली होती व तींत दिलेला जन्मकाल मूळ चरित्रकारानें वरील अभंगांत नमूद केला आहे. पण या जन्मकालांत एक दोष आहे तो हा कीं, शके ११९२ सालीं प्रभव संवत्सर येत नाहीं;

---

१ " **गोणाबाई**स देवानें एक शिंपला दिला व तो नऊ महिन्यांनीं आपोआप उघडेल असें सांगितलें. तो शिंपला जसजसा वाढत चालला तसतसें **गोणाईचें** पोटही मोठें होत चाललें. शेवटीं नऊ महिने भरतांच शिंपला उघडला तेव्हां त्यांत एक बालक सांपडलें, तेंच **नामदेव** होत, " अशी कथा मूळ नामदेवचरित्रांत वर्णिली आहे:—

**देवानें दिधलें शुक्तिकाकमळ । म्हणे उकलेल नववे मासीं ॥**
**भरतां नव मास गरोदरी दिसे । शिंपी वाढतसे आपोआप ॥**
**शुक्ति उकलितां प्रगटलें बाळ । गर्भचिन्हें सकळ मावळलीं ॥**
**नामदेव नाम ठेविलें घेतलें । पान्हा तये वेळीं फुटलासे ॥**

प्रसिद्ध संतचरित्रकार **महीपति** यांनींही ही शिंपल्याची गोष्ट आपल्या ग्रंथांत दिली आहे. परंतु **नामदेवांची** दासी **जनी** हिची साक्ष याविरुद्ध आहे. ती म्हणते, " शुद्ध देखोनियां भाव । **पोटा** आले नामदेव. " यावरून ' आत्मचरित्र ' नामदेवकृत नाहीं हें उघड सिद्ध होतें.

प्रमोद संवत्सर येतो. अर्थात्, येथें ' प्रभव ' हा पाठ ' प्रमोद ' च्या ऐवजीं लेखकाच्या चुकीनें पडला असला पाहिजे हें उघड आहे. यावरून, नामदेवांचा जन्म, कार्तिक शुद्ध ११ रविवार ( सूर्योदयीं, रोहिणी नक्षत्रीं ) शके ११९२ प्रमोद संवत्सर या दिवशीं झाला. याच सुमारास ( शके ११९० ) **निवृत्तिनाथांचा** व **ज्ञानदेवांचाही** जन्म ( शके ११९३ ) झाला होता.

---

१ यासंबंधानें, ज्ञानदेव–नामदेवांची जोडी फोडून नामदेवांस चौदाव्या शतकांत ढकलण्याचा प्रयत्न करणाऱ्या ' भारद्वाजा ' स कै. श्रीपतिबुवा भिंगारकर यांनीं दिलेलें उत्तर मननीय आहे. बुवा लिहितात, " गाथ्यांतील अभंगावरून नामदेव, शके ११९२, प्रभव संवत्सर, कार्तिक शुद्ध ११ रविवार रोजीं जन्मले असें होतें. यावर भारद्वाजाची अशी कोटी आहे कीं प्रभव संवत्सर ११९२ सालीं न येतां ११८९ सालीं येतो. तेव्हां हा ' प्रथमग्रासे मक्षिकापात ' पाहून भारद्वाज यांनीं जो पळ काढला तो थेट शके १३०९ पर्यंत नामदेवास त्यांनीं ओढून नेलें. पण या नामधारक भारद्वाजानीं असा विचार केला नाहीं कीं नामदेवाचा जन्मशक ११९२ सोडून देऊन त्या ठिकाणीं " अधिक ते नवगणित तेरा शतें ' १३०९ असा स्वकपोलकल्पित पाठ घालण्याचें धाष्टर्य बनावट दस्त ऐवजाप्रमाणें अन्य प्रमाणांनीं स्वतःच्या उपहासास मात्र कारण होईल. वरील अभंगांत शक, बार्हस्पत्य संवत्सराचें नांव, महिना, पक्ष, तीथ आणि वार अशा सहा गोष्टी दिल्या आहेत. पैकीं शकाचा आणि संवत्सराच्या नांवाचा मेळ बसत नाहीं म्हणून भारद्वाजानीं शके ११९२ पासून शके १३०९ पर्यंत ११७ वर्षांची उडी मारली; पण त्यानीं असा विचार केला नाहीं कीं शके १३०९ सालीं तरी कार्तिक शुद्ध ११ स रविवार येतो काय ? आम्हीं हें गणित करून पाहिलें आहे. त्यावरून असें सिद्ध झालें आहे कीं शके ११९२ सालींच कार्तिक शुद्ध ११ स रविवार येतो. शके १३०९ सालीं कार्तिकी ११ रविवारीं येत नाहीं. गणितानें जर ही गोष्ट सिद्ध आहे तर मग वरील अभंगांत शक चुकला आहे असें म्हणण्यापेक्षां प्रभव असें जें संवत्सराचें नांव तेंच हस्तदोषानें चुकीचें पडलें असावें असें अनुमान करावें लागत नाहीं काय ?........संप्रदायशुद्ध वारकरी लोकांच्या तोंडांत वरील अभंगाचा कोणता पाठ आहे याचा शोध करितां आम्हास असें समजलें आहे कीं " शुक्र एकादशी कार्तिकी रविवार । **प्रमोद** संवत्सर शालिवाहन शक " असा त्यांचा पाठ आहे. "

**श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा कालनिर्णय**, पृष्ठ ३-४.

**नामदेव** पांच वर्षांचे झाल्यावर, देवळांत जाऊन देवास नैवेद्य[1] दाखविण्याचें काम **दामशेटी**नीं त्यांजकडे सोंपविलें. त्याप्रमाणें पहिले दिवशीं **नामदेव** नैवद्य घेऊन देवळांत गेले व नैवेद्यास आणलेलें दूध पिण्याचा देवास आग्रह करूं लागले. पण दगडाची मूर्ति दूध कशी पिणार ? देव दूध पीत नाहीं हें पाहून लहानग्या **नामदेवांस** फार वाईट वाटलें. ते अगदीं निकरावर येऊन देवास म्हणाले, " देवा, तूं जर हें दूध पिणार नाहींस तर मी तुझ्या पायांवर डोकें आपटून जीव देईन. " हे धमकीचे शब्द ऐकून देव बिचारा घाबरला आणि त्यानें—त्या पाषाणमूर्तीनें—तो नैवेद्य निमूटपणें ग्रहण केला ! दुधाची रिकामी वाटी घेऊन **नामदेव** घरीं आले. **गोणाई**नें त्यांस विचारलें " बाळ, नैवेद्याचें दूध कुठें आहे ?" **नामदेव** म्हणाले, " देव दूध प्याला. " **गोणाई** म्हणाली, " चल, लबाड कुठला, दगडाचा देव कुठें दूध पितो काय ? तूंच तें प्याला असशील किंवा उपडी झालें असेल. " **नामदेव** म्हणाले, " नाहीं ग आई. मी खरें सांगतों, देव दूध प्याला. " हें ऐकून **गोणाईस** मोठें आश्चर्य वाटलें व तिनें ती गोष्ट **दामशेटीं**स सांगितली. त्यांनीं दुसरे दिवशीं **नामदेवांक**डे नैवेद्याचें दूध देऊन त्यांस देवळांत पाठविलें व स्वतः हळूच त्यांच्या मागून जाऊन काय प्रकार होतो तें पहात राहिले. पहिल्या दिवसाप्रमाणें याही दिवशीं देव **नामदेवांच्या** हातचें दूध प्याला. तो चमत्कार पाहून **दामशेट** अगदीं आश्चर्यचकित होऊन गेले व आपला मुलगा असामान्य असून तो पुढें मोठा हरिभक्त होणार असें त्यांस वाटलें.

---

१ " तांतडीच्या कामा दामशेटी गेला । नैवेद्य पाठविला नाम्या हातीं " हा एतद्विषयक अभंग महाराष्ट्रांत प्रसिद्धच आहे, पण त्याशिवाय आणखी एक अभंग **नामदेवांच्या** गाथ्यांत सांपडला, त्याचे कांहीं चरण येथें देतों:—

**" आम्ही हाटा जाऊं लवकरी येऊं । नैवेद्य पाठवूं नाम्याहातीं ॥**
**दुसरे दिवशीं नैवेद्य धाडिला । दामशेटी गेला त्याच्या मागें ॥**
**जाऊनियां नामा उभा राहे सन्मुख । म्हणे विठोबास जेवीं बापा ॥**
**देव म्हणे नाम्या बसावें द्वारांत । लवकरी जेवितों पाहीं आतां ॥**
**जेऊनियां देवें हातीं दिधली वाटी । तेव्हां दामशेटी काय बोले ॥**
**बारा वर्षे तुज उपवासी मारिलें । आजि जेवाविलें नामदेवें ॥**

२ ही मूर्ति कोणत्या देवाची आहे याचा, नरसी ब्राम्हणी गांवांत शोध करून, ती माहिती कोणी प्रसिद्ध करील काय ?

**महीपतीं**नीं आपल्या भक्तविजयांत नामदेव हे उद्धवाचा अवतार असें म्हटलें असून **नरहरिमालो**क्त भक्तकथामृत नामक ग्रंथांत त्यांस सनत्कुमाराचा अवतार असें म्हटलें आहे. " यद्वा नाम्नि देवो यस्य सः **नामदेवः** " अशी **नामदेव** या नांवाची उपपत्ति **मुळे**कृत **नामदेव**चरित्रांत दिली आहे.

वयाच्या पांचव्या–सहाव्या वर्षी नामदेवांनीं दगडाच्या देवाकडून दूध पिवविल्याचा जो चमत्कार पूर्वी वर्णिला आहे तो आज सहाशें वर्षें महाराष्ट्रांत सारखा प्रसिद्ध आहे. त्याच्या खरेखोटेपणाची शहानिशा करण्यास आपल्यापाशीं कांहींच पुरावा नसल्यामुळें, त्याचा नुसता निर्देश करूनच पुढें वळणें भाग आहे. त्या काळच्या पद्धतीप्रमाणें अगदीं अल्पवयांतच दामशेटींनीं नामदेवांचें लग्न करून दिलें व सुनेचें नांव ' राजाई ' ठेविलें. नामदेवांस बाळपणीं कितीसें शिक्षण मिळालें होतें हें समजण्यास जरी कांहीं मार्ग नाहीं तरी त्या कालच्या चालीप्रमाणें थोडेंबहुत लिहिण्यावाचण्यापुरतें शिक्षण त्यांस मिळालें असलें पाहिजे असें त्यांच्या कवितेवरून दिसतें. पुढें दुर्दैवानें नामदेवांस चोरांची संगत लागून ते वाटपाडेपणा करूं लागले. रस्त्यानें जाणाऱ्या वाटसरू लोकांवर हल्ला करून व प्रसंगीं त्यांना ठार मारून त्यांचें द्रव्य लुटून आणण्याचा क्रम त्यांनीं सुरू केला. अशा रीतीनें त्यांनीं शेंकडों ब्राह्मणांचे, तडीतापडी यांचे जीव घेतले. बाळपणीं पाषाणाच्या मूर्तीकडून केवळ आपल्या बालभावाच्या जोरावर ज्यांनीं दुग्धप्राशन करविलें त्यांच्याकडून तारुण्यांत हा वाटमारेपणाचा धंदा कसा घडला याचें कोणासही आश्चर्य वाटेल. दामशेटींनीं या दुष्कृत्याबद्दल त्यांची पुष्कळ कानउघाडणी केली. परंतु त्यांनीं त्यांस जुमानलें नाहीं. उलट असा प्रळय करून सोडला कीं, शेवटीं राजांस[१] त्या प्रकरणाची दाद घ्यावी लागली. त्यानें नामदेवांस पकडण्यासाठीं फौज पाठविली. परंतु त्या फौजेचा मोड करून व त्यांतले ८४ राऊत ( घोडेस्वार ) ठार मारून बाकीच्या फौजेस त्यांनीं सारनेटाकडे पळवून लाविलें. एका मोठ्या विशाळ घोडीवर बसून ते आपला वाटमारेपणाचा धंदा करीत असत. नामदेवांचा एक मात्र चांगला नित्यनियम होता तो हा कीं रोज आंवढ्या नागनाथाचें दर्शन घ्यावयाचें. एके दिवशीं दोन प्रहरीं ते नागनाथाच्या देवळांत दर्शनास आले आणि ब्राह्मणांकडून देवास त्यांनीं अभिषेक करविला. नैवेद्याच्या वेळीं, एक अनाथ शूद्र स्त्री आपल्या मुलास

---

१ मूळ चरित्रांत ' बाच्छायें ' ( बादशहानें ) असा शब्द आहे, परंतु त्या वेळीं दक्षिणेंत कोणी बादशाह नसल्यामुळें, हा शब्द चरित्रकाराच्या अज्ञानामुळें पडला असावा हें उघड दिसतें.

कडेवर घेऊन तेथें उभी असलेली नामदेवांच्या दृष्टीस पडली. देवापुढें ठेवलेला नैवेद्य पाहून, त्यांतला कांहीं नैवेद्य मागून घेऊन मला दे, असा त्या बाईच्या मुलानें हट्ट घेतला. तेव्हां ती त्यास मारूं लागली. तें पाहून नामदेवांचें मन कळवळून ते तिला रागें भरले. बाई म्हणाली, " नाम्या, मीं काय याला माझीं हाडें खायाला घालूं? राजानें वाटमाऱ्या लोकांवर जे स्वार पाठविले होते त्यांत माझा नवरा होता, तो चोरांच्या हातून मारला गेला." नामदेव नागनाथांच्या देवळांत नित्य नियमानें येत असल्यामुळें त्या बाईची व त्यांची ओळख होती, परंतु नामदेवही त्या चोरांपैकींच एक आहेत हें त्या बिचारीला काय ठाऊक? तिचें वरील भाषण ऐकतांच नामदेवांस फार वाईट वाटलें आणि मोठा पश्चात्ताप झाला. आपल्या हातून आजपर्यंत अशीं किती मुलें पोरकीं व किती स्त्रिया विधवा झाल्या असतील याची कल्पना मनांत उभी राहतांच त्यांचें मन त्यांना खाऊं लागलें. मूळच्या कोमल अंतः-करणावर, दुःसंगतीमुळें आलेलें क्रूरतेचें पटल पश्चात्तापाग्नीनें वितळून जातांच ते नागना-थापुढें हात जोडून उभे राहिले आणि सद्गदित चित्तानें म्हणाले, " हे शंभो, मी आतां काय करूं? " इतके कळवळ्याचे शब्द उच्चारून ते बाहेर आले आणि आपली घोडी आणि वस्त्रें त्यांनीं ब्राह्मणांस देऊन टाकलीं. नंतर हातीं सुरी घेऊन ते पुनः देवळांत गेले आणि ही मनाची टोंचणी माझ्यानें आतां सहन करवत नाहीं असें म्हणून आपल्या डोक्यावर त्यांनीं सुरी मारून घेतली! लिंगावर रक्ताची धार वाहूं लागली. तो भयं-कर प्रकार पाहून पुजारी धांवले आणि त्यांनीं नामदेवांच्या हातांतली सुरी काढून घेतली. डोक्यांतून बरेंच रक्त गेल्यामुळें, नामदेव देवद्वारीं पडून राहिले. त्यांच्या आत-ताईपणाबद्दल लोक त्यांचा उपहास करूं लागले. इतक्यांत नागनाथानें त्यांस असा दृष्टांत दिला कीं, "तूं आतां येथून पंढरीस जा. पांडुरंग तुझे दोष निवारण करून तुला पावन करील व पंढरींत तुझी मोठी कीर्ति होईल." अशी नागनाथाची आज्ञा होतांच, कांहीं यात्रेकरू पंढरपुरास चालले होते त्यांजबरोबर नामदेवही[1] तिकडे जाण्यास निघाले.

---

१ मूळ चरित्रकारानें दिलेलें या प्रसंगाचें वर्णनः—

**" यात्रेचे संगतीं नामा तो निघाला । मस्तक बांधिला आंवळोनी**
**माशांची घोंगाणी जनाची निंदणी । सोशी अंतःकरणीं नामदेव**
**आला पैल तीरा भरलीसे भिंवरा । अपार हे यात्रा उतरती**
**देवें भक्तां हातीं सांगुन पाठविलें । नामदेव आले घेऊं नका**
**परम पातकी अघोर चांडाळ । त्यासी माझे जवळ आणूं नका**

दाखविल्यावर त्यानें त्यांचा अंगीकार करून त्यांना पावन केलें. तेव्हांपासून नामदेवांची प्रपंचवृत्ति पार नाहींशी होऊन, त्यांनीं आपलें तनुमनधन पांडुरंगचरणीं वाहिलें; व पंढरींतच कायमचीं वस्ती केली. वरील सर्व हकीकत दामशेटींस कळतांच तेही आपल्या कुटुंबांतील सर्व मंडळींसह पंढरपुरास राहण्यास आले. त्या वेळेपर्यंत ते नरसी ब्रम्हणी येथेंच रहात असत.

**दामशेटीं**नीं नामदेवांचें लग्न त्यांच्या वयाच्या आठव्या वर्षींच **गोविंदशेट सदावर्ते** नामक गृहस्थाच्या **राजाबाई** नामक मुलीशीं करून दिलें होतें. हा लग्न-समारंभ मोठ्या थाटानें झाला. दिवसेंदिवस नामदेवांस परमार्थाची गोडी अधिकाधिक लागत चालली व पांडुरंगाचा एकनिष्ठ आणि अत्यंत प्रेमळ भक्त म्हणून संतमंडळांत त्यांची फार ख्याति होऊं लागली. त्यांच्या हातून चमत्कारही पुष्कळ घडले होते. आपल्या मुलाची ही पारमार्थिक वृत्ति पाहून हरिभक्त **दामशेटी** यांस कदाचित बरें वाटलें असेल, परंतु, नामदेवांची आई **गोणाई** हिला मात्र तो प्रकार फारसा आवडला नसावा असें वाटतें. आणि तसें होणें साहजिकच आहे. पुरुषांपेक्षां स्त्रियांस संसाराची आवड नेहमींच अधिक असते, आपल्या मुलानें चांगला उद्योग धंदा करून पुष्कळ पैसे मिळवावे, आपल्या सुनालेकींच्या अंगावर पुष्कळ दागदागिने असावे ही बहुतेक स्त्रियांची इच्छा असते, आणि या नियमास **गोणाबाई** अपवाद नव्हती. तिनें व नामदेवांची पत्नी **राजाई** हिनेंही, सगळा दिवस टाळ कुटण्याचें सोडून, संसाराकडे थोडें बहुत लक्ष्य देण्याविषयीं **नामदेवांस** परोपरीनें सांगून पाहिलें असलें पाहिजे असा ध्वनि कांहीं अभंगांतून निघतो.

पुढील अभंग पहाः—

**माता वाट पाहे नामा अझून कां नये। देखोन विठ्ठल**
**काये भुलला तेथें १ ऐसें मज पाहतां होंचि घडे साचें।**

---

**उच्छिष्टाचें शीत न देवा टाकिसि बाहेरी।**
**कोणी दिधली भगवंत तुला भूषणाचि थोरी ॥ ३ ॥**
**हातीं घेउनि झांगडझेंगा फिरेन त्रैलोक्यीं।**
**पतितपावन न होसि हरि तूं मोठा घातकी ॥ ४ ॥**
**नामा म्हणे देवा तुमचें न लगे मज कांहीं।**
**प्रेम असों या हृदयीं तुमचे आठवीन पाय ॥ ५ ॥**

विठ्ठलीं मन त्याचें गुंतलें असे २ काय सांगों माय जालं देवळासी । जपतो अहर्निशी विठ्ठलनाम ३ तहान भूक कांहीं आथीच ना मना । विठ्ठल विठ्ठल म्हणा हाचि छंद ४ नेणों कवण्या गुणें भुलविलें यातें । विंदान आमुतें न कळे कांहीं ५ दिशा अवलोकितां प्राण नव्हे निश्चित । बहुत क्षुधाक्रांत झाली असे ६ तेथून लवलाहें धांवत निघाली । महाद्वारा आली पहावया ७ तो तंव पांडुरंगासन्मुख देखिला । चित्रींचा लिहिला पुतळा जैसा ८ नाहीं चळणवळण तटस्थ नयन । केलें निंबलोण योगी जनीं ९ तें देखोनि मातेसी थोर द्वेष आला । क्रोधें आसुडिला करीं धरुनी १० तंव प्रेताचिये परी पडला भूमीवरी । देखोनि सुंदरी रुदन करी ११ मग उचलोनि ओसंगा धरिला पोटासी । म्हणे कां रे रुसलासी सांग नाम्या १२ निढळासी निढळ मिळवोनि ते रडे । माझिये कान्हाडे काय झालें १३ दृष्टि उघडोनि नामा भोंवतें जंव पाहे । तंव सन्मुख माये देखियेली १४ येरी उचलोनि दिधलें आलिंगन । झालें समाधान तये वेळीं १५ सुहृदें सोयरीं सकाळिकें मिळोनी । करिती झाडणी नानापरी १६ माऊली नव्हेसी तूं वैरिणी जाण । माझ्या केशवाची खूण अंतरली १७ शस्त्रेंवीण वध केला अवचिता । जीव तळमळतां जाऊं पाहे १८ आतां परतोनी माझी वाट पाहसी । साच रिपु होसी तरी जाण १९ नामा म्हणे माते जाईं हो येथूनि । मज जाईं निरवूनि विठोबासी २०

पंढरपुरीं नामदेव पांडुरंगदर्शनास गेले असतां, प्रभूचें तें त्रैलोक्यरमणीय रूप पाहून त्यांचें हृदय प्रेमातिरेकानें भरून आलें आणि तत्काळ तद्रूपता प्राप्त होऊन त्यांस समाधि लागली. या समाधींतून त्यांची माता गोणाई हिनें त्यांस जागृत केलें, त्या वेळीं त्यांच्या

मनाची जी स्थिति झाली तिचें वर्णन वरील अभंगांत, कवीनें फार चांगल्या रीतीनें केलेलें आहे.

नवमासवरी म्यां वाहिलासी उदरीं। आस केली थोरी होसी म्हणुनी ॥ १ ॥ शेखीं त्वां रे नाम्या ऐसें काय केलें। वनीं मोकलिलें निरंजनीं ॥ २ ॥ कां रे नामदेवा झालासी निष्ठुर। न बोलसी उत्तर मजसी कांहीं ॥३॥ सज्जन सोयरीं सांडियली लाज। झालासी निर्लज्ज एकसरां ॥ ४ ॥ प्रेमपिसें तुज लाविलें विठ्ठलें। रूप दाउनि केलें तद्रूप तुज ॥ ५ ॥ यासी सेविलिया कैंचीं बाप माय। सर्व हाचि होय सर्वां ठायीं ॥ ६ ॥ ऐशि-याचा संग धरियला तुवां। परिणामीं अनुभवा जाण-शील ॥ ७ ॥ संतसनकादिकां लावियेलें वेधीं। तिहीं संसार-उपाधि सांडियेली ॥ ८ ॥ विठ्ठल विठ्ठल हेंचि पैं चिंतन। विटेसहित चरण धरियेले ॥ ९ ॥ ऐसें शिकवितां नाम्याचें न मोहरे चित्त। पाहतसे तटस्थ तन्मय दृष्टी ॥१०॥ नामा म्हणे माते वायां कां कष्टसी। विठोबा जीवेंसी जडला जाण ॥ ११ ॥

जन्मासी येऊनि पराक्रम धरीं। कां होशी संसारीं भूमीभार ॥ १ ॥ आणिकांचीं मुलें संसारिक कैशीं। तूं मज झालासी कुलक्षण ॥ २ ॥ कैसी नाहीं तुज या लोकांची लाज। हेंचि तों मज नवल वाटे ॥३॥ अभि-मान अहंकार सांडोनियां जगीं। नाचतोसी रंगीं गीत गात ॥४॥ तुजहूनि लोक आहेती अज्ञान। न विसंबती क्षण मायबापा ॥५॥ याची कां रे तुवां धरियेली आस। हा तंव कवणास झाला नाहीं ॥ ६ ॥ यातें जे भजती त्यांचें नुरे कांहीं। हा देव नव्हे पाहीं घरघेणा ॥ ७ ॥ याचें नांव चक्रपाळ हा ब्रह्मादिकां अकळ। तो कैसा कृपाळ दीनालागीं ॥८॥ होणारासारिखी तुज रचिली बुद्धि। देव नव्हे त्रिशुद्धी मारकु जगीं ॥ ९ ॥ ज्याचें

हरिभक्तीचा संचार झाला असा वरील अभंगांत स्पष्ट उल्लेख आहे व **मुळे** आणि **महीपति** यांनीं या सर्व अभंगांचा उपयोग आपल्या ग्रंथांत केलेला आहे. अशा स्थितींत नामदेव हे तरुणपणीं वाटमारेपणा करीत असत, या गोष्टीचा उल्लेख त्या दोघांच्याही नामदेवचरित्रांत कसा झाला नाहीं याचें आश्चर्य वाटतें.

**जनिता जीवविता सर्वज्ञ प्रतिपाळिता। आडणीं सांभाळिता चराचरीं ॥ १ ॥ एक पांडुरंग दुजा नाहीं चांग। म्हणुनि याचा संग धरिला माते ॥ २ ॥ माझी तुज कांहीं करणें न लगे चिंता। मज आहे पोसिता पांडुरंग ॥ ३ ॥ हा शरणागतांचा जाणे कळवळा । हा पैं कळिकाळा पाहों नेदी ॥ ४ ॥ केले कोटिवरी न मानी अपराध। हें पैं साजे ब्रीद पांडुरंगा ॥ ५ ॥ आम्ही आपुल्या सुखें असों भलत्या ठायीं। प्रीति तया पायीं जडली असे ॥ ६ ॥ तेणें उपकारें न विसंबे क्षण। हातीं सुदर्शन घेउनि उभा ॥ ७ ॥ जाणतां नेणतां राम गावों गीतीं। जन्माची विश्रांति होय जेणें ॥ ८ ॥ ऐसें जीवलग होईल कैंचें आन। संचला परिपूर्ण सर्वां ठायीं ॥ ९ ॥ इष्टमित्र बंधु सज्जन सोयरा। माझिया संसारा हाचि एक ॥ १० ॥ नामा म्हणे माते मज न चले मोहोपिसें। तुम्हांसी मजऐसें होइल कई ॥ १२ ॥**

नामदेवांच्या या सडेतोड भाषणानें गोणाईची समजूत पडली नाहीं, आपल्या मुलास ‘ देवपिसें ’ लावून त्याला प्रपंचपराङ्मुख केल्याबद्दल पांडुरंगाबरोबरदेखील तिनें भांडण केलें. या भांडणाचा फक्त एकच अभंग नमुन्यादाखल येथें देतों:—

**माझा नामा जंव नामरूपासी आला । जों म्हणो लागला घरदार ॥ १ ॥ तंव कैसें विघ्न उदेलें गे माये। नामा पंढरिरायें भुलविला ॥ २ ॥ सांग बा विठ्ठला म्यां काय केलें। नाम्या कां भुलविलें कवण्या गुणें ॥ ३ ॥ आम्हीं गा शिंपीये अनाथें पैं दीनें। करूं शिवणें टिपणें पोट भरूं ॥ ४ ॥ त्यासी देवा तुवां आणियेला क्षयो। कैंचा आम्हां देवो निर्मिलासी ॥ ५ ॥ असतां**

**चराचर न बुडतां हे सृष्टि । कां ग घेसी पाठी दुर्बळाची ॥ ६ ॥ एक बाळ माझें धरिली त्याची आस । त्या कैसी निराश मांडियेली ॥ ७ ॥ दिसां मासां गर्भ जाणोनियां पोटीं । त्याची आस मोठी करिती लोक ॥ ८ ॥ एवढा माझा नामा कैसेन विसरेन । देई कृपादान दुर्बळासी ॥ ९ ॥ तूं अनाथा गोसावी दीनाचा कैवारी । तें ब्रीद श्रीहरि काय झालें ॥ १० ॥ विघडिलें पाडस करीं एके ठायीं । विनविते गोणाई केशीराजा ॥ ११ ॥**

**गोणाबाईनें** जेव्हां फारच डोकेफोड केली तेव्हां नामदेव तिच्याबरोबर देवळांतून घरीं आले. पांडुरंगानें त्यांना आईबरोबर घरीं जाण्यास सांगितलें असें मूळचरित्रकार लिहितोः—

**मग पंढरिनाथ म्हणे नामयासी । तूं जाई गोणाईसी घेऊनियां ॥ १ ॥ अतिशय कां इणें मांडिलासे फार । मातेसी निष्ठुर होऊं नये ॥ २ ॥ स्तनपान देऊनि मोहें पाळिलासी । अंतर तियेसी देऊं नये ॥ ३ ॥ नामा म्हणे शरण आलों जिच्या भेणें । तिचे हातीं देणें उचित नव्हे ॥ ४ ॥**

" आम्हाला तुझ्या नाम्याशीं काय करावयाचें आहे ? हा घे आपला नाम्या, " असें म्हणून देवानें **नामदेवांचा** हात धरून त्यांना **गोणाईच्या** स्वाधीन केलें. परंतु, गोणाईची थोडीशी गंमत करावी म्हणून देवानें नामदेवांस स्वतःचें रूप दिलें. मुलास हातीं धरून गोणाबाई घराकडे चालली असतां तिनें सहज नामदेवांकडे पाहिलें तों त्यांच्या जागीं तिला पांडुरंग दिसला ! त्याला पाहतांच बाईच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. ती म्हणाली, " अरे बाबा, तूं कोणाला हवा आहेस ? तुझी मला मुळींच जरूरी नाहीं. मग मजबरोबर माझ्या घरीं येण्याचे श्रम विनाकारण कां घेतोस ? माझा नामदेव तेवढा मला दे. " इतकें बोलून तिनें देवाकडे पाहिलें तों तेथें देव नसून नामदेवच आहेत असें तिला दिसलें. पुढें तीं उभयतां घरीं आल्यावर **दामशेटीनींही** नामदेवांस, प्रपंचाविषयीं दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून पाहिल्या. परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं असें पाहून, नामदेवांनीं कोणाशीं कांहीं व्यवहार केला आहे कीं काय याची त्यांनीं चौकशी केली. तेव्हां **नामदेवांनीं** त्यांस

सांगितलें, " गणोबा नाइकांस मी कांहीं कापड उधार दिलें आहे. एक आठवड्या-नंतर पैसे देईन असें त्यांनीं लिहून दिलें आहे. शिवाय धोंडोबा हे त्यांस जामीन आहेत. " दामशेटी म्हणाले, " आठवड्याची मुदत आतां संपून गेली आहे. तर तूं गणोबांकडे जाऊन त्यांजकडून पैसे मागून आण. " " ठीक आहे " असें म्हणून नामदेव गणोबांच्या घरीं गेले. गणोबांपाशीं पैसा नव्हता, म्हणून जो धोंडा जामीन ठेवला होता तो घेऊन नामदेव आपल्या घरीं परत आले. दामशेटी व गोणाई बाहेर गेलीं होतीं. नामदेवांनीं तो धोंडा आपल्या घरांतील एका खोलींत कोंडून बाहेरून कुलूप लाविलें व स्वतः देवळांत दर्शनास गेले. इकडे दामशेटी चंद्र-भागेवरून स्नान करून परत आले, तेव्हां नामदेवांची पत्नी **राजाई** हिनें, नामदेवांनीं धोंडा खोलींत कोंडून ठेवल्याचें वर्तमान त्यांस सांगितलें. तें ऐकून दामशेटींनीं विचा-रलें, " नामा कोठें आहे ? त्याला लवकर बोलावून आणा. " तेव्हां नामदेवांचे पुत्र नारा आणि महादा हे त्यांस बोलावण्यास राउळांत गेले व म्हणाले, " चला लवकर घरीं. आजोबा तुम्हास बोलावीत आहेत. " बाप बोलावतो हें ऐकतांच नामदेव देवाच्या तोंडाकडे पाहूं लागले. दामशेटी आपणास शिक्षा करतील असें त्यांस भय वाटलें. परंतु घरीं गेल्याशिवाय गत्यंतर नाहीं म्हणून ते मुलांबरोबर घरीं आले आणि दाम-शेटींस नमस्कार करून उभे राहिले. दामशेटी त्यांस म्हणाले, " नाम्या, धोंड्याला तूं घरांत काय म्हणून कोंडून घातलेंस ? ही तुझी व्यापाराची तऱ्हा मोठी तऱ्हेवाईकच दिसते. पैशाला ठिकाण नाहीं, मग या धोंड्याला घेऊन काय करावयाचें आहे ? " तेव्हां नामदेव त्या दगडाला म्हणाले, " अरे बुवा, पैसा आण कुठें आहे तो. " आणि इतकें बोलून त्यांनीं त्याला घराबाहेर ओढलें, तों काय चमत्कार सांगावा ? सबंध दगड सोन्याचा झाला ! ती येवढी मोठी सोन्याची रास दृष्टीस पडतांच, **गोणाई** आणि **राजाई** यांच्या तोंडास पाणी सुटलें. त्या आपसांत बोलूं लागल्या, " आम्ही गरीब, म्हणून देवानें हें द्रव्य आम्हांस दिलें. " त्यांचा आनंद गगनांत माईना. आपण आतां दागिन्यांनीं फुलून जाणार असें राजाईस वाटलें. गोणाई व दामशेटी यांनीं नामदेवांस सांगितलें कीं, " ही गोष्ट तूं कोणापाशीं बोलूं नकोस. आम्हांस येवढें द्रव्य मिळाल्याचें जर लोकांस कळेल तर ते हें सगळें द्रव्य आमच्या-कडून जबरदस्तीनें हिरावून घेतील. " यावर नामदेवांनीं त्यांस अशी सूचना केली कीं, " यांतून आपला पैसा तेवढा वसूल करून घ्यावा व बाकीचा गणोबास परत करावा. " हे शब्द ऐकतांच राजाई पुढें होऊन उसळून म्हणाली, " देवानें तुम्हांस

आपण होऊन दिलेलें हें सोनें तुम्ही गणोबास देणार काय ? गणोबाचा याच्याशीं काय संबंध ? मी निक्षून सांगत्यें, या सोन्यास मी तुम्हास हात लावूं देणार नाहीं. मी या सगळ्या सोन्याचे दागिने ठोकणार." नामदेवानीं तिला सांगितलें, "तें कांहीं नाहीं. आपली रकम वजा जातां बाकी सोनें गणोबालाच परत मिळालें पाहिजे." असें त्यांचें भांडण चाललें आहे, तों ती बातमी हां हां म्हणतां सगळ्या गांवभर पसरली. शेंकडों लोक दामशेटींच्या घराजवळ जमा झाले. त्यांत गणोबाही होताच. त्यानें व इतर लोकांनीं दामशेटींस सांगितलें कीं, "गणोबाकडे तुमची जेवढी रकम येणें आहे तेवढी आम्ही तुम्हांस देतों. ती घ्या आणि हा धोंडा परत द्या. नाहीं तर आम्हीं तुम्हास दिवाणांत नेऊं." नामदेव म्हणाले, "ठीक आहे. आमची रकम चुकती करा आणि आपला दगड घेऊन चला." लोकांनीं त्यांची रकम तावडतोब चुकती केली व ते तो सोन्याचा दगड घेऊन गेले. पण दुर्दैव त्यांचें ! त्यांनीं तो सुवर्णमय पाषाण नेऊन खालीं ठेवला मात्र, क्षणार्धांत त्याचा सोनेपणा जाऊन तो पूर्ववत् काळा कुळकुळीत दगड झाला ! पंढरीस नामदेवाचे घरांत या धोंड्याची पूजा अद्याप केशवराजाचे मूर्तीचे पूर्वबाजूस कमान आहे, तींत होत असते, असें रा. मुळे यांनीं आपल्या नामदेवचरित्रांत लिहिलें आहे. असो. गणोबा व इतर लोक एकमेकांवर दांत ओंठ खाऊन, शेवटीं चुरमुरे खात स्वस्थ बसले. बिचाऱ्या राजाबाईचे दागिने तर मनांतल्या मनांतच राहिल्यामुळें ती अगदींच निराश झाली. गोणाबाईप्रमाणें तीही मधून मधून नामदेवांची कानउघाडणी करीत असे. नमुना पहाः—

**आई जें शिकवी तें तुह्मी नायका । नाहीं भय शंका लौकिकाची १**
**लावोनी लंगोटी झालेती गोसावी । आमुची ठेवाठेवी कोण करी २**
**ऐसी तुमची स्थिति विलग देखोनी । पडिलें चिंतवनीं काय करूं ३**
**धडाचि कांटीये घातलें हें कैसें । बळेंचि आपणा पिसें लावियेलें ४**
**सुखाचा संसार करोनि बारा वाटे । नांव केलें मोठें जगामाजी ५**
**तोडियेला मोह सांडियेली माया । भुलविलें तुमाचिया चित्ता कोणें ६**
**कवणें पुण्यें ऐसी जोडियेली जोडी । केली विघडाविघडी आह्मातुह्मा ७**
**म्हणोनि माझें चित्त आपुलेनि उद्वेगें । कवणा जीवींचें सांगें सुखदुःख ९**
**सर्वस्व सांडोनि धरिला तुह्मी देव । येणें पुसिला ठाव संसाराचा १०**
**आमुची करुणा न वाटेचि कांहीं । विनविते राजाई नामदेवा ११**
**तुमचिये गती लेंकरें नेणती । कोण चालविती घराचार ८**

**खुंटतें तो लागे याचे पंथें। माऊली म्हणुनि तूतें सांगतें रे ॥१०॥ गोणाई म्हणे नाम्या हें नव्हे भलें। विठोबानें केलें आपणा ऐसें ॥ ११ ॥**

अशा रीतीनें **गोणाईनें** पुष्कळ कडक आणि मर्मभेदक शब्दांनीं **नामदेवांची** कानउघडणी केली, परंतु ते इतके शांत झाले होते कीं त्यांच्या मनावर आईच्या या भाषणाचा कांहींच परिणाम झाला नाहीं. त्यांनीं तिला जें उत्तर दिलें तें पुढील अभंगांत मूळ चरित्रलेखकानें, फार समर्पक शब्दांनीं ग्रथित केलें आहे.

**नामा म्हणे माते ऐक वो वचना। मी गेलों दर्शना नागनाथा ॥ १ ॥ आंवढ्या देऊळीं जाहला संचार। पारुषला धीर या देहाचा ॥२॥ तैंहूनी तुज मज तुटला संबंधु। विठ्ठलाचा छंदु घेतला जीवीं ॥ ३ ॥ लौकिक व्यवहार नाठवेचि कांहीं। कल्पना ते देहीं आथीचना ॥४॥ टाळ दिंडी घेऊनि नाचतों रंगणीं। तेणें माझ्या मनीं सुख वाटे ॥ ५ ॥ या देह घरसंसाराचा आलासे कंटाळा। म्हणोनि गोपाळा शरण आलों ॥ ६ ॥ पुत्र कलत्र[1] येथें कायसीं बापुडीं। जेणें रौरवकुंडीं वास घडे ॥ ७ ॥ तूं जरी म्हणसी हें सत्य संसारसुख। तरि हें केवळ विख विस्तारलें ॥ ८ ॥ तेंचि हें जाण म्हणोनी टाकियलें दुरी। तें सेवितां उरी कैंची मातें ॥ ९ ॥ म्हणोनी मी झालों या संतांचा दीन। तेणें हरला शीण जन्मांतरिंचा ॥ १० ॥ नामा म्हणे आतां मी तूंपण कैचें। मी या विठोबाचें शरणागत ॥११॥**

आंवढ्या नागनाथाच्या देवळांत नामदेव दर्शनास गेले असतां तेथें त्यांच्या मनांत

---

१ याच अर्थाचा तुकारामबुवांचा पुढील अभंग पहाः—

" जेणें घडे नारायणीं अंतराय। हो कां बाप माय वर्जावीं तीं १
येर प्रिया पुत्रा कोण करी लेखा। करिती तीं दुःखा पात्र शत्रु २
प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु। तैसी माता निंद्यु भरतें केली ३
तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय। आणीक उपाय दुःखमूळ ४

त्यांनीं आपलें मस्तक वस्त्रानें बांधून घेतलें होतें तरी त्यावर माशा घोंगावत होत्या व लोकही त्यांची नाना प्रकारीं निंदा करीत होते. अशा रीतीनें प्रवास करीत करीत ते पंढरपुराजवळ येऊन दाखल झाले. चंद्रभागेस मोठा पूर आलेला असल्यामुळें यात्रेकरू नावेंत बसून पलीकडे जात होते. इतक्यांत पंढरिनाथानें आपल्या भक्तांस दृष्टांत देऊन सांगितलें कीं, " महापापी नामदेवास पंढरीक्षेत्रांत पाय ठेवूं देऊं नका." हें वर्तमान नामदेवांस समजतांच त्यांस मोठें दुःख होऊन त्यांचे डोळे पाण्यानें भरून आले. मग नदीपलीकडूनच पांडुरंगास साष्टांग नमस्कार घालून ते म्हणाले, " देवाला माझा धाक वाटतो काय ? माझ्यासारख्या पापी मनुष्यांच्या पातकास भिऊन जर हा देव आम्हास दूर लोटूं लागला तर हा पतितपावन कसला ? " मग त्यांनीं देवास एक पत्र लिहिलें आणि तें संतांबरोबर पांडुरंगाकडे पाठविलें. या पत्रांत असा मजकूर होता, " हे पंढरिनाथा पांडुरंगा, तुझें पतितपावन हें ब्रीद जर मी तुला सोडावयास लावीन तरच मी तुझा भक्त खरा. देवा, माझे गुणदोष तूं आतां मनांत आणूं नकोस. महापातकी गणिका तुझ्या नामोच्चारानें पावन होऊन विमानांत बसून वैकुंठास गेली. अजामिळासारखा पापात्मा तुझें एक वेळ चुकून नामस्मरण केल्यानें वैकुंठाचा अधिकारी झाला. शिशुपालानें तुला भरसभेंत शिवीगाळ केली, त्याच्याहीपेक्षां मी पतित आहें काय ? तर आतां मला दूर न लोटतां, माझा अंगीकार करून मला पावन कर. " हें नामदेवांचें पत्र संतांनीं पांडुरंगास वाचून[१]

---

**ऐसें नामयासी कळलें वर्तमान । भरले नयन अनुतापें**
**तंव भक्तराज नाम्यानें देखिलें । साष्टांग घातलें तेव्हां त्यानें**
**म्हणे कां देवासी पडला आमुचा धाक । कळला पुण्यश्लोक इतुकेनि**
**दुरोनि डोंगर दिसतो साजिरा । तैसें झालें मजला आतां खरें "**

१ या प्रसंगास साजण्यासारखें नामदेवांचें एक पद प्रसिद्ध आहे तें येथें देतों:—

**पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।**
**पतितपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥ ध्रु० ॥**
**सोडीं देवा ब्रीद आतां न होसि अभिमानी ।**
**पतितपावन नाम तुजला ठेवियलें कोणी ॥ १ ॥**
**घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार ।**
**काय देवा रोधूं तुमचें कृपणाचें द्वार ॥ २ ॥**

**घरधनी याणीं केला गुरु । बाई मी आतां काय करूं ।**
**असोनि नाहींसा संसारू । चमत्कारू कृपेचा १**
**धांवें पावें गे मेसाई । येथें कोणाचें न चले कांहीं ।**
**सत्यपण तुझे ठायीं । तरि हें नाहींसें करीं गे २**
**मंत्र घेतला जैसा । घरीं संतांचा वोळसा ।**
**ओस पडो या हरिदासां । गेले नमत मागुते ३**
**काय सांगों याची रीती । सोसे सोसे पाये चरणाप्रती ।**
**अवघे भांबडभूत होती । नाचताती आनंदें ४**
**लौकिकांत गेलीं वायां । एकाच्या एक पडती पायां ।**
**म्हणती ये गा पंढरिराया । ब्रह्मानंदें डुल्लती ५**
**भोळी सासू गोणाबाई । पांढरा स्फटिक व्याली काई ।**
**त्यानें जोडिला शेषशाई । ह्मणे राजाई काय करूं ६**

तुकारामबुवांस नामदेवांचा अवतार म्हणतात; तेव्हां आतां वरील अभंग वाचल्यावर तुकारामबुवांची पत्नी जिजाबाई ही या राजाईचा अवतार होती असें धरून चालण्यास कांहीं हरकत नाहीं !

वरच्यासारखीं कठोर भाषणें राजाई नामदेवांस बोलूं लागली म्हणजे ते शांतपणानें तिला चार परमार्थाच्या गोष्टी सांगून, तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत.

नामदेवांचे वडील **दामशेटी** हे कधीं मृत्यु पावले यासंबंधाची माहिती कोणत्याही जुन्या ग्रंथांत सांपडत नाहीं, परंतु नामदेवांनीं समाधि घेतली त्या वेळीं गोणाई व दामशेटी हीं हयात होतीं असा उल्लेख मात्र कांहीं ठिकाणीं आढळतो. परंतु येवढी गोष्ट नक्की दिसते कीं, दामशेट हे वृद्धापकालामुळें, पुढें पुढें संसारांत फारसें लक्ष्य घालीत नसावे व त्यामुळें संसाराचा सर्व भार नामदेवांवरच पडला असावा. नामदेवासारखा प्रपंचपराङ्मुख मनुष्य, निरुपाय म्हणून जरी संसार करूं लागला तरी त्याचा संसार कोणत्या प्रकारचा असणार याची कल्पना सहज होण्यासारखी आहे, अर्थात् नामदेवांच्या घरीं अठरा विश्वे दारिद्रय वास करीत होतें हें सांगावयास नको. अशा स्थितींत एके दिवशीं, **नामदेवांचे** दोन मेहुणे–राजाईचे भाऊ–त्यांचे घरीं पाहुणे आले. फार दिवसांनीं आपले भाऊ घरीं आल्यामुळें राजाईस मोठा आनंद झाला. तिनें एक घोंगडी त्यांस बसावयास दिली. आणि आपल्या घरची सगळी हकीकत त्यांस सांगितली. ती म्हणाली:—

**“ भ्रतार लागले विठोबाचे ध्यानीं। संसाराची मनीं आस्था नाहीं ॥ नाचतो निर्लज्ज होऊनि निःशंक। सांडिला लौकिक देहभाव ॥ ”**

याप्रमाणें त्यांचें भाषण चालू आहे तों नामदेव घरीं आले. मेहुण्यानीं उठून त्यांना अभ्युत्थान दिलें, परंतु नामदेवांनीं तिकडे लक्ष्यही दिलें नाहीं किंवा त्यांच्याशीं एक शब्दही ते बोलले नाहींत. आपल्या पतीनें आपल्या बंधूंचा असा अपमान केल्याचें पाहून **राजाई** फारच संतापली. ती म्हणाली, “ आम्हांस हा संसार असून नसल्यासारखा झाला आहे. अगडबंब लोक टाळ, विणे घेऊन घरीं आले तर हे त्यांच्या पुनः पुनः पायां पडतात. ढोंगी लोकांनीं येऊन हरिनामाची गर्जना केली कीं हे त्यांच्या पायांचें तीर्थ देखील घेण्यास तयार ! आणि माझे बंधु फार दिवसांनीं माझ्या घरीं आले, तर त्यांचा नुसता रामराम देखील घेण्यास हे कबूल नाहींत. मग त्यांच्याशीं दोन शब्द बोलण्याची गोष्ट तर दूरच राहिली. ” परंतु अशा रीतीनें नुसतें चिडून काय होणार ? पाहुणे घरीं आले आहेत, त्यांस कांहीं तरी गोड धड तर करून घातलें पाहिजे ? म्हणून ती नामदेवांस म्हणाली, “ अहो, यांच्या जेवणाची कांहीं तरी तजवीज करावयास नको का ? काल संध्याकाळीं हे आपल्या घरून जेऊन निघाले ते आतां येथें आले. त्यामुळें हे उपाशी आहेत. ” नामदेव म्हणाले,[१] “ आज एकभुक्ती दशमी आहे. तेव्हां आज तर जेवायचें नाहींच. उद्यां झाली एकादशी. तेव्हां आतां परवां द्वादशीचें पारणें फेडूं तेव्हां यांना जेवण मिळेल. ” आणखी दोन दिवस उपोषण घडणार हें ऐकतांच पाहुणे विचारे अगदीं घाबरले. पाहुणचार तर नाहींच, पण उलट दोन दिवस उपोषण करावें लागणार हें ऐकून कोणत्या पाहुण्यास बरें वाटेल ? ते दोघेही भुकेनें व्याकुळ होऊन रात्रभर सारखे तळमळत होते. पोटांत आग पडल्यावर झोंप कोठून येणार ?

दुसरे दिवशीं सकाळीं नामदेव उठले आणि नित्यानियमाप्रमाणें देवळांत गेले. इकडे ते दोन पाहुणे, विचारी राजाई आणि मुलें भुकेनें व्याकुळ होऊन वसलीं होतीं. “ असल्या

१ “ नामा म्हणे कांते दशमी एकभुक्ती । भोजन निश्चिती करूं नये १ उदईक हरिदिनी उपवास जागरण । ऐकावें कीर्तन चार प्रहर २ द्वादशी पारणें झालिया भोजन । ऐकोनी पाहुणे चिंतातुर ३ क्षुधातुर पोटीं निद्रा नलगे कांहीं । वर्षा येवढी पाहीं रात्र झाली ४ ”

सोळभोकाला माझ्या बापानें मला देऊन माझ्या संसाराचें वाटोळें केलें, " असें म्हणून राजाई पिरपिरत होती. एकादशी असल्यामुळें जेवणाचा प्रश्नच नव्हता, परंतु फराळाची देखील कांहींच सामग्री घरांत नव्हती. इतक्यांत, वाण्याच्या वेषानें, श्रीविठ्ठल पाठीवर एक गोणी घेऊन, नामदेवांचें घर विचारीत आला. बाहेर राजाई बसली होती तिला त्यानें विचारलें, " बाई, नामदेव घरांत आहेत काय ? " राजाईनें सांगितलें, " नाहीं. देवळांत गेले आहेत. " वाणी म्हणाला, " ते परत येईपर्यंत ही गोणी येथेंच राहूं द्या. तुम्हांस यांतलें जेवढें द्रव्य लागेल तेवढें घेऊन खर्च करा. थोड्या वेळानें मी परत येईन. " राजाईनें खूष होऊन विचारलें, " तुमचें नांव काय ? " वाणी म्हणाला, " माझें नांव केशवशेट. " इतकें बोलून तो निघून गेला तोंच नामदेवांची स्वारी घरीं आली. राजाईनें त्यांस सांगितलें कीं, " केशवशेट येथें आले होते त्यांनीं ही होनांनीं भरलेली गोणी आम्हांस दिली आहे. " हा केशवशेट पांडुरंगाशिवाय दुसरा कोणी नाहीं हें नामदेवांनीं तत्काळ ताडलें व आपल्यासाठीं पांडुरंगास विनाकारण तसदी पडली याबद्दल खेद प्रदर्शित करून, ते होन ब्राम्हणांस वांटून टाकावे या हेतूनें, ब्राम्हणांस बोलावून आणण्यास ते बाहेर गेले. तेवढ्या वेळांत राजाईनें तें पोतें फोडून, त्यांतले दोन पायल्या होन काढून घरांत लपवून ठेविले व पोतें पूर्ववत् शिवून टाकलें. इतक्यांत नामदेव ब्राम्हणांस घेऊन आले व पोतें फोडून त्यांतले सगळे होन त्यांनीं त्यांस वांटून दिले. येवढें केल्यावर ते म्हणाले, " ज्याचें द्रव्य त्याजकडे गेलें, आतां कोणाचें देणें राहिलें नाहीं. " इकडे घरांत राजाई, चोरून ठेवलेले होन राखावयास गेली, तों त्या होनाचे कोळसे झालेले ! मग बाहेर येऊन, " मी त्यांतले कांहीं होन घरांत लपवून ठेवले होते. पण त्यांचे कोळसे झाले, " असें तिनें नामदेवांस कळविलें. नामदेवांनीं आंत जाऊन त्या कोळशांवर नजर टाकतांच त्यांचे पुनः होन झाले ! लगेच नामदेवांनीं ब्राह्मण बोलावले आणि ते होन त्यांस देऊन टाकले ! बिचारी राजाई कफल्लक ती कफल्लक ! पण आपल्या पतीच्या अंगीं केवढें अलौकिक सामर्थ्य आहे याचा तिला आतां पूर्ण अनुभव आल्यामुळें तिचीही वृत्ति, त्या घटकेपासून पालटली आणि नामदेवांस मर्मभेदक शब्दांनीं ताडन करण्याचें तिनें सोडून दिलें. राजाईच्या उपरतीचा हा प्रसंग मूळ चरित्रकारानें फार बहारीनें वर्णिला आहे, म्हणून त्यांतले दोन अभंग येथें देण्याचा मोह मला आवरत नाहीं:—

१

**नामा म्हणे स्त्रिये तुवां अनुचित केलें । कां माझ्या शिणविलें विठोबासी ॥ १ ॥ निंदेच्या उत्तरीं निषेधिलें**

मज । वाटली त्या लाज मायबापा ॥ २ ॥ मग तो माझा स्वामी झाला वेषधारी । तुजलागीं सुंदरी पुढारला ॥ ३ ॥ रत्नजडित मुकुट सत्वर फेडोनी । आलासे वेढोनी शुभ्र शेला ॥ ४ ॥ तेणें भारें त्याचा धगधगिला मस्तक । म्हणोनि मज शोक वाटतसे ॥ ५ ॥ कस्तूरी मळवट सुरेख पुसोनी । आलासे लावूनि विभूति भाळीं ॥ ६ ॥ रुद्राक्षाचे मणि लेउनि कर्णपुटीं । कुंडलें गोमटीं लपविलीं ॥ ७ ॥ कौस्तुभ वैजयंती काढिली परती । बांधलेंसे प्रीती शिवलिंग ॥ ८ ॥ देखुनि रखुमाईस वाटलें उदास । हंसती उपहास केले त्याचे ॥ ९ ॥ रमा शरणागत आलिंगिली दोहीं बाहीं । कैसी गोणी तिहीं कवळिली ॥१०॥ सर्वांगी साजिरी चंदनाची उटी । भ्रंशली गोमटी श्रम झाला ॥११॥ सोनसळापट सोडोनि गोमटा । नेसला धुवटा बोटधारी ॥ १२ ॥ इंद्रनीळ तनु रुळली असेल रजें । श्रीमुख रवितेजें कोमाईलें ॥ १३ ॥ धन्य तुझे नयन देखिले श्रीचरण । परि जीवें निंबलोण नाहीं केलें ॥ १४ ॥ द्रव्याचेनि लोभें भ्रांत झालें मन । हातींचें निधान हारपलें ॥१५॥ आतां आदि अंतीं पाहतां केवळ । मूळ आणि फळ दुःखरूप ॥१६॥ जाणोनि निवृत्ति धरिली सज्जनीं । सांडिलें निर्वाणीं वमन ऐसें ॥ १७ ॥ जाणसी तें करीं तूं आपुलें हित । म्यां ठेविलें चित्त त्याचे पायीं ॥१८॥ नामा म्हणे केशव न पाहे निर्वाण । माझा अभिमान आहे त्यासी ॥ १९ ॥

२

दोन्ही जोडुनि कर माथा ठेवी चरणीं । म्हणे परिसा विनवणी स्वामी माझी ॥ १ ॥ मी तंव अज्ञान न कळे तुमचा महिमा । अपराध क्षमा करा माझा ॥२॥ अंतरींची खूण कांहीं सांगा मज । जें तुम्ही हृदयीं बीज धरुनी असां ॥३॥ जेणें सुखें तुमचें चित्त निरंतर । आनंदें निर्भर

सदा असे ॥ ४ ॥ इच्छा तृष्णा देहीं मावळली कल्पना। सदा समाधान इंद्रियांसी ॥ ५ ॥ मायबापें मज दिधलें तुमच्या हातीं । जन्मोनि सांगातीं लावियेलें ॥ ६ ॥ देव द्विज गुरु साक्ष हे करोनी। स्वामीचे चरणीं जोडियेले ॥ ७ ॥ तुमची चित्तवृत्ति उदास देखोनी। पडिलें चिंतावनीं काय करूं ॥ ८ ॥ मग तुमचा स्वामी कृपेचा कोंवळा । न धरत पातला अनाथबंधु ॥ ९ ॥ मग त्या विश्वंभरें कृपेच्या सागरें। पुसिली आदरें तुमची गोष्टी ॥ १० ॥ तंव मी दुराचारें निर्भर्त्सिलें तुम्हा । ऐकोनि मेघश्यामा करुणा आली ॥ ११ ॥ तंव तो जगज्जीवन बोले अमृतवाणी । लोटोनियां गोणी दारवंठा ॥ १२ ॥ म्हणे हें द्रव्य तुम्ही सर्वही वेंचावें। आणीक मागावें लागेल तें ॥ १३ ॥ सद्गदित कंठें सांगितलें तुम्हा । परि नकळे मज महिमा दैवहीना ॥ १४ ॥ लोभाचा वोरसु कोणिये जन्मींचा । न कळे तुमचा ऋणानुबंधु ॥ १५ ॥ पाहतां श्रीमुख निवालें माझें चित्त । मग हे मनोरथ विसरले ॥ १६ ॥ क्षण एक आनंद झाला माझे जीवीं । उपमा कवण द्यावी तया सुखा ॥ १७ ॥ आतां ये संसारीं मीच धन्य जगीं। जे तुम्हा अर्धांगीं विनटलें ॥ १८ ॥ परि मला एक वेळ घाला विठोबाचे पायीं। विनविते राजाई नामदेवा ॥ १९ ॥

हे अभंग खुद्द नामदेवांचे असतील असें मला वाटत नाहीं हें मी आरंभींच सांगितलें आहे, परंतु एक गोष्ट कबूल केलीच पाहिजे ती ही कीं, ज्या कोणा कवीचे हे अभंग असतील तो मोठा सहृदय आणि प्रतिभावान् असला पाहिजे. यांत संशय नाहीं. सुलभता, समर्पक शब्दयोजना, मनोहर वर्णनशैली आणि उच्च दर्ज्याची प्रतिभा इत्यादि गुणांमुळें हे अभंग फार सरस उतरले आहेत.

एकदां अशी गंमत झाली कीं विठ्ठल नामदेवास म्हणाला, नाम्या, तूं माझा फार प्रिय भक्त आहेस यांत संशय नाहीं, परंतु केवळ माझ्याच नादीं लागून, तूं

आपल्या प्रपंचाविषयीं आणि पत्नीविषयीं इतकी उदासीनता धारण करावी हें मला बरें वाटत नाहीं. तरी यापुढें संसाराकडे थोडेंबहुत लक्ष्य देत जा आणि राजाईशीं प्रेमानें वाग." देवाच्या या उपदेशाचा नामदेवांस मोठा राग आला. ते म्हणाले, "पांडुरंगा, आतां कसला आला आहे माझा संसार ? मी संसारावर आणि घरादारावर कधींच पाणी सोडलें आहे. मग तूं मला पुनः संसारांत कां गुंतवूं पाहतोस ? माझा जर तुला कंटाळा आला असेल तर तसें स्पष्ट सांग, म्हणजे मी आपला कोठें तरी तोंड घेऊन जातों—

**ऐसें मी करीन जाण विठोराया । पंढरीचे ठाया मोडवीन ॥ राहीना मी आतां जाइन दूर देशा । भक्तीची हे आशा सोडूनियां ॥ जाईल भिंवरा जाइल पुंडलीक । जाईल सकळिक महिमा तुझी ॥ ऐसें बा विठ्ठला त्वां दुखविलें मज । सोडीना सहज पंढरीतें ॥ उदास हें चित्त माझें झालें देवा । जाईन केशवा मायबापा ॥ आतां असों द्यावा लोभ हाचि देवा । समर्था केशवा मायबापा ॥ आपुल्या सांगातें नेईन पंढरी । नेइन संतनगरी भिंवरा जना ॥ नेईन सांगातें महिमा येथींची । मागें हेत हाचि धरुनि राहें ॥ चक्र-तीर्थ आणि पद्माळें हें जाण । सर्वही करीन आपणा-पाशीं ॥ आपणचि तीर्थ आपणचि व्रत । आपण दीननाथ होईन मी ॥ येथें हे पंढरी होती ऐसें लोक । म्हणतील देख पुढें देवा ॥**

इतकें बोलून नामदेव खरोखरच पंढरपुर सोडून चालले. तेव्हां पांडुरंगास कळवळा येऊन तोही त्यांची समजूत घालून त्यांना परत आणण्यासाठीं त्यांच्या मागून धूम पळत सुटला. त्यानें नामदेवांची पुष्कळ प्रकारीं समजूत घातली, पण ते मागें फिरेनात, तेव्हां पांडुरंगानें प्रेमानें त्यांचा हात धरून त्यांना खेंचीत पंढरीस आणलें.

नामदेव पंढरपुर येथें चंद्रभागेच्या वाळवंटांत कीर्तन करीत असत त्या वेळच्या त्यांच्या वेषाचें वर्णन **जनीनें** पुढील अभंगांत केलें आहे:—

**सुंभाचा कडदोरा रगट्याची लंगोटी । नामा वाळवंटीं कथा करी १ ब्रह्मादिक देव येवोनि पाहती । आनंदें**

**गर्जती जयजयकार २ जनी म्हणे त्यांचें काय वर्णूं**
**सुख । पाहती जे मुख विठोबाचें ३**

एके दिवशीं, देवळांत विठोबाची आरती करून नामदेव घरीं आले. एकादशी असल्यामुळें त्यांना निराहार उपोषण होतें. इतक्यांत देव त्यांचें सत्व पाहण्यासाठीं विप्रवेषानें त्यांच्या घरीं येऊन भोजन मागूं लागला. नामदेव म्हणाले, "आज आषाढी एकादशी, आज तुम्हास भोजन कसें मिळेल ? फराळाचें पाहिजे तर देतों." ब्राह्मण म्हणाला, मला भोजनच पाहिजे, दुसरें कांहीं नको. असें म्हणून त्यानें मुरकुंडी घातली आणि प्राण सोडला ! ती बातमी हां हां म्हणतां गांवभर पसरली तेव्हां लोक नामदेवांच्या घरीं येऊन त्यांचा धिःकार करूं लागले. शेवटीं, ब्राह्मण बोलावून त्यांजकडून तें प्रेत चंद्रभागेच्या तटीं श्मशानांत नेण्यांत आलें व त्यास अग्नि देण्यांत आला. ज्वाला अंगास लागतांच देव आपल्या मूळरूपानें प्रगट झाला आणि त्यानें नामदेवांच्या पायांवर मस्तक ठेविलें. तेव्हां नामदेव त्यास म्हणाले, "देवा, माझा चांगला अंत पाहिलास. मुद्दाम महाएकादशीस येऊन अन्न मागावयाचें व तें न मिळाल्यास आत्महत्या करावयाची, ही तुझी रीत खरोखरच मोठी स्पृहणीय दिसते." देवानें हांसून नामदेवांची पाठ थोपटली आणि तो गुप्त झाला.

**जनाबाई**च्या नांवांवर[1] प्रसिद्ध असलेल्या पुढील अभंगांत नामदेवांच्या कांहीं चमत्कारांचा उल्लेख आलेला आहे.

१

**आषाढी एकादशी । नामा होता उपवासी १**
**देवें गरुड धाडिला । वेगीं बोलाविलें त्याला २**
**राही म्हणे पांडुरंगा । कोणी बोलाविलें सांगा ३**
**ऐसा भक्तराज निका । दासी जनीचा आत्मसखा ४**

२

**पूर आला पंढरीसी । पाणी लागे पायरीसी १**
**संतजन हो मिळाले । उदुनी नाम्याजवळी गेले २**

---

१ हीं इतकी सोपी आणि अर्वाचीन रचना साडेसहाशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या **जनी**ची असेल असें मला वाटत नाहीं.

नामा सांगे विठोबासी । उतार द्यावा भिंवरेसी ३
दीनवत्सल महाराज । जनी म्हणे केलें काज ४

३

सण दिवाळीचा आला । नामा राऊळासी गेला १
हातीं धरूनि देवासी । चला आमुच्या घरासी २
देव तेथूनि चालिले । नामयाच्या घरा आले ३
गोणाईनें उटणें केलें । दामशेटीनें स्नान केलें ४
पदर काढिला माथ्याचा । बाळ पुशीला नंदाचा ५
हातीं घेऊनि आरती । चक्रपाणी ओवाळिती ६
जेऊनियां तृप्त झाले । दासी जनीनें विडे दिले ७

४

वोढिला ताडिला । देव भक्तीनें फाडिला १
एका प्रेमा नामासाठीं । भक्तीं काढियला कंठीं २
झाला नाम्याचा मजूर । मोळया बांधाव्याचा थर ३
भिंती चांदया रचिले । त्याचें छप्पर शेकारिलें ४
वरी सोडुनियां पाणी । धन्य भक्ता म्हणे जनी ५

५

ज्ञानेश्वर म्हणे नाम्यासवें जेविसी । नाहीं हृषीकेशी
म्हणतसे १ सांगितलें एक भलतेंचि बोलसी । आहे
याची भ्रांति ज्ञानेश्वरा २ बाहियलें त्वरें ऐसें कांहीं
काम । उठे मेघश्याम तांतडीनें ३ निरोप येवोनी
सांगावा एकांतीं । म्हणे जनीप्रती पांडुरंग ४ देव म्हणे
नाम्या ऐकावें वचन । येईल साधोन वेळ तुझी ५ जनी
म्हणे आतां समजलें मज । धरीन उमज येथोनियां ६

६

गरुडपारापाशीं । नामा उभा कीर्तनासी १
येऊनियां पांडुरंग । ताल स्वयें धरी अंग २
नाचूं लागे बरोबरी । नाहीं सांगायाची उरी ३
शब्द देवाचा उमटला । दासी जनीनें ओळखिला ४

वरील अभंगांतील मजूर, छप्पर, बरोबरी हे परकीय भाषेंतले शब्द साडेसहाशें वर्षांपूर्वींच्या, जनीसारख्या स्त्रीनें रचिलेल्या अभंगांत येणें शक्य नाहीं. शिवाय हे अभंग नामदेवांच्या घरच्या जनीचे नव्हत याला आणखी एक पुरावा आहे, तो असा. नामदेवांचे गुरु विसोबा खेचर, ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे; खुद्द नामदेवानींही, स्वतःचे गुरु म्हणून खेचरांचाच उल्लेख केला आहे. असें असतां या जनीच्या एका अभंगांत **सोपान** हे नामदेवांचे गुरु असून ते कोल्हापुरास ब्रह्मगिरीवर रहात होते अशी विचित्र माहिती दिली आहे. खालील अभंग पहाः—

**नामयाचा गुरु । तो हा सोपान सद्गुरु १**
**करवीरीं करुनी वस्ती । ब्रह्मपुरी[1] तिसी म्हणती २**
**माझ्या जीवींच्या जीवना । हृदयीं राहें तूं सोपाना ३**
**चित्त उद्धव (?) ज्याची सत्ता । जनी म्हणे माझ्या ताता ४**

नामदेवांचे व आपले स्वतःचे अवतार पूर्वीं कधीं व कोठें झाले याचीही माहिती या **जनीनें** एका अभंगांत दिली आहेः—

**" हिरण्यकश्यपाचे कुळीं नामा प्रऱ्हाद । पद्मिणी नाम माझें श्रेष्ठ दासीचें पद १ दुसरा जन्म त्याचा अंगद रामभक्त । मंथरा नाम माझें माथां दिधली लाथ २ गोकुळीं कृष्णासवें जन्मला उद्धव । कुब्जा नाम माझें उद्धरिलें स्वभावें ३ कलींत नामदेव विठ्ठलचिंतनीं । त्याचे सेवेलागीं दासी जन्मली जनी ४**

म्हणजे, नृसिंहावतारीं नामदेव हे प्रऱ्हाद असून, जनीही त्याचे घरीं पद्मिणी नामक दासी होती. रामावताराचे वेळीं नामदेव हे अंगद आणि जनी ही मंथरा होती. कृष्णावतारांत नामदेव हे उद्धव होते आणि जनी ही कुब्जा होती आणि कलियुगांत नामदेव हे नामदेव व जनी ही त्यांची दासी आहे ! रामावतारीं रामाचा द्वेष करणारी आणि त्याला वनवासास पाठविण्यास कारणीभूत झालेली दुष्ट मंथरा कृष्णावतारीं कुब्जा व कलियुगांत जनी होतांच इतकी साळसूद कशी झाली ? असो. तर अशा प्रकारचे हे बहुतेक अभंग अगदीं बनावट आहेत हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. अभंग वृत्तांत कविता करणारे नामदेव, एकनाथ, ज्ञानदेव, निवृत्ति, मुक्ताबाई, चोखामेळा, गोराकुंभार, जनी,

१ कोल्हापुर येथें ब्रह्मपुरी या नांवाचें एक स्थल आहे खरें.

विसोबा खेंचर, तुकाराम इत्यादि बहुतेक संतांच्या प्रसिद्ध असलेल्या अभंगसंग्रहांत असले बनावट अभंग पुष्कळच सांपडतात. असो.

**नामदेवांचा** मुलगा **गोंदा** याचेही नामदेवचरित्रपर कांहीं अभंग आहेत. त्यांत नामदेवांनीं लहानपणीं दगडाच्या देवाकडून भोजन करविलें या गोष्टीचा उल्लेख आरंभींच असून पुढें **राजाई** आपल्या दारिद्र्यास कंटाळून चंद्रभागेंत जीव देण्यास गेली असतां पांडुरंगानें तिचा जीव वांचविल्याची कथा दिली आहे, ती अशीः—नेहमीं उपोषणें करकरून आणि आपल्या लहान मुलांचे हाल होत असलेले पाहून राजाई आपल्या जिवास कंटाळली आणि आपले मुलगे नारा आणि महादा यांस पाठीस आणि पोटास बांधून व तान्ह्या बाळांस हातांत घेऊन तिनें भिंवरेच्या डोहांत उडी टाकली. त्याबरोबर पांडुरंग तेथें प्रगट झाला आणि त्यानें तिला पाण्यांतून काढून कांठावर आणून उभें केलें. देव आपणास मरूंही देत नाहीं म्हणून राजाई त्याच्यावर फारच रागावली व जमिनीवर डोकें आपटून पुनः तिनें पाण्यांत उडी टाकली. पुनः देवानें तिला बाहेर काढून नदीच्या पैलतीरीं नेऊन ठेविलें. राजाई अगदीं वैतागून गेली होती. ती मुलांस घेऊन घरीं जात असतां, वाटेंत एक मेलेला सर्प तिनें पाहिला. तेव्हां मरण येण्यास हा उपाय फार चांगला आहे असा विचार करून तो सर्प तिनें घरीं नेला आणि शिजत ठेविला. सर्प शिजल्यावर तो आपण खावा आणि मुलांस घालावा म्हणजे लवकरच सर्वांस मृत्यु येईल, अशी तिची समजूत. पण चमत्कार काय झाला पहा. ज्या भांड्यांत सर्प शिजत ठेवला होता त्याजवरचें झांकण राजाईनें काढतांच आंत सगळें सोनें झालेलें तिच्या दृष्टीस पडलें. मग आनंदाच्या भरांत तिनें तें भांडें लगबगीनें उचललें आणि नामदेवांस नेऊन दाखविलें. सोनें पाहतांच नामदेवांचा कपाळशूळ उठला. ते राजाईला म्हणाले, ' वेडे, हें काय केलेंस ? आपल्यासाठीं पांडुरंगाला हे श्रम पडले ना ? " इतकें बोलून त्यांनीं ब्राह्मण बोलावले आणि तें सगळें सोनें त्यांस वांटून दिलें !

नामदेवांच्या समकालीन संतकवींपैकीं निवृत्ति, चोखामेळा, परिसा भागवत, जनी, गोरा कुंभार, विसोबा खेचर यांच्या अभंगांत नामदेवांचा व त्यांच्या चरित्रांतील कांहीं गोष्टींचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं आढळतो. त्यांपैकीं **जनीचे** म्हणून प्रसिद्ध असलेले नामदेवचरित्रपर अभंग पूर्वीं दिलेच आहेत व निवृत्तिनाथांचेही तीन अभंग, उपोद्घातांत दिले आहेत. इतरांचे नामदेवांसंबंधाचे अभंग, ' नामदेवांचे समकालीन संत ' या प्रकरणांत पुढें देऊं.

---

# प्रकरण दुसरें.

नामदेवांस आंवढ्या नागनाथ येथें अकस्मात् उपरति होऊन ते कायमचे पंढरपुरास येऊन राहिले व अल्पावकाशांत त्यांनीं आपल्या उत्कट भक्तिबलानें पांडुरंगास इतकें वश करून घेतलें कीं, नामदेवांसाठीं त्यानें अनेक चमत्कार करून, त्यांची कीर्ति वाढविली आणि तत्कालीन संतमंडळांत त्यांचें नांव सर्वतोमुखीं केलें. परंतु नामदेवांच्या साधुत्वांत एक व्यंग होतें आणि तें कोणतें म्हणाल तर सद्गुरुकृपेचा अभाव हें होय. पांडुरंग सगुणरूपानें प्रगट होऊन त्यांच्याशीं बोलत असे आणि एखाद्या लाडक्या मुलाप्रमाणें त्यांचें कोडकौतुक पुरवीत असे, परंतु निर्गुण निराकार परमेश्वराच्या सत्य स्वरूपाची ओळख नामदेवांस अद्यापपर्यंत झाली नव्हती. शिवाय, देव आपणाशीं बोलतो चालतो, याविषयींही त्यांच्या मनांत थोडासा सात्विक अभिमान उत्पन्न झाला होता. हा त्यांचा अभिमान नाहींसा करून त्यांस भगवंताच्या सत्य स्वरूपाची ओळख करून देण्यासाठीं निवृत्ति ज्ञानदेवादि संतांनीं एक प्रसंग मुद्दाम घडवून आणला. प्रसिद्ध संत **गोरा**[1] कुंभार हे इतर सर्व संतांहून वयानें व अनुभवानें मोठे असल्यामुळें ज्ञानदेवादि सर्व संत त्यांस '**काका**' म्हणत असत. या काकांच्या घरीं एके दिवशीं सर्व संतांची एक मोठी सभा भरली होती. या सभेस निवृत्ति, ज्ञानदेव, चोखामेळा, कान्हो पाठक, भानुदास, सोपान, सावंतामाळी, मुक्ताबाई वगैरे बहुतेक सर्व संत हजर होते. नामदेवही त्या ठिकाणीं आले होते. प्रथम कांहीं वेळ थोडीबहुत पारमार्थिक चर्चा झाल्यावर, **ज्ञानदेव** विनोदानें **गोरो**बांस म्हणाले, " काका, या सर्व भांड्यांत पक्कीं भांडीं कोणतीं आणि कच्चीं कोणतीं याची एकदां परीक्षा करा पाहूं. " हें ऐकून गोरोबा उठले आणि, कुंभार टिचकी मारून जशी कच्च्या पक्क्या भांड्याची परीक्षा

---

१ गोरा कुंभार हे तेरढोकीचे राहणारे, निवृत्ति ज्ञानदेवादि भावंडें आपेगांवीं रहात असत, चोखामेळा हे मंगळवेढ्याचे रहिवासी, सांवतामाळी हे अरणभेंडी गांवीं रहात असत. तर, अशा प्रकारें निरनिराळ्या गांवीं राहणाऱ्या या सर्व संतांची गोरोबांच्या घरीं एकदम कशी गांठ पडली, किंवा मुद्दामच त्यांच्या घरीं ही सभा भरविण्यांत आली होती, हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं.

रतो, त्याप्रमाणें तेथें जमलेल्या प्रत्येक संताच्या डोक्यावर जोरानें टिचकी[1] मारीत ललें! टिचकीचा आघात नामदेवांशिवाय सर्व संतांनीं निमूटपणें सहन केला. ्रटीं नामदेवांची पाळी येतांच गोरोबांनीं त्यांच्या कपाळावर टिचकी मारली. तेव्हां मदेव त्यांस म्हणाले, "काका, तुम्ही हा काय पोरकटपणा चालविला आहे? लोकांस पल्या घरीं जमवून त्यांच्या डोक्यावर टिचक्या मारावयाच्या हा कोणत्या गांवचा दरसत्कार?" नामदेवांचें हें थोडेंसें रागाचें भाषण ऐकतांच सगळे संत हांसले व रोबानीं नामदेवांकडे बोट दाखवून ज्ञानदेवांस कळविलें कीं, "हा येवढा एक घट त्र कच्चा आहे." तेव्हां **मुक्ताबाई** गोरोबांस म्हणाली, "तुमची परीक्षा अगदीं ांबर आहे." हें ऐकतांच सगळे संत खदखदां हांसूं लागले व त्यामुळें नामदेव ांत फार ओशाळे झाले.

पुढें नामदेव तेथून निघून पंढरीस आले व गोरोबांच्या घरीं झालेल्या स्वतःच्या अप-नाची सर्व हकीकत त्यांनीं पांडुरंगास सांगितली. ती ऐकून देव म्हणाला, नाम्या, गोरोबांनीं जी परीक्षा केली ती अगदीं बरोबर आहे. जो मनुष्य सद्गुरूला ण गेला नाहीं, तो केवढाही मोठा व्युत्पन्न आणि भक्तिमान् असला तरी तो ाच आहे असें म्हटलें पाहिजे." ही भगवदुक्ति ऐकून नामदेव अगदीं विरघळून . ते म्हणाले, 'देवा, माझ्या अपमानदुःखाचा तूं परिहार करशील अशा समजुतीनें तुजपाशीं आलों. पण तूंही गोरोबांच्याच म्हणण्याचा अनुवाद करितोस. आतां पुढें करावें तरी काय?' देवानें सांगितलें, "नामदेवा, तुला इतकें वाईट वाटण्याचें ीं कारण नाहीं. तूं आतां सद्गुरूस शरण जाऊन त्याचा उपदेश घे म्हणजे माझ्या व्यापी निर्गुण स्वरूपाची यथार्थ कल्पना तुला होऊन, अद्वैताचें खरें रहस्य काय े हें कळून येईल."

वरील कथा **महीपति**कृत 'भक्तविजय' ग्रंथांतून घेतली आहे, परंतु **नामदेवी** यांत या संबंधाचे जे अभंग आहेत त्यांत हा कथाभाग थोड्याशा निराळ्या रीतीनें गेतला आहे, तो असा. एकदां निवृत्ति-ज्ञानदेवादि भावंडें पंढरीस पांडुरंगदर्शनास

---

१ टिचकीच्या ऐवजीं थापटण्याचा उल्लेख **पंतां**नीं केला आहेः—

**" सद्गुरुअनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पटणें।**
**गोरा संत परीक्षी मस्तकिं हाणूनि सर्व थापटणें॥**

सन्मार्गमाला.

आलीं असतां, देवाजवळ असलेल्या नामदेवांसही त्या तीन्ही बंधूंनीं प्रदक्षिणापूर्वक नमस्कार केला. तेव्हां नामदेव मोठ्या अभिमानानें म्हणाले, " मी नेहमीं पांडुरंगाजवळ असतों. हे जसे देवभक्त तसा मीही देवभक्त. परंतु मला जसें नित्य विठ्ठलाचें सान्निध्य आहे तसें यांना कोठें आहे ? तेव्हां, यांनीं मला नमस्कार करावा हें योग्यच आहे, कारण माझा तसा अधिकारच आहे; पण मी मात्र यांना उलट नमस्कार करणार नाहीं. " नामदेवांचें हें औद्धत्य पाहून मुक्ताबाईस थोडासा राग आला. ती नामदेवांस म्हणाली. " तुला देवाचें नित्य सान्निध्य असून, तुझा अहंकार अद्याप गेला नाहीं—

**अखंड जयाला देवाचा शेजार । कां रे अहंकार नाहीं गेला १ मान अपमान वाढविसी हेवा । दिवस असतां दिवा हातीं घेसी २ परब्रह्मासंगें नित्य तुझा खेळ । आंधळयाचे डोहळे कां बा झाले ३ कल्पतरूतळवटीं इच्छिली ते गोष्टी । अद्यापि नरोटी राहिली कां ४ घरीं कामधेनु ताक मागूं जाये । ऐसा द्वाड आहे जगामाजी ५**

अशा रीतीनें नामदेवांची कानउघाडणी करून मुक्ताबाई म्हणाली, "पंढरपुरास येणारे सगळे संत तुझ्या पायांवर डोकीं ठेवीत असतील, माझ्या बंधूंनींही पांडुरंगाबरोबरच तुलाही नमस्कार केला, पण मी मात्र, तुझा हा अहंकार नाहींसा झाल्याशिवाय, तुला नमस्कार करणार नाहीं. " मुक्ताबाईचें हें सडेतोड भाषण ऐकून, ज्ञानदेवादि बंधूंस थोडेंसें वाईट वाटलें. ते मुक्ताबाईस म्हणाले, यानें भक्तीच्या बळानें देव आपला ऋणाईत केला आहे, याला ज्ञानाची काय जरूरी ? मुक्ताबाई म्हणाली, ज्ञानाशिवाय भक्ति व्यर्थ आहे.

**झालासी हरिभक्त तरि आम्हा काय । आंतली ती सोय न ठाउकी ॥ घेउनि टाळ दिंडी हरिकथा करिसी । हरिदास म्हणविसी श्रेष्ठपणें ॥ गुरुवीण तुज नव्हेचि गा मोक्ष । होशील मुमुक्ष साधक तूं ॥ आत्मतत्त्वीं दृष्टि नाहींच पां केली । तंववरि ब्रम्हबोली बोलुनि काय ॥ तुझें रूप तुवां नाहीं ओळखिलें । अहंतेतें धरिलें कासयासी ॥**

या नामदेवानें भक्तीचें नुसतें स्तोम माजविलें आहे, पण याचें हृदय अद्याप कोरडें ठणठणीत आहे. संतांना मान देण्यास जो तयार नाहीं, त्यानें इतके दिवस देवाजवळ

राहून काय केलें ? खापराला परीस लावल्यानें त्याचें सोनें थोडेंच होणार ? या चंद-नाच्या वृक्षाला अहंतासर्पानें जोंपर्यंत वेढे दिलेले आहेत, तोंपर्यंत त्याचा संसर्ग होणें धोक्याचें आहे. चांगदेवही एका काळीं असाच घमेंडानंदन होता—

**चौदाशें वरुषें शरीर केलें जतन । बोधावीण शीण वाढविला १ नाहीं गुरुमंत्र नाहीं उपदेश । परमार्थासी दोष लावियेला २ स्वहिताचें कारण पडियेलें जेव्हां । शरण आला तेव्हां अलकापुरीं ३ गैनीनाथें गुज दिलें निवृत्तीला । निवृत्तीचा झाला ज्ञानदेव ४ ज्ञानदेवीं बीज वाढविलें जनीं । तेंचि आम्ही तुम्ही संपादिलें ५ म्हणे मुक्ताबाई तिहीं लोकीं ठसा । नामदेव ऐसा राहिला कां ६**

स्त्रियांची जात अगोदरच थोडीशी वाचाल, त्यांत मुक्ताबाई तर अगदींच कोंवळी पोर, तेव्हां आपल्या वडील बंधूंचा नामदेवांकडून झालेला अपमान तिनें मुकाट्यानें सहन केला नाहीं यांत आश्चर्य तें काय ? तिचें वरील मर्मभेदक भाषण नामदेव मुकाट्यानें ऐकत होते. पण, निवृत्तिनाथांस तें ऐकून बरें वाटलें नाहीं. ते मुक्ताबाईस म्हणाले, " ताई, संतांस आपण असें बोलूं नये. संतांची भेट होणें हें मोठें भाग्य आहे. ह्या पंढरपुरांत जे लोक वास करतात ते धन्य होत. त्यांचे घरीं आपण श्वान होऊन रहावें. या नामदेवानें आपल्या अतुल भक्तिबलानें पांडुरंग आपला सखा केला आहे. तर अशा अधिकारी पुरुषाला ' अरे तुरे ' म्हणून कठोर शब्द बोलणें बरोबर नाहीं. येवढा वेळ बोललीस तें बोललीस, पण आतां त्याला नमस्कार करून त्याची क्षमा माग. " मुक्ताबाई म्हणाली, " तें कांहीं नाहीं. यानें सद्गुरूचा उपदेश घेतल्या-शिवाय याचा अहंकार नाहींसा होणार नाहीं. म्हणून याला चार मंडळीसमोर नेऊन याचा गर्वपरिहार केला पाहिजे. म्हणजे हा आपोआप ताळ्यावर येईल. " शेवटीं सर्वानुमतें असें ठरलें कीं, आळंदी येथें ज्ञानदेवांच्या गुंफेंत सर्व संतांची एक सभा भरवावी व त्या सभेंत गोरोबा कुंभारांकडून, जमलेल्या सर्व संतांची परीक्षा करवावी. त्या परीक्षेंत जर नामदेव उत्तीर्ण झाले आणि गोरोबांनीं त्यांना ' पक्का घट ' म्हणून ठरविलें तर मग त्यांचें संतत्व सर्वांनीं मान्य करावें. मग गोरोबांस बोला-वण्याची कामगिरी मुक्ताबाईकडे सोंपविण्यांत आली. प्रत्यक्ष आदिमायेचा अवतार म्हणजे मुक्ताबाई. ती गोरोबांकडे सामान्य माणसांप्रमाणें चालत गेली नाहीं. तर—

**मोतियाचा चुरा फेंकिला अंबरीं । विजुचिया परी कीळ झालें १ जरी पीतांबरें नेसविलीं नभा । चैतन्याचा गाभा नीळबिंदु २ तळीपरी पसरे शून्याकार झालें । सर्पाचींही पिलें नाचूं लागे ३ कडकडोनि वीज निमाली ठायींचे ठायीं । भेटली मुक्ताबाई गोरोबाला ४**

" मुक्ताबाई जेव्हां गोरोबांकडे जाण्यास निघाली तेव्हां आकाशांत जसा मोत्यांचा चुरा फेंकावा किंवा एकदम विजेचा लकलकाट होऊन आकाश प्रकाशमान् व्हावें तसा देखावा दिसला ! जणूं काय सगळ्या आकाशाला जरीचीं पीतांबरेंच नेसविलीं आहेत. " यावरून, मुक्ताबाई गोरोबांकडे गेली, ती योगविद्येच्या जोरावर, आकाशमार्गानें विजेप्रमाणें तळपत गेली असें दिसतें. असो. पुढें नामदेवांसह सर्व मंडळी ज्ञानदेवांच्या गुंफेंत जमा झाल्यावर, पूर्वसंकेताप्रमाणें **गोरोबा काका** हातीं कुंभाराचें थापटणें घेऊन, संतांची परीक्षा करावयास निघाले. प्रथम त्यांनीं **निवृत्तिनाथां**च्या मस्तकावर थापटणें मारलें. त्यांनीं हूं कीं चूं देखील केलें नाहीं. तेव्हां गोरोबा म्हणाले, " हा घट पक्का झाला आहे. " मग त्यांनीं **ज्ञानदेवां**च्या मस्तकावर थापटण्याचा प्रहार केला व त्यांनींही तो निमूटपणें सोसला. तेव्हां गोरोबांनीं, " हाही अगदीं पक्का घट आहे." असें म्हणून अनुक्रमें **सोपान** व **मुक्ताबाई** यांच्याही मस्तकावर थापटणें मारलें व " हे दोन्ही घट पक्के आहेत, " असें सांगितलें. शेवटली पाळी नामदेवांवर आली. **गोरोबां**नीं त्यांच्या मस्तकावर थापटणें लगावतांच ते डोकें चोळून एखाद्या मुलासारखे रडूं लागले. ते रडत रडत म्हणाले, " मुक्ताबाई, घरीं आलेल्या पाहुण्याचा तूं फार चांगला सत्कार केलास ! मला मुद्दाम घरीं बोलावून, या म्हाताऱ्याकडून लांकडानें माझें डोकें फोडविलेंस ! तुमच्या बाह्य साधुत्वास भुलून मी येथें आलों, पण तुम्ही साधु नसून शुद्ध कैकाडी आहांत अशी माझी आतां खात्री झाली. माझा झाला येवढा सन्मान पुरे झाला, आतां येथून जिवंतपणें येकदांचा निसटलों म्हणजे मिळविली ! " पुढील हकीकत मूळ चरित्रकाराच्या भाषेंत सांगितलेली बरी—

---

**१ " गोरा जुनाट पैं जुनें । हातीं थापटणें अनुभवाचें १ "**
**" परब्रम्ह म्हातारा निवाला अंतरीं । वैराग्याचे वरी पाल्हाळला २ "**
**" सोहं शब्दें विरक्ति उरली अंबरीं । पाती अणुभरी पाहिलेपण ३ "**
**" म्हणे मुक्ताबाई घालुं या लोटांगण । जाऊं या शरण अव्यक्तासी ४ "**

**" उद्विग्न मनीं करी दीर्घ ध्वनी । नाहीं माझे कोणी सखे ऐसे १**
**वैराग्य कसोटी सोसवेना घाव । पळावया पाव मागें काढी २**
**झाले चाळाचूळ मनांत चंचळ । युगाऐसें पळ वाटतसे ३**
**नामा म्हणे जावें पळोनियां आतां । संतसंग होतां भाजितील ४ "**

नामदेवांस असें वाटलें कीं, गोरोबांनीं ज्या अर्थी आपणास ' कच्चा घट ' ठरविला आहे, त्या अर्थी, आपला ' पक्का घट ' बनविण्यासाठीं हे आपणास कदाचित् भाजतील देखील ! आणि या त्यांच्या भीतींत **मुक्ताबाई**च्या पुढील भाषणानें आणखी भर पडली—

**अंतर बाहेर भाजूं आम्ही कुंभ । भरूं निरालंब सगळेंचि १ अहं सोहं दोन्ही उर्ध्व लावूं फुंकणी । नवद्वारें फुंकोनी जाळ करूं २ जीवित्व काढोनी शिव घडूं अंगा । प्रिय पांडुरंगा आवडेल ३ म्हणे मुक्ताबाई पळायाचा पाहीं । आसन स्थिर नाहीं नामयाचें ४**

हें ' भाजण्या ' विषयीचें आध्यात्मिक गूढ भाषण भोळ्या नामदेवांस मुळींच समजलें नाहीं. त्यांनीं कोणाचाही निरोप वगैरे न घेतां, जी एकदम धूम ठोकली ती इंद्रायणीपर्यंत ! घाईघाईनें इंद्रायणी एकदांचीं कशीबशी उतरून, एकदोन दिवसांत ते पंढरपुरास जाऊन पोंचले—

**न पुसतां संतां निघाला तेथुनी । पैलपार इंद्रायणी प्राप्त झाला १ मागें पुढें पाहे पळतो तांतडी । आला उडाउडी पंढरीसी २ कवळोनि कंठीं विठ्ठल हे मूर्ति । " नको देऊं हातीं निवृत्तीच्या ३ ज्ञानदेव सोपान पाठविले कोरे । जुनाट म्हातारा जाळों आला ४ मुक्ताबाईनें तेथें माजविली कळी । हे संतमंडळी कपटी तुझी ५ नामा म्हणे देवा आणिलें पूर्व दैवें । गेलों असतां जीवें सगळाचि ६**

पंढरपुरांत येतांच नामदेव अगोदर देवळांत गेले आणि पांडुरंगमूर्तीच्या गळ्यास मिठी मारून म्हणाले, " देवा, मला पुनः निवृत्तिनाथाच्या हातीं देऊं नको. ज्ञानदेव आणि सोपान यांना पक्के घट ठरवून मला त्या म्हाताऱ्यानें ( गोरोबांनीं ) कच्चा घट

ठरविला व माझा पक्का घट करण्यासाठीं तो जुनाट थेरडा मला भाजणार होता. माझें पूर्वपुण्य सबळ होतें म्हणूनच रे देवा ! त्या संकटांतून मी बचावलों, नाहीं तर प्रसंग मोठा कठीण होता. ती सगळी मंडळी माझा शोध करीत इकडे येतील कीं काय अशी अद्याप मला भीति वाटत आहे. आणि त्याप्रमाणें जर ते खरोखरच आले, तर देवा, तूं मला त्यांच्या हातीं देऊं नकोस. ते इतके भयंकर आहेत कीं,

**वटारोनि डोळे पाहती आभास । मज त्याचा भास कळों नेदी १ भाजा भाजा म्हणोनि उठलीं एकसरां । मग म्यां बाहेरां गमन केलें २ आतां आजवरी घाल त्यांचे हातीं । होऊं पाहे माती जीवित्वाची ३ अभयाचें दान द्यावें बा श्रीहरी । दुर्बळ बाहेरी घालूं नये ४ समर्था लांच्छन लागतें नांवाचें । न जाणों देवाचें असेल कांहीं ५ नामा म्हणे नांव पतितपावन । तेया बोला उणें आणूं नये ६**

नामदेवांचें हें केविलवाणें भाषण ऐकून देवास हंसूं आलें व थोडेंसें वाईटही वाटलें. निवृत्तिज्ञानदेवांसारख्या पूर्णावस्थेस पोंचलेल्या सत्पुरुषांस भिऊन हा मजकडे पळून आला तेव्हां याला काय म्हणावें ? हा जर त्या संतांस नम्रतापूर्वक शरण गेला असता, निदान तेथून पळून तरी आला नसता, तर याला उपदेश देऊन, माझ्या सत्य स्वरूपाची ओळख त्यांनीं याला करून दिली असती. पण झाल्या गोष्टीस आतां काय उपाय ? असा विचार करून पांडुरंगानें नामदेवांस, **विसोबा खेचरां**कडे जाऊन त्यांचा उपदेश घेण्यास सांगितलें.

आतां, निवृत्ति ज्ञानदेवादिकांच्या डोक्यावर गोरोबांनीं थापटणें मारलें तेव्हां तें दुःख त्या चौघानींही निमूटपणें कसें सहन केलें आणि नामदेवांच्या कपाळावर थापटणें बसतांच त्यांनाच इतकें दुःख कसें झालें हा थोडासा विचार करण्यासारखा प्रश्न

---

**१ " संतांसी विन्मुख झाला जो गव्हार । नाहीं आतां थार इहपरलोकीं नाहीं घेतला वेड्या संतांचा अंगवळा । झोंप बैसली डोळां अज्ञानाची भ्रांतीनें तुझी पुरविली पाठी । सज्जनाच्या गोष्टी कडू झाल्या हाता आला लाभ गमाविला सारा । भुललासी गव्हारा भ्रमभूली मोहसर्पें तुझें व्यापिलें अंग । म्हणे पांडुरंग काय आतां "**

आहे. ज्ञानदेवादि भावंडें ज्ञानी आणि योगी होतीं, आणि योग्याला देह आणि आत्मा यांचें पृथक्करण करितां येत असल्यामुळें, नुसत्या देहदुःखाची परवा योगी फारशी करीत नाहीं. " देहेदुःख तें सूख मानीत जावें " असें समर्थ रामदासस्वामींनीं म्हटलें आहे. विदेही जनकाचा एक पाय अग्नींत जळत होता व दुसऱ्या पायास नवनीत मर्दन केलें जात होतें, आणि या दोन्ही गोष्टींचें त्यास कांहीं सुखदुःख वाटत नव्हतें, अशी जी एक पौराणिक कथा प्रसिद्ध आहे, तिचें रहस्य तरी हेंच होय. परंतु नामदेव हे नुसते भक्त होते; आपल्या देहांतच देव आहे हें त्यांस माहीत नव्हतें. त्यामुळें, देहाचे जे सुखदुःखादि धर्म त्यांपासून ते अलिप्त नव्हते. अर्थात्, त्यांच्या डोक्यावर गोरोबांनीं थापटण्याचा फटका लगावतांच सामान्य माणसाप्रमाणें त्यांस दुःख होऊन ते रडूं लागले. ज्ञानी आणि भक्त यांच्यांतील अंतर दाखवून, भक्तापेक्षां ज्ञानी श्रेष्ठ आहे हें सिद्ध करण्यासाठींच हें गोरोबांचें थापटणें पुढें आणलें गेलें आहे. आणि त्या जुन्या कालीं म्हणूनच अशा गोष्टी घडल्या. त्या कालचे लोक भोळे आणि श्रद्धावान् होते. परंतु हल्लींच्या कालचे एखादे **गोरोबा** आपल्या घरीं जमविलेल्या संतमहंतांची थापटण्याच्या आघातानें जर अशी परीक्षा घेऊं लागले, तर अर्वाचीन मुमुक्षु आणि संत, पोलिसांच्या मदतीनें किंवा वकिलाच्या साहाय्यानें आपलें खरें स्वरूप कसें व्यक्त करतील, हें सांगावयास नकोच. असो.

गुरु करण्याविषयीं नामदेवांस पांडुरंगानें जो उपदेश केला, त्याच्या मुळांत ६२ ओव्या आहेत. त्यांत ढोंगी गुरूंचेंही वर्णन असून, लबाड शिष्याचाही परामर्ष घेतलेला आहे. नामदेवांनीं भगवंतास विचारलें:—

**नामा म्हणे तुजसी। पावावया सेविजे सद्गुरूसी।**
**तो तूं रोकडा जोडिलासी। आतां सद्गुरूसी काय काम॥**
**फळ तरुवराशिखरीं। म्हणोनि आरोहण कीजे त्यावरी।**
**तें फळ अवचितां जोडिलें करीं। मग तयावरी कासया चढावें॥**

नामदेवांनीं देवांस विचारलेला ह्रा प्रश्न आणि अर्जुनानें, भगवद्गीतेंत श्रीकृष्णास विचारलेला प्रश्न, हे जवळजवळ एकच आहेत. प्रत्यक्ष पांडुरंग नामदेवांबरोबर बोलत होता आणि प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्ण अर्जुनाचा सखा आणि सारथी होता, परंतु भगवंताच्या सत्य आणि शुद्ध स्वरूपाची ओळख दोघांसही नव्हती. देव आमच्याशीं प्रत्यक्ष बोलतो चालतो, मग ब्रह्मज्ञानाची आम्हांस काय जरूर, ह्रा दोघांचाही एकच

युक्तिवाद होता व सकृद्दर्शनीं तो कोणासही निरुत्तर करणारा आहे यांत संशय नाहीं. परंतु पांडुरंगानें नामदेवांच्या प्रश्नास कोणतें उत्तर दिलें ?

**" मग श्रीहरि म्हणे अज्ञान । सांडून सेविजे सद्गुरुचरण ।**
**तुझ्या प्रेमें मायासोंग धरून । लटिका तुजपाशीं मी खेळें ॥**
**जंव सद्गुरूचें नाहीं सेवन । तंव मी जैसें स्वप्नींचें धन ।**
**तुझें न तुटे भवबंधन । सद्गुरुआज्ञेवांचुनी ॥ "**

देव म्हणाला, "नामदेवा, तुझ्या विशुद्ध प्रेमास वश होऊन मी तुजबरोबर खोटेच मायावी खेळ खेळतों. परंतु, जोंपर्यंत तुजवर सद्गुरुकृपा झाली नाहीं, तोंपर्यंत स्वप्नांतल्या द्रव्यासारखा मी तुला आहें." हें भाषण ऐकून, नामदेव सद्गदित झाले आणि "देवा, मी कोणता गुरु करूं ?" असें भगवंतास त्यांनीं विचारलें. पांडुरंगानें सांगितलें, ढोंगी गुरु आणि खरा साधु यांचीं लक्षणें मी तुला सांगतों; त्या लक्षणांवरून तूं एखादा अधिकारी सत्पुरुष शोधून काढ आणि त्याला शरण जाऊन त्याचा उपदेश घे.—

**" भक्तीचें नेणें लक्षण । कृपामंद दयाहीन ।**
**इतरांचे अवगुण । अखंड मुखें जल्पती ॥**
**मी एक जाणता सर्वांठायीं । सर्व शिकविलें म्यांचि पाहीं ।**
**ऐसें बोलती जनप्रवाहीं । महंतीलागीं ॥**
**देखिलिया सज्जन । त्यासी न करी सन्मान ।**
**सभा देखोनियां छळण । करी करवी तयाचें ॥**
**लांडें लटिकें गद्यपद्य । पुसोनि होती श्लाघ्य ।**
**नेणे तरी हांसोनि निंद्य । बोलती तयासी ॥**
**तो जरी सांगे खरें । त्यासी बोलती बरें बरें ।**
**सभाजनांसी नेत्रद्वारें । अशुद्धता दाविती ॥**

\+ \+ \+ \+

**शिष्य करितां उल्हासती । शिष्य होईं म्हणोनि उपदेशिती ।**
**नाना परी बोधिती । सेवेलागीं ॥**
**शिष्य करिती बहुवस । त्यांच्या सेवेची करिती आस ।**
**जो न भजे त्यास । शिव्याशाप देताती ॥**
**मंत्र तंत्र उपदेशिती । ध्यान आसनीं गोंविती ।**
**देवा ब्राह्मणां न भजती । आचारभ्रष्ट जे ॥**

धातुविद्येची धरिती गोडी । जारणमारणाची अति आवडी ।
विषयवासनेची हुंडी । अखंड जीवीं ॥ "

हीं लबाड, ढोंगी आणि बकध्यानी गुरूंचीं लक्षणें सांगितलीं. असल्या गुरूंपासून मुक्षूनें नेहमीं चार पावलें दूर रहावें. आतां खऱ्या साधूंची लक्षणें ऐका:—

ज्यासी गुरुत्वाचें नाहीं काज । शिष्य भजतां वाटे लाज ।
उदासवृत्ति सहज । निर्मळ भोळा ॥
निंदा स्तुति समान । बोलती भेदिती कठिण वचन ।
कधीं न होती क्रोधायमान । कवणाहीवरी ॥
जे नेणती खरें खोटें । समान वाटती सानमोठे ।
सुख दुःखाचे चपेटे । न शिवती कदा काळीं ॥
शिष्य करितां आळस चित्तीं । केलिया सर्वस्व निरोपिती ।
कांहीं थोरीव नाहींच चित्तीं । महत्वाची ॥
सज्जन देखोनि आनंदती । त्यांचे गुणागुण न विचारिती ।
जीवें भावें इच्छिती । साधुसंग ॥

\+ \+ \+

ऐसा साधु भेटेल तुज । तरी मीच होवोनि पावसी मज ।
जाईल सर्व संदेह आज । आपेंआप नाम्या ॥

प्रमाणें नामदेव आणि विठ्ठल यांचीं आणखी बरींच प्रश्नोत्तरें झाल्यावर, देवानें त्यासाठीं विसोबा खेचरांचें नांव नामदेवांस सुचविलें.

**विसोबा खेचर** हे आंवढ्या नागनाथ येथें रहात असत. तेथें त्यांचा शोध ीत नामदेव गेले. लोकांनीं त्यांस नागनाथांच्या देवळांत, म्हणजे नामदेवांस ज्या ाणीं उपरति झाली होती त्या ठिकाणीं, जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नामदेव ळांत जाऊन पाहतात तों तेलानें लडबडलेल्या नव्या वाहणा पायांत घातलेला एक ठतकुष्ट असा वृद्ध पुरुष शंकराच्या पिंडीवर आपले पाय ठेवून अस्ताव्यस्त पसर- ा त्यांच्या दृष्टीस पडला. त्या वृद्धाच्या अंगावरील जखमांतून पू वहात असल्यामुळें च्या सर्वांगावर माशा घोंगावत होत्या व दुर्गंधी इतकी सुटली होती कीं नाकास : लावल्यावांचून त्याच्याजवळ जाण्याची सोय नव्हती. आपल्या भावी गुरुवर्यांची शोचनीय स्थिति पाहून नामदेवांस सखेदाश्चर्य वाटलें. ते विसोबांपाशीं जाऊन त म्हणाले, " अहो महाराज, नीट उठून बसा, आणि पिंडीवर आपले पाय पडले

आहेत ते काढून घ्या." विसोबा म्हणाले, "बाबा रे, मी वृद्ध असल्यामुळें माझीं इंद्रियें माझ्या स्वाधीन नाहींत. यासाठीं तूंच कृपा करून, पिंडीवरून माझे पाय काढून, जेथें देव नाहीं अशा जागीं ठेव." नामदेवानीं, त्याप्रमाणें, पिंडीवरून त्यांचे पाय खालीं काढून दुसऱ्या जागीं ठेविले; व पाहतात तों पायांखालीं दुसरें शिवलिंग ! आश्चर्य-चकित होऊन, विसोबांचे पाय त्यानीं पुनः दुसरीकडे उचलून ठेवले तों तेथेंही शिवलिंग ! हा चमत्कार पाहून नामदेव अगदीं विस्मित झाले व देवानें ज्याच्याकडे मला उपदेशार्थ पाठविलें, तोच हा अधिकारी पुरुष होय, असें समजून विसोबांच्या चरणांवर त्यानीं आपलें मस्तक ठेविलें. नामदेव आपल्याकडे उपदेश मागण्यास येत आहेत हें अगोदरच अंतर्ज्ञानानें जाणून, विसोबांनीं तो सगळा विचित्र देखावा केला होता ! व तो देखावा पाहून आरंभीं नामदेव थोडेसे चकल्यासारखे झाले. पुढील अभंग पहाः—

**देवावरी पाय ठेवूनि खेंचर । निजेला परिकर निवांतचि १**
**देखोनियां नामा पावला विस्मया । कैसा हा प्राणिया देवो जाणे २**
**उठीं उठीं प्राण्या आंधळा तूं काय । देवावरी पाय ठेवियेले ३**
**विसोबा खेंचर बोले नामदेवा । उठविलें जीवा कां रे माझ्या ४**
**देवावीण ठाव रिता कोठें आहे । विचारोनि पाहें नामदेवा ५**
**जेथें देव नसे तेथें माझे पाय । ठेवी पां अन्वय विचारूनि ६**
**नामा पाहे अवघा जिकडे तिकडे देव । कोठें रिता ठाव न देखेचि ७**

२

**इतुकें देखोनियां चरणीं घातली मिठी । सांठवण सृष्टीं अवघा देव १**
**तिहीं त्रिभुवनीं आपण व्यापुनी । आनंदें कोंदोनी राहियेला २**
**श्रीगुरूचे पाय जीवें न विसंबत । मनोवृत्तिसहित ओंवाळिले ३**
**डोळियांचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ४**
**जन्ममरणाचें तोडिलें सांकडें । कैवल्याचि पुढें दावियेलें ५**
**कैवल्याचा गाभा विटेवरी उभा । दिसे दिव्य शोभा पांडुरंग ६**
**नामा ह्मणे माझी भक्ति हे माउली । कृपेची साउली केली मज ७**

तात्पर्य, समर्थांनीं म्हटल्याप्रमाणें 'जगीं वावरे जो अणुरेणु कांहीं । रिता ठाव या राघवावीण नाहीं' या सिद्धांताची प्रचीति नामदेवांस **विसोबाखेचरांनीं** तेथल्या तेथें आणून दिली, व पंढरपुरांत असलेला सगुण विठ्ठल कसा सर्वव्यापी आहे हें त्यांच्या निदर्शनास आणलें. या प्रसंगीं विसोबांनीं नामदेवांस जो अध्यात्मो-

पदेश केला तो नामदेवी गाथ्यांतील १७ अभंगांत ग्रथित केलेला आहे. ह्या अभंगांच्या अखेरीस जरी खेंचरांचें नांव आहे आणि भाषाही बरीच जुनी असून, त्यांतला उपदेशही विसोबांसारख्या अधिकारी पुरुषाच्या तोंडीं जरी शोभण्यासारखा आहे तरी हे अभंग खुद्द विसोबा खेंचरांनींच लिहिलेले असतील अशी ग्वाही मी देऊं शकत नाहीं. तथापि त्यांतले चार अभंग नमुन्यादाखल येथें देतों.

सड ना सांजावण खुंटा ना दावें । गाये ना वासरूं काये तेथें व्हावें ॥ १ ॥ आपे गाय आपण । आपण दोहे आपण प्रकाश ॥ २ ॥ खेंचर विसा दोहे पांचही गायी । लेकी नाहीं तेथें कैंचा घरजांवई ॥ ३ ॥

२

मेघेंवीण जळ कीं जळेंवीण पूर । परि नाहीं उतार तेथें नख न भिजे ॥ १ ॥ आहे तें तें बुडे नाहीं तें तें तरे । लटाकियाचें खरें वाढविसी ॥ २ ॥ म्हणे खेंचर विसा तूं झालासी पिसा । यदृश्याची आशा सोडीं नाम्या ॥ ३ ॥

४

पर्वतप्राय पापराशी होती दग्ध । वाचेसी मुकुंद उच्चारितां १
अच्युत श्रीहरि केशव नरहरि । माधव हरहरि रामकृष्ण २
नामाचें साधन करिशील पूर्ण । तें प्रपंचाचें भान उरों नेदी ३
उदासीन वृत्ती आचरावें कर्म । नाहीं देहधर्म गुणमाया ४
ऐसा हा अनकळित मार्ग साधेल तुज।खेचर विसा गुज सांगे नाम्या५

४

आप तेज वायु पृथिवी गगन । मेलें तें कवण पांचामध्यें १
आह्मां मरण नाहीं मरशील काई । आत्मवस्तु पाहीं श्रीगुरुमुखें २
जिताचि मरण आलेंसे हाता । मरण बोलतां लाज नये ३
खेचर विसा म्हणे आह्मां मरण नाहीं। कैसें मरण पाहीं आलें नाम्या४

विसोबा खेचरांनीं आपणास उपदेश दिला या गोष्टीचा उल्लेख नामदेवांनीं आपल्या कवितेंत पुष्कळ ठिकाणीं केला आहे. विसोबांच्या सहवासांत कांहीं दिवस राहून नामदेव परत पंढरपुरास आले. तेव्हां, गुरूचा उपदेश त्यांच्या मनास कसा काय पटला

आहे हें पाहण्यासाठीं, पांडुरंगानें, एके दिवशीं, ते जेवीत बसले असतां, श्वानरूपानें अकस्मात् झडप घालून त्यांच्या ताटांतली भाकरी पळविली ! परंतु, नामदेवांस त्या-बद्दल बिलकुल वाईट वाटलें नाहीं; उलट, हा कुत्रा नसून देव आहे हें त्यांनीं तत्काळ ओळखलें व हातांत तुपाची वाटी घेऊन 'देवा, कोरडी भाकर खाऊं नकोस, हें तूप घे' असें म्हणत त्या कुत्र्याच्या मागून ते धांवत चालले. तेव्हां, पांडुरंगाची खात्री झाली, कीं 'सर्व भूतीं भगवद्भाव' हें जें साधुत्वाचें मुख्य लक्षण तें याच्या अंगीं पूर्णपणें बाणलें आहे. अशा रीतीनें आत्मतृप्त झालेल्या सत्पुरुषाचें जेवण कसें असतें हें नामदेवानींच पुढील अभंगांत सांगितलें आहेः—

**भक्ति हेंचि भावे परब्रह्म पक्वान्न । गुरुमुखें जेवण जेवियेलें १**
**अनुभव भात लय लक्ष कढी । जेवणार गोडी घेत असे २**
**सुख शांति शाखा भावार्थ हा वडा । जेवणार गाढा आत्माराम ३**
**दया क्षीरधारीं शांति पुरणपोळी । घृत हें कल्लोळीं प्रेम माझें ४**
**विषयाचा गुरळा थुंकोनी सांडिला । नामा आंचवला संसारासी ५**

अशा रीतीनें नामदेव हे आतां अगदीं पूर्णावस्थेस गेलेले संत झाले. परंतु त्यामुळें, पंढरपुरच्या विठ्ठलाविषयींचा त्यांचा भक्तिभाव किंवा सगुण हरिभजनाची त्यांची आवड कमी झाली असेल असें मात्र कोणी समजूं नये. आणि अशी सूचना देण्याचें कारण हें कीं, नामदेवांस खेंचरांचा उपदेश झाल्याबरोबर त्यांनीं एकदम मूर्तिपूजेचा निषेध करण्यास प्रारंभ केला असें खोटेंच भासविण्याचा प्रयत्न, कांहीं बनावट अभं-गांत, कांहीं उपद्व्यापी लोकांनीं केला आहे. पुढील अभंग पहाः—

**पाषाणाचा देव बोलेचिना कधीं । हरी भव्यवाधी केवीं घडे १**
**दगडाची मूर्ति मानिला ईश्वर । परी तो साचार देव भिन्न २**
**दगडाचा देव इच्छा पुरवीत । तरी कां भंगत आघातानें ३**
**पाषाण देवाची करिती जे भक्ति । सर्वस्वा मुकती मूढपणें ४**
**प्रस्तराचा देव बोलत भक्तांतें । सांगते ऐकते मूर्ख दोघे ५**
**ऐशांचें माहात्म्य जे कां वर्णिताती । आणि म्हणविती तेणें भक्त ७**
**धोंडा घडोनियां देव त्याचा केला । आदरें पूजिला वर्षें बहु ८**
**तरी तो उतराई होय केव्हां काई । बरवें हृदयीं विचारा हें ९**
**धोंडा पाण्यावीण नाहीं देव कोठें । होतां सान मोठें तीर्थ क्षेत्र १०**

**द्वादशीचे गांवीं जाहला उपदेश। देवावीण ओस स्थळ नाहीं ११**
**तो देव नामया हृदयीं दाविला। खेचरानें केला उपकारू हा १२**

या अभंगांच्या शेवटीं नामदेवांचा शिक्का मोर्तब असल्यामुळें, नामदेव हे मूर्तिपूजेचे अगदीं कट्टे द्वेष्टे होते अशीच कोणाचीही समजूत होईल. परंतु एक तर वरील अभंगाची भाषा अगदींच अर्वाचीन आहे व दुसरी महत्वाची गोष्ट ही कीं, विसोबा खेचरांचा उपदेश नामदेवांस आंवढ्यानागनाथ येथें झाल्याचा मूळ चरित्रांत उल्लेख असतां, वरील अभंगांत बार्शी येथें हा उपदेश झाला असें म्हटलें आहे. शिवाय, 'प्रस्तराचा देव बोलत भक्तांतें। सांगते ऐकते मूर्ख दोघे' हे जर खरोखर नामदेवांचेच उद्गार असतील तर पांडुरंग नामदेवांबरोबर बोलत होता, पाषाणमूर्तीनें बालनामदेवाचा भक्तिभाव पाहून त्याच्या हातचें अन्न खाल्लें, विसोबा खेचरांच्या पायांखालीं लिंगेंच लिंगें झालीं वगैरे सर्व गोष्टी निखालस खोट्या मानाव्या लागतील व पंढरपुर आणि पांडुरंग यांचें माहात्म्य वर्णन करणारे जे शेंकडों अभंग नामदेवांच्या नांवावर आज सहाशें वर्षें महाराष्ट्रभर प्रसिद्ध आहेत ते सगळे प्रक्षिप्त मानावे लागतील. असो.

**विसोबा** खेचरांचा उपदेश घेतल्यावर आपणास कशी कृतार्थता वाटली, हें नामदेवांनीं कांहीं अभंगांत सांगितलें आहे, त्यांतले दोनच अभंग येथें देतोः—

**सद्गुरूसारिखा सोइरा जिवलग। तोडिला उद्वेग संसारींचा १**
**काय उतराई होऊं कवण्या गुणें। जन्मा नाहीं येणें ऐसें केलें २**
**माझें सुख मज दावियेलें डोळां। दिधली प्रेमकळा नाममुद्रा ३**
**डोळियाचा डोळा उघडिला जेणें। लेवविलें लेणें आनंदाचें ४**
**नामा म्हणे निकी सांपडली सोय। न विसंबें पाय खेचराचे ५**

२

**सुखाचा सुखतरु सद्गुरू खेचर। स्वरूपसाक्षात्कार दाखविला १**
**विठ्ठल पाहतां मावळलें मन। ध्यानीं भरले नयन तन्मय झाले २**
**निमालें मी माझें होतें तें मजमाजी। जळें जळ गिळिलें जयापरी ३**
**तेथें आनंद आनंदु वोळला परमानंदु। नाम्या जाला बोधु विठ्ठलनामें**

एके दिवशीं, नामदेवांची आई **गोणाई** ही त्यांस म्हणाली, "नामदेवा, तूं कांहीं उद्योगधंदा करीत नाहींस, घरीं खर्च तर फार मोठा आहे. मग आतां प्रपंच कसा चालावा ?" नामदेव म्हणाले, "आई, मी व्यापारउद्योग करावयास तयार आहें. पण

भांडवलाशिवाय व्यापार कसा होणार ? " गोणाईनें सांगितलें, " मी तुला कोणाकडून तरी थोडेंसें भांडवल आणून देतें. " मग, पंढरपुरांतच **दादा सावकार** या नांवाचा एक देशस्थ ब्राह्मण होता, त्याजकडे ती कांहीं कर्जाऊ रकम मागण्यास गेली. पण तो सावकार इतका विलक्षण कृपण होता कीं, तो स्वतः धड जेवीत देखील नसे, इतकेंच नव्हे तर पैसा खर्च होईल म्हणून आपल्या बापाचें श्राद्ध देखील त्यानें कधीं घातलें नाहीं. तो, सोनें, चांदी गहाण ठेवून घेऊन भारी व्याजानें लोकांस कर्जाऊ पैसा देत असे. गोणाई जेव्हां त्याजकडे पैसे मागावयास गेली तेव्हां तिजपाशीं गहाण ठेवण्यास कांहीं नव्हतें. परंतु त्या सावकाराला देवानें काय बुद्धि दिली ती त्यानें गहाणाशिवाय, नामदेवांकडून फक्त कर्जरोखा लिहून घेऊन सहा महिन्यांच्या मुदतीनें दोन हजार रुपये देण्याचें कबूल केलें; व त्याप्रमाणें, गोणाईनें नामदेवांकडून तेवढ्या रकमेचा कर्जरोखा त्यास लिहून देवविला व दोन हजार रुपयांची रकम त्याजकडून आणली. ती रकम नामदेवांस देऊन गोणाईनें त्यांस सांगितलें कीं मुद्दल रकमेस धक्का न लावतां, आपला खर्च भागण्यापुरता नफा ज्यांत होईल असा कांहीं तरी धंदा कर. क्षणभर विचार करून, " ठीक आहे " म्हणून नामदेवांनीं सांगितलें. पुढें विचार करितां त्यांस असें वाटलें कीं कोणताही धंदा केला तरी त्यांत नफा किंवा तोटा होणारच. यासाठीं, जो धंदा केला असतां बिलकुल तोटा होणार नाहीं असा जर एखादा धंदा असेल तर तो आपण करावा असें त्यांनीं ठरविलें व ' निष्काम ब्राम्हणभोजन ' हा असा धंदा आहे, असें आपल्या समजुतीप्रमाणें ठरवून, तो धंदा करण्याचा त्यांनीं निश्चय केला. परंतु, गोणाई घरीं आपणास ब्राम्हणभोजन घालूं देणार नाहीं अशी त्यांची खात्री असल्यामुळें, गोदातीरीं ' राक्षसभुवन ' नामक एक क्षेत्र आहे तेथें जाऊन ब्राम्हणभोजन घालावें या विचारानें "मी व्यापार करण्यास जातों, ' असें आईस सांगून व रुपये घेऊन ते घराबाहेर पडले. नंतर राउळांत जाऊन, देवाची परवानगी घेऊन, वाटेंत जे ब्राम्हण भेटतील त्यांस "राक्षसभुवनास चला, म्हणजे तुम्हास भोजन व दक्षिणाही पुष्कळ मिळेल," असें सांगून व त्यांस बरोबर घेऊन ते राक्षसभुवनाकडे चालले. मार्गानें भजन व कीर्तन करीत कांहीं दिवसांनीं ते राक्षसभुवनास जाऊन पोंचले. नंतर तेथील प्रसिद्ध ब्राह्मणांस दंडवत घालून ते त्यांस म्हणाले, " महाराज, माझ्या मनांत येथें ब्राह्मणभोजन घालावयाचें आहे. तरी आपण कृपा करून माझा हेतु सिद्धीस न्यावा. कोणताही पदार्थ कितीही लागला तरी तो पुरविण्यास मी तयार आहें, तरी भोजनांत कोणत्याही प्रकारचें न्यून राहतां कामा नये."ब्राह्मणांनीं ' बरें आहे '

असें सांगितलें. नंतर दुसरे दिवसापासून ब्राह्मणभोजनाचा समारंभ सुरू झाला. त्यांत ब्राह्मणांनीं उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवून, लाडू, जिलब्या, घिवर इत्यादि पक्वान्नांची चांगली सिद्धता केली होती. भोजन आटोपल्यावर त्रयोदश गुणी विडे देऊन शिवाय प्रत्येक ब्राह्मणास एक होन दक्षिणा दिली. रात्रौ हरिकीर्तन झालें. याप्रमाणें समारंभ चालला आहे ही बातमी चोहोंकडे पसरल्यामुळें, आसपासच्या खेड्यापाड्यांतले आणखी पुष्कळ ब्राह्मण वरचेवर राक्षसभुवनास येऊं लागले. समारंभ जसजसा लांबत चालला तसतशी ती बातमी दूरवर जाऊन पंढरपुरास दादा सावकाराच्या कानावर गेली. आपल्याकडून व्यापारासाठीं म्हणून घेतलेली रकम नामदेव ब्राह्मणभोजन घालण्यांत खर्चीत आहे हें ऐकतांच, आतां आपला पैसा हातीं लागत नाहीं असें त्यास वाटलें. म्हणून तो घाईघाईनें पंढरपुराहून निघाला आणि रात्रींचा दिवस करून राक्षसभुवनास आला. त्या दिवशीं भोजनाचा पांचवा दिवस होता. त्या वेळीं ब्राह्मणांनीं नामदेवांस सांगितलें कीं, आज गांवांतला एकही ब्राह्मण जेवल्याशिवाय राहतां कामा नये. तेव्हां त्याप्रमाणें नामदेवांनीं स्वतः गांवभर फिरून गांवांतले एकूण एक ब्राह्मण जमा करून आणले. पानें वाढण्यांत आलीं. आतां सर्व ब्राह्मण मंडळी पानांवर बसणार तों **दादा सावकार** तेथें आला आणि त्रागा करून नामदेवांस म्हणाला, " माझी सगळी रकम व्याजासुद्धां या घटकेस मला मिळाली पाहिजे. " या गडबडीनें ब्राह्मणांचें भोजन खोळंबल्यामुळें, दादा सावकारास रागें भरून, नामदेवांस त्यांनीं संकल्प सोडण्यास सांगितलें. नामदेव, दादा सावकाराकडे बोट दाखवून म्हणाले, " पैशाचे मालक हे आहेत, तेव्हां यांजकडून संकल्प सोडवावा. " तेव्हां ब्राह्मणांनीं दादा सावकारास संकल्प सोडण्यास सांगितलें. परंतु द्रव्य बुडेल या भीतीनें तो संकल्प सोडण्यास कबूल होईना. तेव्हां ब्राह्मण चिडून म्हणाले, " अरे पाप्या, तुला संकल्प सोडण्यास काय हरकत आहे ? " नामदेवानींही त्याला सांगितलें कीं, " महाराज, आपलें द्रव्य आपण घ्या; पण एकदांचा संकल्प सोडा. " असें आश्वासन मिळतांच त्यानें संकल्प सोडला व ब्राह्मण भोजनास बसले. इकडे, सावकारानें आपल्या पैशासाठीं नामदेवांस सारखा तगादा लावला. तेव्हां नामदेवांस मोठी काळजी पडली. ' कांहीं पडतां जड भारी, दासें आठवावा हरि ' याशिवाय दुसऱ्या कोणत्या मार्गाचें अवलंबन संत अशा वेळीं करणार ? अर्थात् नामदेवांनीं पांडुरंगाचा धांवा सुरू केला. क्षणांत भगवंतानें त्यांना अशी प्रेरणा केली कीं, या दादा सावकारास कसेंही करून कंबरभर पाण्यांत ने, म्हणजे मी त्याला काय तो चमत्कार दाखवितों. तेव्हां, त्या-

प्रमाणें, नामदेवांनीं " तुम्हीं मजबरोबर कंबरभर पाण्यांत या, म्हणजे तुमची रकम तुम्हांस देतों, " असें दादा सावकारास सांगितलें व त्यास हातीं धरून थोड्याशा पाण्यांत नेलें. परंतु पुढें जाण्यास दादा तयार होईना, हा धष्टपुष्ट नाम्या आपणास पाण्यांत बुडवून मारील असें त्यास वाटलें. तेव्हां नामदेवांनीं त्यास बळेंच खोल पाण्यांत ओढून नेलें. सावकार बुडूं लागला तेव्हां त्यानें नामदेवांस धरावें म्हणून हात वर केले. पण नामदेव कांहीं त्याच्या हातीं लागले नाहींत. दादानें पाण्यांत गटंगळी खातांच देवानें त्याला एकदम पाताळ दाखविलें. तेथें तो सावध होऊन पाहतो तों नाना तऱ्हांचीं रत्नखचित सुवर्णमंदिरें, सुगंधी फुलबागा, अमृताचीं सरोवरें वगैरे दिसूं लागलीं व तेथील राजा यवन आहे असें त्यास समजलें. अकस्मात् सर्व परिस्थिति बदललेली पाहून तो घाबरून गेला व आपण झोंपेंत असून हें स्वप्न पाहत आहों कीं काय, अशी भ्रांति त्यास उत्पन्न झाली; अशा वेळीं, संतशिरोमणि नामदेव जर येथें येऊन आपणास सोडवील तर सगळ्या रकमेची आपण त्याला सूट देऊं, असाही संकल्प त्यानें केला. तोंच नामदेव त्याच्या दृष्टीस पडले. त्यांस पाहतांच त्याला थोडासा धीर आला. इतक्यांत तेथील राजाच्या ( पांडुरंगानेंच राजाचें रूप घेतलें होतें ) आज्ञेवरून, राजाच्या प्रधानानें दादास राजाकडे नेलें. तेथें तो राजा, प्रधान वगैरे सर्व लोक त्याला यवनांसारखे दिसूं लागले. राजानें दादास आपल्या वाड्यांत जेवावयास बोलाविलें. परंतु यवनांकडें आपण जेवीत नाहीं असें सांगून दादानें कोरडा शिधा मागितला. तेव्हां त्यास कणीक, डाळ, तांदूळ, तूप, साखर इत्यादि सामान व पांच गोंवऱ्या देऊन, ' स्वस्थपणें भोजन करा ' असें सांगण्यांत आलें. तेव्हां, स्वयंपाकास लागण्यापूर्वी स्नान करावें म्हणून दादा सावकार भोगावती नदीवर गेला आणि त्यानें पाण्यांत बुडी मारली. तो पुनः पाण्याच्या पृष्ठ-भागावर येतांच त्याला असें दिसून आलें कीं, हें पाताळ नसून पंढरपूर आहे व ही नदी भोगावती नसून चंद्रभागा आहे ! आपण झोंपेंत आहों, स्वप्नांत आहों, कीं जागृतींत आहों हेंच त्याला कळेना ! त्यानें आपल्या धोतराचा पदर चांचपून पाहिला तों त्यांत बांधलेला शिधा तसाच आहे असें त्याला दिसून आलें. तेव्हां आतां काय होईल तें होवो, असें म्हणून तो पाण्यांतून बाहेर आला व आपल्या घरीं जाण्यास निघाला. निघण्यापूर्वी धोतरांतलें शिध्याचें सगळें सामान त्यानें तेथेंच टाकून दिलें. कांहीं वेळानें तो घरीं जाऊन पोंचतांच, घरच्या मंडळीनें त्याला विचारलें कीं, " नामदेवाकडचे पैसे वसूल झाले का ? " तेव्हां तो म्हणाला, " जीव वांचला येवढेंच भाग्य समजा. " नंतर ओलें धोतर सोडून टाकून

दुसरें धोतर नेसावें म्हणून तो ओलें धोतर सोडण्यास गेला, तों शिध्यापैकीं एक गोंवरी त्यांत राहिली आहे असें त्यास दिसलें. तेव्हां ती गोंवरी त्यानें बाहेर काढली आणि पाहतो तों सबंध गोंवरी सोन्याची ! बाकीच्या चार गोंवऱ्या आपण फेंकून दिल्या, याबद्दल त्याला आतां वाईट वाटलें. परंतु उपयोग काय ? जेवढें आपल्या नशिबीं होतें तेवढें आपणास मिळालें असा विचार करून तो स्वस्थ बसला.

पंढरपुरांत **राका**[1] या नांवाचा एक गुजराथी कुंभार रहात असे. तो मोठा भगवद्भक्त होता. त्याच्या बायकोचें नांव बांका व त्यांना एक मुलगी होती तिचें नांव वंका. ही वंका एके दिवशीं चंद्रभागेवर स्नानास गेली असतां, तेथें **नामदेवां**ची मुलगी धुणीं धूत होती, त्या धुण्याचे शिंतोडे वंकाच्या अंगावर उडाले. तेव्हां वंका तिला म्हणाली, " बाई, जरा हळू धू ना. माझ्या अंगावर तुझ्या धुण्याचे शिंतोडे उडतात. मी स्नान करून देवाची मानसपूजा करीत बसलें आहे. " वंकाचें हें भाषण ऐकतांच नामदेवांची मुलगी फणकाऱ्यानें म्हणाली, " तूं जातीची कुंभारीण, तुला ग येवढं सोवळं कशाला पाहिजे ? म्हणे अंगावर शिंतोडे उडतात ! उडाले तर काय झालं ? तुम्हीं सुखाचा संसार सोडून आतां दारोदार भीक मागूं लागलां आहांत. तुझा बाप पांडुरंगाचा मोठा भक्त म्हणवितो पण त्याची भक्ति निष्काम नसून सकाम आहे. " **वंकानेंही** तशाच फणकाऱ्यानें उत्तर दिलें, " आणि तुझा बाप नामदेव असा काय मोठा निष्काम भक्त लागून गेला आहे, तें आम्हांला ठाऊक आहे. कलियुगांत देव बौद्धरूप असतां तुझ्या बापानें डोकेफोड करून त्याला बोलावयास लाविलें. " कांहीं वेळानें त्या दोन्ही मुली आपापल्या घरीं गेल्या. नामदेवांच्या मुलीनें नामदेवांस नदीवर घडलेली सर्व हकीकत सांगितली. ती म्हणाली, " बाबा, राका कुंभाराची मुलगी तुम्हाला दूषण देत होती. ती म्हणते, कलियुगांत देवानें मौन धारण केलेलें असतां नामदेवानें त्रागा करून देवास बोलावयास लाविलें. पण माझा बाप राका कुंभार असा नाहीं. तो रानांतून लांकडाचे भारे आणून आपला चारितार्थ चालवितो आणि पांडुरंगाची निरपेक्ष भक्ति करितो. " कन्येचें हें भाषण ऐकून नामदेवांस आश्चर्य वाटलें. त्यांनीं देवळांत जाऊन पांडुरंगाला विचारलें, " देवा, तुझा भक्त राका कुंभार हा निष्काम आहे कीं सकाम आहे ? " देवानें सांगितलें, " नाम्या, त्याच्यासारखा वैराग्यशील भक्त दुसरा नाहीं. " **नामदेव** म्हणाले, " पण याविषयीं माझी खात्री

---

१ याचें विस्तृत चरित्र, " **नामदेवांचे समकालीन संत** " या प्रकरणांत पुढें येईल.

झाल्याशिवाय मी हें खरें मानणार नाहीं. " देव म्हणाले, ' ठीक आहे, चल मजबरोबर. " असें म्हणून, नामदेवांस हातीं धरून पांडुरंग अरण्यांत गेला. तेथें, राका, बांका आणि वंका हीं वृक्षांखालीं पडलेलीं शुष्क लांकडें गोळा करीत होतीं. त्यांस पाहून नामदेव रुक्मिणीस म्हणाले, " मातोश्री, हा राका कुंभार पांडुरंगाचा निष्काम भक्त आहे कीं सकाम भक्त आहे याची परीक्षा पाहण्यासाठीं तुम्ही आपल्या हातांतलें एक कंकण मजपाशीं द्या. तें कंकण यांच्या दृष्टीस पडेल अशा एकाद्या जागीं मी ठेवतों. कंकण पाहिल्यावर राकानें जर तें घेतलें तर तो द्रव्यलोभी आहे असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. आणि त्यानें जर तें घेतलें नाहीं तर त्याचा विरक्तपणा कसोटीस लागल्यासारखा होईल. " मग त्याप्रमाणें रुक्मिणीनें दिलेलें दिव्य कंकण घेऊन नामदेवांनीं तें राका कुंभाराच्या सहज दृष्टीस पडेल अशा जागीं ठेविलें व काय मौज होते हें पहात ते दूर उभे राहिले. इतक्यांत राका आणि त्याची स्त्री लांकडें गोळा करीत करीत, ज्या ठिकाणीं तें कंकण ठेवलें होतें त्या ठिकाणीं आलीं. तें देदीप्यमान् रत्नखचित कंकण दृष्टीस पडतांच तीं दोघेंहीं चपापलीं. राका आपल्या बायकोस म्हणाला, " आपण सर्व संसाराचा त्याग करून निरपेक्षबुद्धीनें भगवद्भजनास लागलों, अशा स्थितींत, आमच्या मनास मोह घालण्यासाठीं हें अमूल्य कंकण येथें कोठून आलें असेल बरें ? " त्याची बायको म्हणाली, " आमच्या ईश्वरभजनांत व्यत्यय आणण्यासाठीं हें एक विघ्न उत्पन्न झालेलें दिसतें. परंतु आपणास त्याची काय पर्वा ? " असें बोलून त्या कंकणाकडे तुच्छतापूर्वक पहात तीं दोघेंही तेथून दूर निघून गेलीं. राकाच्या वैराग्यसंपत्तीविषयीं नामदेवांची आतां अगदीं पूर्ण खात्री होऊन चुकली. त्यांनीं प्रांजलपणें पांडुरंगास विचारलें, " देवा, ह्या राका कुंभार तुझा पूर्ण निरपेक्ष भक्त आहे. मग त्याला तूं आपलें प्रत्यक्ष सगुण दर्शन कां देत देत नाहींस ? " पांडुरंग म्हणाला, " चला, आपण त्याला आतांच दर्शन देऊं. " नंतर पांडुरंग, रुक्मिणी आणि नामदेव हीं तिघेंही राकासमोर जाऊन एकदम प्रगट झालीं. राकानें आणि त्याच्या स्त्रीनें प्रभूस आलिंगन देऊन प्रेमाश्रुजलानें सिंचन केलें.

ज्या **गोरा**[1] कुंभार नामक साधूंचा उल्लेख पूर्वीं आला आहे त्यांनीं, घेतलेली शपथ पाळण्यासाठीं एकदां आपले दोन्ही हात छाटून टाकले. पुढें कालांतरानें, सर्व संतांच्या

---

१ याच ग्रंथांत पुढें " **नामदेवांचे समकालीन संत** " या प्रकरणांत **गोरोबांची** त्रोटक माहिति देण्यांत येईल.

सभेंत नामदेवांचें कीर्तन झालें. कीर्तनांत ' विठ्ठल ' म्हणून टाळी देण्याचा प्रसंग येतांच सगळे श्रोते टाळ्या वाजवूं लागले. नामदेवांच्या प्रसादिक वाणीनें तन्मयवृत्ति झालेल्या गोरोबांनींही टाळी वाजविण्यासाठीं आपले थोटे हात वर केले, तों त्यांचे हात पूर्ववत् झाले. हा चमत्कार पाहून सगळ्या संतांस मोठें आश्चर्य वाटलें.

एके दिवशीं **गोणाईस** खोकला येऊं लागला तेव्हां तिनें नामदेवांस औषधासाठीं बाभळीची साल आणण्यास सांगितलें. नामदेव कुऱ्हाड घेऊन एका बाभळीच्या झाडाजवळ गेले आणि त्याची साल काढण्यासाठीं त्यांनीं कुऱ्हाडीचा घाव घातला. घाव बसतांच तें झाड थरथर कांपलें आणि त्याचीं पानें खालीं पडलीं. नामदेवांनीं झाडाची साल काढतांच घाव बसलेल्या जागेंतून रक्तासारखा लाल रस बाहेर येऊं लागला. तें पाहून नामदेवांस फार दुःख झालें. कारण जारज, स्वेदज आणि अंडज यांच्या ठायीं जसा जीव असतो तसा तो उद्भिजांतही असल्यामुळें, आपल्या हातून ही हिंसा घडली असें त्यांस वाटलें. मग, झालेल्या पातकाबद्दल प्रायश्चित्त म्हणून, त्यानीं आपल्या पायावर कुऱ्हाड हाणून, जितकी बाभळीची साल काढली होती तितकें आपल्या पायाचें कातडें काढिलें. त्यामुळें अर्थातच त्यांना फार दुःख झालें, पण आपण घातलेल्या कुऱ्हाडीच्या घावामुळें त्या झाडासही असेंच दुःख झालें असेल, असें समजून स्वतःचें दुःख त्यानीं निमूटपणें सोसण्याचा प्रयत्न केला. परंतु दुःखाच्या वेदना कमी होणार कशा ? नामदेवांची ही स्थिति इकडे पांडुरंगाच्या लक्ष्यांत येतांच तो धांवतच त्या ठिकाणीं आला. पाहतो तों नामदेव बेशुद्ध होऊन पडले असून, त्यांच्या पायांतून रक्त वहात आहे व साल काढलेल्या बाभळींतूनही तांबडा रस निघत आहे ! त्यानें नामदेवांच्या पायावरून व बाभळीच्या झाडावरून आपला कृपाहस्त फिरविला. तत्काळ, तो पाय व तें झाड पूर्ववत् झालीं. नंतर देवानें नामदेवांस सावध केलें. देवास पाहतांच नामदेवांनीं त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. नंतर ते दोघेही नामदेवांच्या घरीं आले. इकडे गोणाईचा खोकला आपोआप थांबला होता.

नामदेवांनीं मेलेली गाय जीवंत केल्याची एक गोष्ट, सर्व जुन्या नामदेवचरित्रांतून वर्णिलेली आढळते. परंतु ही गोष्ट कोणत्या ठिकाणीं घडली याविषयीं मात्र सर्वांची एकवाक्यता नाहीं. कोणी म्हणतो, ही गोष्ट अकबर बादशहाच्या दरबारांत घडली तर कोणी म्हणतो ती बेदर येथें घडली. परंतु, दिल्लीपेक्षां बेदर हेंच ठिकाण नामदेवांस अधिक जवळ असल्यामुळें ही गोष्ट बेदर येथेंच घडली असें

आपण धरून चालूं. आतां नामदेवांच्या कालीं बेदर येथें कोणी मुसलमान बादशाह होता कीं काय हा प्रश्न अलाहिदा आहे, व त्याविषयीं थोडीशी चर्चा आरंभीं उपोद्घातांत केलीच आहे. त्या चर्चेवरून येवढी गोष्ट सिद्ध होते कीं, नामदेवांच्या उत्तरवयांत, बेदर येथें किंवा त्याच्या आसपास दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं, एखादा मुसलमान सरदार किंवा सुलतान आपला अंमल चालवीत असावा. **नाभाजी**कृत **भक्तमाल** ग्रंथांत, नामदेवांनीं दिल्लीच्या बादशहाच्या दरबारीं मेलेली गाय उठविली असें वर्णन आहे; व तीर्थयात्रेसाठीं नामदेव व ज्ञानदेव हे प्रवास करीत होते त्या वेळीं जर ते दिल्लीच्या बाजूस गेले असतील तर ही गोष्ट दिल्ली येथें घडणेंही असंभवनीय नाहीं. तथापि, महीपतींचा पुरावा विशेष ग्राह्य मानून, त्यांनीं आपल्या संतलीलामृतांत ही कथा जशी दिली आहे, तशीच ती मी येथें देतों:—

बेदर येथें एक ब्राम्हण रहात असे, त्यानें पांडुरंगास असा नवस केला होता कीं, जर आपलें इच्छित कार्य निर्विघ्नपणें सिद्धीस गेलें तर आपण नामदेवांस बेदर येथें आणून मोठा उत्सव करूं. पुढें त्या ब्राम्हणाचें कार्य निर्विघ्नपणें तडीस गेलें, तेव्हां पांडुरंग नवसास पावला असें समजून, आपला नवस फेडण्यासाठीं, तो ब्राम्हण पंढरपुरास नामदेवांकडे आला व नवसाची हकीकत त्यांस सांगून, आपल्याबरोबर बेदरास येण्याविषयीं त्यानें त्यांस विनंति केली. परंतु, पंढरीक्षेत्र सोडून आपण दुसरीकडे कोठेंही येणार नाहीं असें नामदेवांनीं स्पष्ट सांगितलें. तेव्हां तो ब्राम्हण निराश होऊन राउळांत पांडुरंगाकडे गेला व त्यास म्हणाला, "देवा, तुझा नवस फेडण्यासाठीं नामदेवांस बेदर येथें नेण्यास मी आलों आहें. परंतु नामदेव मजबरोबर बेदरास येण्यास कबूल नाहींत. तरी त्यांस दोन गोष्टी सांगून ते मजबरोबर येतील असें कर." ब्राह्मणाचा निर्धार पाहून पांडुरंगानें नामदेवांस आज्ञा केली कीं, 'तूं या ब्राह्मणाबरोबर त्याच्या गांवीं जा आणि तेथील उत्सव पुरा करून, ब्राह्मणभोजन झाल्यावर परत ये. "आज्ञेप्रमाणें नामदेव त्या ब्राह्मणाबरोबर बेदर येथें जाण्यास निघाले. त्यांच्याबरोबर, भोजन आणि दक्षिणा मिळेल या आशेनें पंढरपुरचे अनेक ब्राह्मण टाळ मृदंगाच्या घोषांत भजन करीत निघाले. वाटेंत ठिकठिकाणीं नामदेवांचीं कीर्तनें होत होतीं. अशा रीतीनें प्रवास करीत करीत ते कांहीं दिवसांनीं बेदरानजीक जाऊन पोंचले. इकडे बेदरचा सुलतान राजवाड्याच्या गच्चीवर बसला होता त्यानें तो हरिभक्तांचा मेळा दिंड्या पताका घेऊन आपल्या नगराकडे येत असल्याचें पाहिलें. त्याचा काशीपंत या नांवाचा हिंदु प्रधान व इतर मंत्री जवळ होते त्यांजकडे वळून तो म्हणाला, "हें कोणाचें सैन्य आपल्या

शहरावर चालून येत आहे, याची चौकशी करा." तेव्हां काशीपंतानें, सेनापतीस हुकूम केला कीं, आतांच्या आतां फौज घेऊन शहराबाहेर जा आणि येत असलेली फौज कोणाची आहे व ती कोठें जात आहे, आणि इकडे येण्यांत तिचा उद्देश काय आहे, याची चौकशी करून इकडे कळवा." त्याप्रमाणें, बरेंच मोठें पठाण सैन्य बरोबर घेऊन सेनापति नगराबाहेर गेला. इतक्यांत नामदेवांची टाळकरी सेना नगराजवळ येऊन दाखल झाली. पठाणांनीं तत्काळ नामदेवांसह सर्व पंढरपुरकरांस वेढा दिला. त्या उग्र अविंधांस पाहतांच नामदेवांबरोबरच्या ब्रह्मवृंदांची नुसती गाळण उडाली. भोजन आणि दक्षिणा यांच्या लोभानें आपण नामदेवांबरोबर येथपर्यंत आलों खरे, पण आतां दक्षिणा तर दूरच राहिली, उलट हे दुष्ट पठाण आपली सुंता करून आपणास मुसलमान बनवितात कीं काय, अशी भीति त्या ब्राम्हणांच्या मनांत उत्पन्न झाली. आणि, या संकटांतून आपली सुटका करण्याविषयीं ते पंढरिनाथाचा धांवा करूं लागले. तेव्हां नामदेव पुढें होऊन, वेढा घालणाऱ्या फौजेच्या सेनापतीस म्हणाले, "हे सर्व ब्राम्हण याचक आहेत आणि, मी, त्रैलोक्याचा नाथ जो पंढरपुरचा पांडुरंग त्याचा सेवक आहें. आम्ही तीर्थयात्रा करण्यासाठीं या प्रांतीं आलों आहोंत. पण बेदरच्या उन्मत्त बादशहास, यात्रेकरू आणि लढाऊ सैन्य यांतला भेद समजेनासा झाला आहे. तुम्ही आतां बाजूस होऊन आम्हांला मार्ग द्या." हें ऐकून सेनापति काशीपंताकडे गेला आणि त्यास त्यानें सांगितलें कीं, राजवाड्याच्या गच्चीवरून, जे लोक नगराकडे येत असलेले आपण पाहिले ते लढाऊ लोक नसून, पंढरपुरचे यात्रेकरू आहेत. नामदेव या नांवाचा पंढरीचा वैष्णव बेदरास आला आहे, त्याच्या बरोबर आलेल्या यात्रेकरूंचा मोठा जमाव दुरून पाहिल्यामुळें तें सैन्य असावें असें आपणास वाटलें. काशीपंतानें नामदेवांची कीर्ति ऐकली होती. येवढ्या मोठ्या सत्पुरुषास आपल्या फौजेनें अटकाव केल्याचें ऐकून त्याला वाईट वाटलें. त्यानें बादशहास अर्ज केला कीं, "आम्हां हिंदूंचा देव पंढरीचा विठोबा, त्याचा परम भक्त नामदेव आपल्या परिवारासह नगराबाहेर आला असून त्याला आपल्या फौजेनें अटकाव केला आहे. तरी वेढा उठवून, नामदेवास शहरांत येण्याची परवानगी द्यावी." पण, त्या हिंदुधर्मद्वेष्ट्या उन्मत्त सुलतानानें या अर्जास भीक घातली नाहीं. तो म्हणाला, "हा असा कोण मोठा हिंदु अवलिया आला आहे, तें मला पहावयाचें आहे. तरी त्याला आणि त्याच्या बरोबरच्या लोकांना इकडे घेऊन या." काशीपंतानें पुनः सुलतानास विनंति-पूर्वक सांगितलें कीं, खाविंद, सत्पुरुषाची परीक्षा पाहण्यासाठीं त्याचा छळ केल्यास

परिणाम चांगला होणार नाहीं. नामदेव हा परमेश्वराचा एकनिष्ठ भक्त असल्यामुळें परमेश्वर त्याचा पाठिराखा आहे. अशा थोर सत्पुरुषाचा आपण छळ कराल तर आपलें आणि आपल्या राज्याचें अकल्याण होईल. काशीपंताच्या या भाषणाचा बादशहाच्या मनावर बिलकुल परिणाम झाला नाहीं. त्यानें पंचवीस गारदी बोलावून आणले आणि त्यांस, नामदेव आणि त्यांचे अनुयायी यांस ताबडतोब पकडून आणण्यास सांगितलें. नामदेवांबरोबर २०४ ब्राम्हण होते. त्या सर्वांस पकडून ते गारदी त्यांना बेदरच्या बाजारांतून मारीत घेऊन चालले. तो देखावा पाहून बाजारांतील हिंदु लोकांनीं मोठा हाहाकार केला. महीपति म्हणतातः--

**बेदरींच्या बाजारांत । थोर वर्तला आकांत ।**
**ह्मणती कोठें गुंतला पंढरिनाथ । विप्र समस्त बोभाती ॥**
**भले सावकार नारीनर । देखोनि छळणाचा प्रकार ।**
**आपुलाले घरीं साचार । शापोत्तरें बोलती ॥**
**ह्मणती यवनाचें राज्य उन्मत्त । व्यर्थ छळिले वैष्णव भक्त ।**
**कधीं ईश्वर करील पालथें । ऐसें बोलती परस्परें ॥**

मुसलमानांनीं हिंदूंचा छळ केला कीं हिंदूंनीं शिव्या शाप देत आणि बायकांप्रमाणें बोटें मोडीत घरांत बसावें, असा हा प्रकार आज सातशें वर्षें आपल्या देशांत चालू आहे. पाहिजे तर पंढरिनाथानें मुसलमानाचें पारिपत्य करावें, स्वतः हिंदु कांहीं हातपाय हालविण्यास तयार व्हावयाचे नाहींत! सातशें वर्षांपूर्वी नर्मदेच्या खालचा सगळा प्रदेश एकजात हिंदु लोकांनीं भरलेला होता; पण उत्तरेकडच्या मूठभर मुसलमान लोकांनीं इतक्या हिंदु लोकांच्या उरावर पाय देऊन, येथें खुशाल राज्यें स्थापिलीं, हिंदुधर्माचा उच्छेद केला, हिंदूंचे देव जात्यांत घालून भरडले, आणि हिंदु लोकांच्या नाकावर टिचून गोवध केला. आणि शिवाजी महाराजांनीं तोरणा किल्ला घेतला, तेव्हांपर्यंत मुसलमानाच्या या अत्याचारांस बहुसंख्याक हिंदु लोकांनीं आळा घालण्याचा प्रयत्न केल्याचा दाखला इतिहासांत नाहीं. हिंदु लोकांचा हा भेकड स्वभाव मुसलमानांनीं पूर्णपणें ओळखला होता, म्हणूनच बेदरच्या सुलतानानें, काशीपंतासारख्या हिंदु मंत्र्याची विनंति धाब्यावर बसवून, नामदेवांसारख्या थोर सत्पुरुषास पकडून आणण्याचा हुकूम केला, आणि जे गारदी त्यांस पकडून आणण्यास पाठविले होते त्यांसही हिंदु लोकांचा हा इतिहासप्रसिद्ध भेकडपणा माहीत होता, म्हणूनच त्यांनीं बेदरच्या

बाजारांतून हजारों हिंदु लोकांसमक्ष नामदेवांस आणि त्यांच्या बरोबरच्या ब्राह्मणांस गुरांप्रमाणें मारीत नेलें. हा आपला भेकडपणा हिंदु लोक सोडणार तरी कधीं ? अस्तु.

सुलतानानें पाठविलेल्या गारद्यांनीं नामदेवांस आणि त्यांजबरोबरच्या ब्राह्मणांस बादशहासमोर आणून मेंढरांप्रमाणें उभें केलें. आतां बादशहा या पंढरपुरकर मंडळीचें काय करतो कोण जाणे, या काळजींत बिचारा काशीपंत पडला. बादशहानें एक गाय आणविली आणि खाटकास बोलावून, नामदेवांच्या डोळ्यांदेखत त्या गाईची कत्तल उडविली ! मग तो नामदेवांकडे वळून त्यांस ह्मणाला, " तूं मोठा अवलिया आहेस असें हे तुझे जातभाई सांगतात; तर आतां ही मेलेली गाय जर तूं जिवंत केलीस तर तुला आह्मी सोडून देऊं, नाहींतर बाटवून मुसलमान करूं. " बादशहाचें हें भाषण ऐकून पंढरपुरकर ब्राह्मण धाय मोकलून रडूं लागले, अशा वेळीं नामदेव तरी बिचारे काय करणार ? त्यांनीं त्या मृत धेनूचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें आणि पंढरिनाथाचा धांवा सुरू केला.

**धांव धांव पंढरपुराधीशा । मंगळनिधि आदिपुरुषा ।**
**सच्चिदानंदा सर्वेशा । अनंतवेषा जगद्गुरू ॥**
**करुणालया करुणासिंधू । सदोदित परमानंदू ।**
**अनाथरक्षका दीनबंधू । कोठें गोविंदू गुंतलासी ॥**
**कैसें विपरीत जाहलें जाण । मायेनें मोकलिलें तान्हें ।**
**धेनु चुकली वत्सापासून । नये परतोनि सर्वथा ॥**
**देवा तुझी सत्कीर्ति । वाखाणिली पुरातन संतीं ।**
**नाम घेतां पावसी आकांतीं । तें असत्य श्रीपती काय जाहलें ॥**
**बहुत उशीर लागला आज । कोठें गुंतला गरुडध्वज ।**
**गेली गेली माझी लाज । भक्तराज म्हणवितों ॥**
**समर्थाचें असतां तान्हें । जनांत दिसे दैन्यवाणें ।**
**तरी तें मग कोणासी उणें । जन्मोनि सोसणें जोजार ॥**
**अट्टहासें शोक करितां । कंठीं प्राण उरला आतां ।**
**कां न येसी पंढरीनाथा । आश्चर्य चित्ता मज वाटे ॥**
**शेवटील वचन हेंचि जाण । आजपासोनि न करीं स्मरण ।**
**धेनु कापिली पापियानें । देईन प्राण मी आतां ॥**

नामदेवांचे हे निर्वाणीचे शब्द कानीं पडतांच त्या भक्तवत्सल पांडुरंगाचें मन कळवळलें. तो तत्काळ गुप्तरीतीनें बेदरास जाऊन नामदेवांच्या मागें उभा राहिला.

नामदेवांनीं जेव्हां ती श्यामसुंदर चतुर्भुज मूर्ति आपल्या ज्ञानदृष्टीनें पाहिली तेव्हां त्यांना धीर येऊन त्यांनीं त्या गाईवरून आपला हात फिरविला, तोंच तें धडापासून वेगळें झालेलें गाईचें शिर आपोआप जडून, गाय उठून उभी राहिली ! सर्व वैष्णवांनीं 'पुंडलीक वरदे हरि विठ्ठल' या नामाचा गजर केला. बादशाह व त्याचे मुत्सद्दी जागच्या जागीं थिजून जाऊन, अधोमुख झाले ! काशीपंतास तर इतका आनंद झाला कीं, बादशहाच्या रागारोषाची पर्वा न करितां नामदेवांस त्यानें लोटांगण घातलें. भगवंतानें अशा निर्वाणीच्या वेळीं आपल्या हांकेस उडी घालून आपली लाज राखली या विचारानें, नामदेवांच्या नयनांतून प्रेमाश्रुधारा वाहूं लागल्या.

पुष्कळ जुन्या संतांनीं तत्कालीन यवन राजांसमोर अशा प्रकारचे चमत्कार करून दाखविल्याच्या अनेक गोष्टी जुन्या ग्रंथांतून वर्णिलेल्या आहेत. ह्यांपैकीं कांहीं गोष्टी जरी निखालस खोट्या असल्या तरी कांहीं गोष्टी खऱ्याही असल्या पाहिजेत, आणि आमच्या जुन्या साधुसंतांवर पंगुत्वाचा आरोप करून, त्यांची वेळीं अवेळीं टवाळी करणाऱ्या कुटाळ टीकाकारांची तोंडें बंद करण्यास हा येवढा पुरावा अगदीं बस्स आहे. ज्या वेळीं सर्वसामान्य जनता यवनांच्या करड्या अमलाखालीं अगदीं चेंगरून जाऊन किंकर्तव्यतामूढ बनली होती अशा वेळीं हिंदुधर्मांतहि कांहीं तेज आहे हें दाखवून यवनांचे डोळे दिपविण्याचें आणि हिंदुधर्मीय लोकांची धर्मनिष्ठा कायम ठेवण्याचें महत्त्वाचें कार्य सहाशें वर्षांपूर्वींच्या नामदेवांपासून, पन्नास वर्षांपूर्वींच्या माणिकप्रभूंपर्यंत अनेक हिंदू सत्पुरुषांनीं केल्याची साक्ष इतिहास देत असतां, या संतांस 'संताळें' या उपहासात्मक शब्दानें संबोधून, त्यांची कुचाळी करण्यांत धन्यता मानणाऱ्या शब्दशूरांची कृतज्ञता खरोखर या मृत्युलोकींची नव्हे, स्वर्गीयच असली पाहिजे असें मला वाटतें. संतांच्या कामगिरीची मदत श्रीशिवाजी महाराजांस स्वराज्यस्थापनेच्या बाबतींत झाली असेल किंवा नसेल, परंतु शिवाजी महाराजांचे हल्लींचे उपासक जसा संतांचा उपहास करितात तसा खुद्द शिवाजी महाराज खात्रीनें करीत नव्हते, उलट तत्कालीन अनेक सत्पुरुषांशीं त्यांचा शिष्यत्वसंबंध असून, श्रीहरिवरदाकार कृष्णदयार्णवांचे आजेगुरु स्वानंदस्वामी[१] यांस त्यांनीं रायगडावर नेऊन ठेवलें

१ " श्रीस्वानंदाची महिमा । अपार वर्णितां निरुपमा । अमानित्वादि गुणीं गरिमा । जेथ उत्तमा संपादिली ॥ १०६५ ॥ **तया आपुलिया कल्याण कामें । शिवभूपतिनें प्रार्थूनि प्रेमें । रायदुर्गी स्थापिलें नेमें । सेवानुक्रमें तोषविलें** ॥ १०६६ ॥ " हरिवरदा, उत्तरार्ध, अध्याय ९०

होतें व त्यांची सेवा ते मनोभावें करीत असत. रामदास, तुकाराम, वामन, रंगनाथ इत्यादि सत्पुरुषांशीं महाराजांचा किती निकट परिचय होता हें जुन्या मराठी वाङ्मयाच्या वाचकांस सांगावयास नकोच. तात्पर्य, जुन्या संतांनीं हातीं शस्त्र धारण करून आणि बंड उभारून जुलमी यवन सत्तेचा जरी प्रत्यक्ष प्रतीकार केला नाहीं, तरी आपल्या अलौकिक सामर्थ्यानें, त्या अंधकारयुगांत, स्वधर्मदीपाची बारीक ज्योत तरी त्यांनीं तेवत ठेवली आणि अशा रीतीनें मुसलमानांच्या धर्मप्रसारास आळा घातला, ही गोष्ट कोणासही नाकबूल करितां येण्यासारखी नाहीं. मुक्तेश्वर, कचेश्वर इत्यादि सत्पुरुषांच्या वंशजांस आमच्या हिंदु राजांनीं ज्या उत्पन्नाच्या सनदा दिल्या आहेत त्यांत " ह्या सत्पुरुषांची कृपा आमच्या राज्यास परमश्रेयस्कर जाणोन " हे किंवा अशा अर्थाचे शब्द सांपडतात, यावरून सत्पुरुषांची कृपा आणि त्यांचे आशीर्वाद यांस, प्रत्यक्ष लढाया मारणारे हे जुने हिंदु राज्यकर्ते किती महत्त्व देत असत हें स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणें, पैठण येथील एकनाथ महाराज, चिंचवडचे मोरयादेव धरणीधर इत्यादि संतांच्या वंशजांस मुसलमान राज्यकर्त्यांनीं ज्या मोठमोठ्या जहागिरी दिल्या आहेत, त्या, त्या सत्पुरुषांच्या अलौकिक सामर्थ्याविषयीं पूर्ण खात्री झाल्यामुळेंच दिल्या आहेत हें संतांचा उपहास करणारांनीं विसरूं नये. अस्तु.

बेदर येथील सुलतानानें मारविलेली गाय नामदेवांनीं उठविली. पण या सत्पुरुषछलाचा परिणाम सुलतानास आणि त्याच्या प्रजाजनांस उभयतांसही भोगावा लागला. महीपति म्हणतात, " वरील गोष्ट घडल्यानंतर, बेदर येथील सुलतानाच्या वाड्यांत अकस्मात् इतके सर्प निघाले कीं त्यांनीं सगळा राजवाडा आणि त्याचा आसमंतात भाग पूर्णपणें व्यापून टाकला. शहरांतील घरांतूनही असंख्य सर्प निघाले आणि शेंकडों माणसांस त्यांनीं दंश केला. जमिनीवर पाय ठेवण्यास जागा नाहीं इतका सर्पांचा सुळसुळाट झाला. सर्पदंश झालेल्या लोकांस खाटेवर घालून, त्यांना बादशहास दाखविण्यासाठीं इतर लोक त्यांस राजवाड्यांत नेऊं लागले.

**"काळे पिंवळे आरक्त वर्ण । गुज गव्हाळे लंबायमान ।**
**भरोनि निघाले घर आंगण । उपरीवरोनि एक पडती ॥**
**हाय हाय शब्दें बोलती नारी । पाय ठेवावया कोठेंतरी ।**
**सर्पें रोधिली अवघी धरित्री । क्षोभ ईश्वरी जाहला ॥**
**नारी नर डंखिले त्यांणीं । ते पावले मृत्युसदनीं ।**
**रायासी दाखवावया नयनीं । खाटेवरी घालोनि आणिती ॥**

**हत्ती घोडे राव लष्कर । सर्पें रोधिलें अवघें अंबर ।**
**नगरीं जाहला हाहाःकार । कोणासी विचार सुचेना ॥**

सुलतानसाहेब तर भीतीनें अगदीं गांगरून गेले. मग त्यानें काशीपंतास बोलावून आणविलें आणि "नामदेवांची प्रार्थना करून हें संकट निवारण करवा," अशी त्यास विनंति केली. तेव्हां काशीपंत नामदेवांकडे जाऊन व त्यांस वंदन करून म्हणाला, महाराज, आपल्यासारख्या महावैष्णवाचा छल सुलतानानें केला, त्याचें योग्य प्रायश्चित्त आपण त्यास दिलें. आपल्या शापामुळें उत्पन्न झालेल्या सर्पांनीं दंश करून किती लोकांचे प्राण हरण केले आहेत हें पहा. आपण हरिभक्त, दयेचें केवळ सागर आहांत. या मृतांची आणि त्यांच्या बायकामुलांची दया जर आपणास आली नाहीं, तर प्रत्यक्ष भगवंतदेखील यांचें रक्षण करण्यास असमर्थ आहे. तरी महाराज, आतां दया करा आणि हें आपलें सर्पास्त्र आंवरून घ्या. काशीपंताचें हें भाषण चालू होतें त्या वेळीं नामदेव ब्रम्हानंदांत रंगून गेल्यामुळें शुद्धीवर नव्हते. परंतु त्यांच्या मागें उभा असलेल्या पांडुरंगानें त्यांस सावध केलें तेव्हां समोर पडलेलीं तीं शेंकडों प्रेतें पाहून आणि लोकांचा हाहाकार ऐकून त्या महाभागवताचें नवनीतकोमलांतःकरण तत्काळ द्रवलें. "देवा, हा अनर्थ आतां बंद कर," अशी पांडुरंगाची त्यानीं प्रार्थना केली. तेव्हां भगवंतानें त्या प्रेतांकडे एकवार कृपादृष्टीनें पाहतांच तीं सर्व प्रेतें उठून बसलीं व सर्पही जागच्या जागीं अदृश्य झाले ! त्यानंतर आणखी कांहीं दिवस नामदेव बेदर येथें राहिले, तेवढ्या वेळांत हरिभजनाच्या घोषानें तें शहर सारखें दुमदुमून गेलें होतें. आसपासच्या गांवांतल्या सहस्त्रावधि लोकांनीं बेदरास येऊन नामदेवांचें दर्शन घेतलें. ज्या गृहस्थानें पंढरपुरास येऊन नामदेवांस मुद्दाम बेदरास नेलें होतें त्याच्या मनाप्रमाणें सगळा उत्सव यथासांग रीतीनें पार पडल्यावर नामदेव पंढरपुरास येण्यास निघाले. निघतेवेळीं, ती जिवंत केलेली गायही त्यांनीं बरोबर घेतली. थोड्याच दिवसांनीं ते पंढरीस येऊन दाखल झाले. महीपति वर्णितात—

**" समीप देखतां क्षेत्र पंढरी । परम उल्हास जाहला अंतरीं ।**
**मग लोटांगण महीवरी । सप्रेमभरीं घातलें ॥**
**दिंड्या पताका उभवोनि प्रीती । टाळ मृदंग वीणे हातीं ॥**
**सकळ वैष्णव गाती नाचती । टाळिया पिटिती आनंदें ॥**
**ऐसे पावले क्षेत्र पंढरी । नामा येवोनि गरुडपारीं ।**
**आरती करोनि ते अवसरीं । जीवें श्रीहरी ओवाळिला ॥**

**चरणीं घालोनि दृढ मिठी। देवासि सांगे गुज गोष्टी।**
**बहुत शिणलों जगजेठी। परी पावलासी संकटीं विठ्ठला॥**

भक्तवत्सल पांडुरंग आणि त्याचा प्रेमळ भक्त नामदेव यांच्या या कथा अमृतोपम मधुर आहेत. दगडाच्या ठायीं आपल्या अत्युत्कट भक्तिबलानें देवत्व आणणारे नामदेवांसारखे संत एका कालीं या आपल्याला महाराष्ट्रांत होऊन गेलेले आहेत. बेदरच्या सुलतानानें नामदेवांचा छल केला त्या वेळीं त्यांनीं करून दाखविलेल्या चमत्काराचें वर्णन वर दिलें आहे. शीख लोकांचा गुरु **बंडा** याचा छल जेव्हां दिल्लीच्या बादशहानें केला तेव्हां त्यानें जर असाच एखादा चमत्कार करून बादशहास भयचकित केलें असतें तर बादशहाकडून त्याच्या पुत्राचा व त्याचा जो अमानुष रीतीनें खून करविण्यांत आला तो करविण्यांत आला नसता व पुढें शीख लोकांचा जो अनन्वित छल झाला तोही कदाचित् झाला नसता. परंतु नामदेवांच्या अंगीं जें अलौकिक सामर्थ्य होतें तें गुरु बंडाच्या अंगीं नव्हतें. चमत्कार करील तो साधु, अशी साधुत्वाची व्याख्या करणें जरी मूर्खपणाचें होईल तरी योग्य वेळीं, आपल्या अंगांतलें दैवी तेज व्यक्त करून दाखविण्याचें सामर्थ्य जर सत्पुरुषाच्या अंगीं नसेल तर दुष्ट लोकांच्या छलापासून त्याला आपलें आणि आपल्या अनुयायांचें रक्षण करितां येणार नाहीं. येशू ख्रिस्त हा मोठा अलौकिक पुरुष होता, परंतु दुष्ट लोकांनीं जेव्हां त्याला अन्यायानें क्रुसीं दिलें तेव्हां, आपल्या अलौकिक सामर्थ्याचा उपयोग करून त्या लोकांचा त्यानें बिलकुल प्रतीकार केला नाहीं, उलट तें सगळें दुःख त्यानें मोठ्या शांतपणानें सहन केलें. यांत त्याचें साधुत्व व्यक्त झालें यांत संशय नाहीं, परंतु दुष्ट लोकांची खोड मोडण्याचा तो मार्ग नव्हे. कारण त्यानें दाखविलेल्या या असामान्य सहनशीलतेचा अल्पही परिणाम त्याचा छल करणाऱ्या लोकांच्या मनावर झाला नाहीं. तात्पर्य, ‘ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्’ हें भगवद्वचनच अशा वेळीं अंमलांत आणणें युक्त होय; आणि म्हणूनच तुकारामबुवांनीं म्हटलें आहे कीं—

**मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदूं ऐसे॥ मेले जित असों निजोनियां जागे। जो जो जें जें मागे तें तें देऊं॥ भले तरी देऊं गांडीची लंगोटी। नाठाळाचे काठी देऊं माथां॥ मायबापाहूनि बहु मायावंत। करूं घातपात शत्रूहुनी॥ अमृत तें काय गोड**

**आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ तुका म्हणे आम्ही अवघेंचि गोड । ज्याचे पुरे कोड त्याचेपरी ॥**

" पांडुरंगानें नामदेवांची परीक्षा पाहण्याकरितां मलंगाचा वेष धारण करून **सांवता माळी** यांस मुसलमान केलें व पुनः पठाणाचें रूप घेऊन नामदेवांस भिववून सावंत्यांस बिगारीस धरून नेलें, अशा अर्थाची एक कथा प्रचलित आहे, परंतु, माझ्या अवलोकनांत आलेल्या, एतद्विषयक कोणत्याही ग्रंथांत ही कथा मला सांपडली नाहीं. तथापि, येवढ्याच एका कथेच्या अभावीं ग्रंथास अपूर्णता येऊं नये एतदर्थ, रा. मुळे-कृत ' नामदेवचरित्रां ' तून, ही कथा[1] संक्षेपरूपानें येथें उतरून घेतों.

" तूं गुरूपदेश घे, म्हणजे तुला परमात्मस्वरूपाचें पूर्ण ज्ञान होईल, " असें जेव्हां पांडुरंगानें नामदेवांस सांगितलें तेव्हां नामदेव म्हणाले, " देवा, मला परमात्मस्वरूपाचें ज्ञान नाहीं हें तुला कोणी सांगितलें ? तूं जरी वाटेल तें स्वरूप धारण करून आलास, तरी मी तुला ताबडतोब ओळखीन." "ठीक आहे," असें म्हणून, पांडुरंगानें स्वतः विश्व-रूप धारण करण्याचें व **सांवता माळी** यांच्या साक्षीनें, नामदेवानें तें ओळखण्याचें ठरविलें. मग, देवानें, नामदेवांस, " तूं सांवता माळ्यासह वेणुनादीं[2] जाऊन बैस, मी तेथें येईन," असें सांगितलें. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं दोघेही तेथें जाऊन देवाची वाट पहात बसले. " इकडे देव मलंगाचें रूप धारण करून बरोबर कंथा, सैली, उंच टोपी, कुंडी व काठी हीं घेऊन डावे काखेंत भिक्षेची झोळी, तसेंच बरोबर एक कुत्री ( कामधेनु ) व उजवे हातांत धूम्रपानयंत्र घेऊन मार्गानें सवाल करीत चालले. ते सवाल ऐकून नामदेवास, हा कृतांत आहे कीं काय असें वाटून तो फार भयभीत झाला; व आतां देव भेटीस येण्याची वेळ आणि मध्येंच हा काय अनर्थ येत आहे ! असें बोलतो तों मलंगाची स्वारी जवळ आली. त्यास पाहून सांवत्यास फार आनंद झाला. परंतु नामदेव त्यास ( मलंगास ) म्हणाला, तुम्ही गांवाकडे जावयाचें सोडून इकडे कशास आलां ? मलंगानें उत्तर दिलें, " मला फार भूक लागली आहे. तेव्हां येथें बसून थोडीशी रोटी खाऊन मग गांवांत जाईन. " असें म्हणून तो ज्या ठिकाणीं नामदेव व सांवता हे बसले होते तेथें जवळच आपलें आसन टाकून बसला. मग सांवत्यास त्यानें विचारलें, " तुम्ही कोण व तुमचें नांव काय ? " सांवत्यानें उत्तर दिलें, मी

१ नरहरि मालोकृत भक्तकथामृतांत ही गोष्ट असल्याचें रा. मुळे यानीं लिहिलें आहे.
२ पंढरपुरांतील एक स्थल.

माळी आहे. माझें नांव सांवता. मग मलंगानें नामदेवांसही तोच प्रश्न विचारला, तेव्हां त्यांनीं, " माझी जात शिंपी व माझें नांव नामदेव आहे, " असें सांगितलें. तें ऐकून मलंग म्हणाला, ' देवावर भक्ति नाहीं, आणि नामदेव म्हणवितोस. त्यापेक्षां नुसतें ' नामा ' हेंच नांव ठीक दिसतें. नामा, तुला थोडी गुरुगोडी ( गुडगुडी ) पाहिजे ? नामदेव म्हणाले, " नको. " मलंग म्हणाला, " तुझ्या नशिबांतच नाहीं, त्याला तूं तरी काय करणार ? " नामदेव मनांत म्हणाले, " या अविंधास वेड तर लागलें नाहीं ? मला धर्मभ्रष्ट करावयाचें याच्या मनांत आहे वाटतें. " मलंग सांवता माळी यांस म्हणाला. " नाम्याला गुरुगोडी नको. तूं तरी थोडीशी घेतोस ? " सांवता यानीं उत्तर दिलें, " मी तर गुरुगोडी घेतली आहे. तिजवांचून मला घटकाभरदेखील करमत नाहीं. " मलंग म्हणाला, " काय, तूं गुरुगोडी घेतली आहेस ? कीं खोटें बोलतोस ? "

याप्रमाणें बोलणें झाल्यावर मलंगानें एक सानक ( भिक्षापात्र ) काढिली, तींत भिक्षा मागून आणलेले भाकरीचे तुकडे घातले, व जवळच कुत्री बसली होती, तीस म्हणतो, " अग, मला दूध दे. " तेव्हां ती लागलीच उभी राहून तिनें त्या पात्रांत इतकें दूध सोडलें कीं त्याचा लोट पात्र भरून दहा वीस हात लांब गेला ! हें पाहून नामदेवांस मोठें आश्चर्य वाटलें. ते आपल्याशींच म्हणाले, " ही कुत्री दिसा-वयास तर फार लहान दिसते. पण दूध तर गाई म्हशीपेक्षांही जास्त देते." इकडे मलंगानें दूध व तुकडे यांचा काला करून नामदेवांस म्हटलें, " बेटा, थोडा नैवेद्य घेतोस ? " नामदेव म्हणाले, " तुमचें चालूं द्या, मला नको. " मग मलंगानें तीच गोष्ट सावंता माळी यांस विचारली, तेव्हां ते नैवेद्य ग्रहण करण्यास मोठ्या आनंदानें तयार झाले. कारण त्यांनीं मलंगाचें खरें स्वरूप ओळखलें होतें. सांवता माळी नैवेद्य घेण्यास पुढें सरसावले तोंच नामदेवानीं त्यांचा हात धरून त्यांस म्हटलें, " थेरड्या, चाललास कोठें ? कुत्रीच्या दुधांत कालवलेले यवनाच्या हातचे भाकरीचे तुकडे खाऊन तुला बाटावयाचें आहे कीं काय ? " सावंत्यानीं उत्तर दिलें, " हें सुंदर दूध मला तर खावेंसें वाटतें बुवा ! " नामदेव म्हणाले, " सांवत्या, तूं जेवलास तर तुझ्या मंडळींत या गोष्टीचा मी बोभाटा करीन. " सावंता म्हणाले, " नाम्या, असें काय करतोस ? मला या दुधाचा मोह अगदीं आवरत नाहीं, म्हणून थोडेंसें खातों. तरी कृपा करून ही गोष्ट तूं कोणापाशीं बोलूं नकोस. " नामदेवांनीं स्पष्ट सांगि-तलें, " आपण तर ही गोष्ट प्रसिद्ध केल्याशिवाय राहणार नाहीं. " सावंत्यानीं नाम-देवांचा हात झिडकारून " जा, आतांच जाऊन सांग ! " असें म्हटलें व ते मलंगा-

जवळ येऊन बसले. तेव्हां मलंग सावंत्यांचे मुखीं व सावंता मलंगाचे मुखीं ग्रास देऊं लागले. तो देखावा पाहून नामदेवांच्या अंगांत शिसारी आली. निराशेनें दीर्घ निःश्वास सोडून ते म्हणाले, " हर हर ! आतां मात्र कलियुग खाचित सुरू झालें ! "

इकडे मलंगानें सांवत्याचे कानांत सांगितलें कीं, तूं नाम्यास चुचकारून इकडे आण; म्हणजे आपण त्यास खालीं पाडून त्याचे मुखांत बळेंच ग्रास घालूं. या त्यांच्या गुप्त भाषणामुळें नामदेवांस अशी शंका आली कीं, हे दांडगे धटिंगण कदाचित् आपणास जबरीनें बाटवितील, तेव्हां येथून पळून जावें हें बरें. असा विचार करून त्यांनीं एकदम धूम ठोकली. तें पाहून मलंग, " पकडो पकडो, " म्हणून ओरडूं लागला. त्या गडबडींत नामदेव अडखळून पडले, पण कसेंबसें उठून त्यांनीं एकदांचें देऊळ गांठलें. पळतां पळतां दमल्यामुळें त्यांस धड बोलतांही येईना. ते धापा टाकीत उभे राहिले. तेव्हां पांडुरंगानें त्यांस विचारलें, नाम्या, असें झालें तरी काय ? नामदेव म्हणाले, देवा, काय सांगूं. एक मुसलमान फकीर मला कुत्रीचें दूध पाजून जबरदस्तीनें बाटविणार होता, परंतु मोठ्या मुष्किलीनें मी त्याच्या हातून सुटलों. देवानें विचारलें, " काय रे, त्या फकिरानें आणखी काय केलें ? " नामदेव म्हणाले, " त्यानें सावंत्यास बाटवून मुसलमान केलें. आणि तेवढ्यांत मी पळून आलों. आतां सावंत्यास राउळांत येऊं देऊं नकोस. " हें ऐकून देव मोठ्यानें हंसला व त्यानें, आपण स्वतःच मलंग झालों होतों व ती कुत्री कामधेनु होती वगैरे हकीकत नामदेवांस सांगितली. तेव्हां आश्चर्यचकित होऊन नामदेव म्हणाले, " देवा, तूं हें असलें भलतेंच अमंगळ स्वरूप घेतोस हें काय ? " देवानें सांगितलें, माझी माया विचित्र आहे. सद्गुरूच्या उपदेशाशिवाय या गोष्टींचें ज्ञान तुला होणार नाहीं. " नामदेव म्हणाले " या वेळीं मी तुझी माया ओळखली नाहीं खरी, पण पुनः मात्र मी असा फसणार नाहीं. " देव म्हणाला, " ठीक आहे. सांवता आणि तूं दोघेही वेणुनादीं जाऊन बसा. "

आज्ञेप्रमाणें नामदेव सांवता माळी यांसह पुनः वेणुनादीं जाऊन देवाची वाट पहात बसले. इकडे पांडुरंग नामदेवांस ओळखूं न येई असा पठाणाचा वेष धारण करून, ढाल, तरवार, जंबिया, बंदूक, भाला, वगैरे हत्यारें घेऊन, घोड्यावर स्वार होऊन " नामा दर्जीकू पकडो, " अशी गर्जना करीत त्या ठिकाणीं आला. तेव्हां नामदेव घाबरून सावंत्यास म्हणाले, " अरे स्वस्थ काय बसलास ? हा पठाण आपणास जबरदस्तीनें वेंठीस धरून नेईल. तर चल येथून पळून जाऊं. " सावंता म्हणाले, " बाबा रे ! मी म्हातारा असल्यामुळें मला कांहीं पळतां येत नाहीं. पण तुला जर पळून जावयाचें असेल तर खुशाल जा. मी

कांहीं येत नाहीं. " तेव्हां नामदेव एकटेच पळत सुटले. कांहीं अंतरावर गेल्यावर त्यांनीं मागें वळून पाहिलें, तों पठाणानें घोडा मागें वळवून आपल्या हातांतला भाला सांवत्याचे हातीं दिला. हें पाहून, नामदेव इतके घाबरून गेले कीं त्यांनीं जी पुनः धूम ठोकली ती राउळापर्यंत ! राउळांत येऊन ते देवापाशीं गेले आणि घडलेली सर्व हकीकत त्यानीं त्यास सांगितली. तेव्हां देव त्यांस म्हणाला, " तो पठाण व सांवता किती लांब गेले तें पहा बरें. " त्याप्रमाणें, नामदेव पाहूं लागले तों सांवता माळी एकटाच आपल्या घराकडे येत असल्याचें त्यांस दिसलें. तेव्हां धांवत जाऊन त्यांनीं त्यांस विचारलें, " काय रे, पठाण कोठें आहे ? " सावंत्यानीं उत्तर दिलें, " हा वेड्या, तो पठाण नव्हता, देवच होता. " हें ऐकून नामदेव अगदीं खजील होऊन गेले. तेव्हां सावंता यानीं त्यांस सांगितलें कीं, "बाबा रे, सद्गुरुकृपेशिवाय भगवंताच्या अतर्क्य लीलेचें आकलन तुला कधीं होणार नाहीं. "

मग नामदेव पांडुरंगाकडे येऊन मुकाट्यानें उभे राहिले. त्यांना खिजविण्यासाठीं पांडुरंगानें विचारलें, " पठाणाच्या हातून सांवत्याची सुटका झाली का ? " तेव्हां त्यांनीं हळूच ' होय ' म्हटलें. तेव्हां, तूं असा खिन्न कां ? म्हणून देवानें विचारतांच नामदेव म्हणाले, " काय करावें ? " देवानें उत्तर दिलें, " गुरु करावा, दुसरें काय ? " गुरु करण्याची सूचना नामदेवांस आवडली नाहीं. ते म्हणाले, " देवा, आणखी एक संधि मला दे. या वेळीं मी तुला अगदीं खास ओळखीन. पण या वेळीं तूं एकटाच येऊं नकोस; रुक्मिणी मातेस बरोबर घेऊन ये. " देवानें हें कबूल केलें व नामदेवांस एकटेंच जाऊन पद्मतळ्यावर बसण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते जाऊन एका मोठ्या शिळेवर देवाची वाट पहात बसले.

इकडे देवानें रुक्मिणीस बोलावून एक मायेचा टोणगा निर्माण करून त्याजवर कांहीं गबाळ व मायेचींच दोन लहान मुलें करून बसविलीं; आणि आपण डोकीस पांच सात हात लांबीचें फाटकें पागोटें व अंगांत, सर्व ठिकाणीं ज्यास छिद्रें पडलीं आहेत व एक बाही मुळींच नाहीं असा आंगरखा घालून फाटकें धोतर नेसलेल्या मनुष्याचें रूप धारण केलें. तसेंच रुक्मिणीनेंही पांढरें पातळ नेसून एका पांटींत एक मातीची घागर, तवली व दोन कोंबड्या घालून ती पांटी डोकीवर घेतली. नंतर तीं दोघेंही पंढरीची वाट सोडून पद्मतळ्याकडे येऊं लागलीं. त्यांस पाहून नामदेव मनांत म्हणाले, " आतां मला देव भेटावयास येणार आणि हें मध्येंच काय विघ्न येत आहे ! एकादशींची वारी जवळ आल्यामुळें हे कोणी तरी वारकरी पंढरीस येत असतील. " मग ते,

भिकाऱ्याचें सोंग घेतलेल्या पांडुरंगास म्हणाले, “ अरे, पंढरीकडे जाण्याचें सोडून तुम्हीं इकडे कोणीकडे चाललां ? ” पांडुरंगानें उत्तर दिलें, “ अरे बाबा, आम्ही इकडे आलों तर त्यांत तुझें काय जातें ? आम्ही येथें घटकाभर बसून भाकरी खाणार आणि पुढें निघून जाणार. ” हें उत्तर ऐकून नामदेवास वाटलें कीं हा कोणीतरी धटिंगण असावा. तेव्हां याच्याशीं बोलण्यापेक्षां आपण आपलें या बाईशींच बोलावें हें बरें. असा विचार करून ते रुक्मिणीस म्हणाले, “ बाई, तुह्मी पंढरीचा मार्ग सोडून इकडे कां आलां ? ” रुक्मादेवीनें उत्तर दिलें, “ आम्ही इकडे भाकरी खाण्यासाठीं आलों. ”

नंतर त्यांनीं तेथेंच उतरून बिऱ्हाड लावलें, चूल तयार करून व पाणी आणून स्वयंपाकाची तयारी चालविली. तवली चुलीवर ठेवून ती कुश्चळ वेषधारी स्त्री ( रुक्मिणी ) आपल्या पतीस म्हणते, “ फराळास काय करूं ? ” पांडुरंगानें सांगितलें, “ कोंबड्यांची कढी कर. ” हें ऐकतांच तिनें एक कोंबडी उचलून तवलींत टाकली. पण तवली भरली नाहीं. तें पाहून पांडुरंगानें, दुसरी कोंबडी उचलून टाकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें रुक्मिणीनें दुसरी कोंबडी उचलून तवलींत टाकली. तरी हंडी भरली नाहीं. तें पाहून नामदेव चकित झाले. हंडी तर फार लहान दिसते पण दोन कोंबड्या आंत टाकल्या तरी भरत नाहीं, याबद्दल त्यांस आश्चर्य वाटलें. इकडे हंडी भरेना म्हणून त्या बाईनें एक मुलगा घातला, नंतर दुसरा घातला तरी हंडी भरेना. इतकें झालें तरी भगवंताच्या मायाजालांत गुरफटून गेलेल्या नामदेवांच्या लक्ष्यांत खरा प्रकार आला नाहीं. हंडी भरत नाहीं असें पाहून ती बाई त्या बुवास म्हणाली, “ दोन कोंबड्या आणि दोन मुलगे घातले तरी हंडी भरत नाहीं. आतां काय करूं ? ” हें ऐकून, नामदेवांस वाटलें कीं, आतां कदाचित् आपल्यावर पाळी यावयाची, याकरितां सावध असावें हें बरें. असा पोक्त विचार करून, प्रसंग पडल्यास ताबडतोब उठून पळून जातां येईल, अशा तयारीनें ते बसले. इतक्यांत पांडुरंगानें नामदेवांकडे बोट दाखवून रुक्मिणीस म्हटलें, “ हा छोकरा चांगला गलेलठ्ठ दिसतो, याला हंडींत टाक. ” हे शब्द ऐकतांच नामदेव जीव घेऊन पळत सुटले व ती बाई त्यांच्या मागें लागली. शेवटीं नामदेव कसेबसे एकदांचे देवळांत येऊन मूर्च्छित पडले ! पांडुरंगानें सिंहासनावरून खालीं उतरून त्यांस उठविलें व “ तुला असें काय झालें ? ” म्हणून विचारलें. नामदेवांनीं, घडलेला सर्व वृत्तांत देवास सांगितला. तेव्हां देव म्हणाला, “ नामदेवा, तूं पाहिलेला कुश्चल मनुष्य मीच होतों व त्याची बायको ही रुक्मिणी होती. ” हें ऐकून नामदेव फार लज्जायमान झाले व देवाच्या आग्रहावरून गुरु करण्याचें त्यांनीं कबूल केलें. नंतर त्यानीं विसोबा

खेचरांकडे जाऊन त्यांचा उपदेश घेतला, वगैरे कथाभाग पूर्वी येऊन गेलाच आहे. देवानें तीन वेळां मायावी रूप धारण करून नामदेवांस फसविल्याविषयींची ही गोष्ट अभंगबद्ध नामदेवचरित्रांत किंवा महीपतींच्या ग्रंथांत नाहीं. **नरहरि[1] धुंडिराज मालू** नामक संतचरित्रकारानें 'भक्तकथामृत' नामक ग्रंथांत ही गोष्ट दिली आहे. हुंडीची हीच गोष्ट एकनाचरित्रांतही सांपडते. नरहरि धुंडिराज मालो हा ग्रंथकार फारसा प्रसिद्ध किंवा विश्वसनीय नाहीं. अर्थात् वरील भाकडकथा म्हणजे या धुंडिराजानें आपल्या कल्पनासृष्टींतून धुंडून काढलेल्या निव्वळ गप्पा आहेत असें वाचकांनीं खुशाल समजावें. आतां, 'अशा प्रकारच्या गप्पा तुम्हीं आपल्या ग्रंथांत कां देतां?' असें एखादा वाचक विचारील, तर त्याचें उत्तर येवढेंच कीं, नामदेवांविषयीं जुन्या लेखकांनीं दिलेली सर्व माहिती जर या ग्रंथांत मी दिली नाहीं, तर महाराष्ट्रांतील जुन्या मताचे भाविक लोक, अमुक अमुक गोष्टी ग्रंथकारानें वगळल्या असल्यामुळें त्याचा ग्रंथ अपूर्ण राहिला आहे, असा आक्षेप घेतल्याशिवाय राहणार नाहींत. म्हणून, प्रचलित असलेल्या सगळ्या दंतकथांचा समावेश असल्या ग्रंथांत करणें भाग आहे.

---

१ महाराष्ट्र सारस्वतकर्ते कै. भावे या कवीविषयीं लिहितातः—"हा नरहरि धुंडिराज मालूचा ग्रंथ केवळ अलौकिक आहे. महाराष्ट्र भाषेंतल्या अफाट ग्रंथसागरांत या ग्रंथास दुसरी जोड नाहीं. यांतलीं सर्व चरित्रें पूर्ण आहेत. म्हणजे कवीचा मातापिता, गुरु, स्थळ, वगैरे माहिती यांत सूक्ष्म रीतीनें दिली आहे; व अशी ही माहिती एकाद्या दुसऱ्या कवींसंबंधीं सांगितली नसून ती बहुतेक सर्व कवींसंबंधीं सांगितली आहे. मात्र यांत एकच जरा व्यंग आहे, आणि तें हें कीं नरहरि धुंडिराज मालूनें आपल्या भक्तकथामृत ग्रंथांत दिलेली माहिती त्याच्या काळीं सर्वतोमुखीं असलेल्या गोष्टी खेरीज करून इतर बाबतींत बहुतेक सर्व येथून तेथून खोटी आहे म्हणजे चुकीची आहे; व कवीनें नीट चौकशी केल्याशिवाय ती घेतली आहे असें नाहीं, तर ती समजून उमजून खोटी दिली आहे."

# प्रकरण तिसरें.



पंढरपुर येथें कमळाकर या नांवाचा एक प्रेमळ व सज्जन ब्राह्मण रहात असे. त्याच्या बायकोचें नांव सुमति. तीही मोठी पतिव्रता होती. या दांपत्याला एकुलता एक पुत्र होता, त्याचें नांव पद्माकर. कमलाकर हा गृहस्थाश्रमी असूनही पांडुरंगाचा मोठा भक्त होता. संतसेवेंत आणि नामस्मरणांत त्याला मोठा आनंद वाटत असे. नित्य स्नान करून, यथाविधि देवतार्चन केल्यावर तो नगरांत भिक्षाटनास जात असे व संतोषानें जें काय कोणी देईल त्यावर आपला निर्वाह करीत असे. कदाचित् एखाद्यानें कांहीं दिलें नाहीं तरी त्याबद्दल त्याला बिलकुल विषाद वाटत नसे. अशी त्याची संतोषवृत्ति फार स्पृहणीय होती. भिक्षाटनाहून परत घरीं आल्यावर, जेवणाची वेळ होतांच, त्या वेळीं जो कोणी क्षुधित दाराशीं येईल त्याला तो यथाशक्ति अन्नदान करीत असे. एके दिवशीं, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई व आणखी कांहीं संत पंढरपुरीं आले. ते रस्त्यानें भजन करीत चालले असतां, कमलाकर आपल्या मुलास बरोबर घेऊन भिक्षा मागत फिरत होता, त्यानें तो भजनस्वर ऐकला. संतांचें दर्शन होतांच त्याला इतका आनंद झाला कीं, त्या सर्व संतांस आपल्या घरीं नेऊन त्यांची यथाशक्ति सेवा करावी, असें त्यास वाटलें व तो आपला विचार त्यानें आपल्या मुलास कळविला. मग ते दोघेही त्या संतमंडळीकडे गेले व त्यांस साष्टांग नमस्कार घालून आपल्या घरीं भोजनास येण्याची त्यांनीं त्यांस विनंति केली. कमलाकर संतमंडळीस म्हणाला, " महाराज, आपल्यासारख्या थोर वैष्णवांच्या दर्शनानें आम्ही आज पुनीत झालों. माझें पूर्वजन्मींचें सुकृत आज फळास आलें. आतां आपण माझ्या घरीं येऊन नैवेद्य ग्रहण करावा अशी माझी विनंति आहे. मी एक दरिद्री ब्राह्मण आहें. भिक्षेवर मी आपला निर्वाह चालवितों. आपल्या आगमनानें माझा गरिबाचा आश्रम आपण पवित्र करावा. " संत म्हणाले, " आमचा समुदाय मोठा आहे. तूं गरीब भिक्षुक ब्राह्मण. इतक्या मंडळीच्या जेवणाची सोय तुला कशी करितां येईल ? तुझी आमची गांठ पडली, भाषण झालें, यांतच आम्हांस संतोष आहे. " कमलाकर म्हणाला, " महाराज, इतक्या मंडळीच्या जेवणाची सोय कशी होईल याची चिंता करण्याचें आपणास कारण नाहीं. पांडुरंगासारखा त्रिभुवनसमर्थ दाता आणि विश्वजननी रुक्मिणी हीं माझ्या शिरीं असतां, मला काळजी करण्याचें काय कारण ? "

हें ऐकून संत म्हणाले, " ठीक आहे. तुझा आग्रहच असेल तर आमचें कांहीं म्हणणें नाहीं, तूं आतां आपल्या घरीं जा आणि भोजनाच्या तयारीस लाग. आम्ही स्नान वगैरे करून लवकरच येतों. " आज आपल्या घरास संतांचे पाय लागणार या विचारानें कमलाकरास निरतिशय आनंद झाला. तो घाईघाईनें घरीं जाऊन आपल्या पत्नीस म्हणाला, " आज संतमंडळी आपल्या घरीं भोजनास येणार आहे. तरी चांगलें सुग्रास अन्न लवकर तयार कर. " पतीचें हें भाषण ऐकून सुमतीच्या उरांत धडकी भरली; कारण घरांत धान्याचा एक दाणाही शिल्लक नव्हता. परंतु कमलाकराप्रमाणें तिचाही पांडुरंगावर पूर्ण भरंवसा होता. तिनें एका शेजारणीकडून जरूरीपुरते जिन्नस उसने घेतले आणि स्नान करून ती सैंपाकास लागली. अल्पावकाशांत तिनें एकदोन पक्वान्नें व इतर भोजनाचे पदार्थ तयार केले. शेवटीं खीर तयार करण्याचे वेळीं ती पाहते तों घरांत एकही लांकूड शिल्लक नाहीं. अंगणांत गोंवऱ्या होत्या, पण ती स्वतः सैंपाकांत गुंतलेली असल्यामुळें, त्या गोंवऱ्या तिला आणतां येईनात. कमलाकरही घरांत नव्हता. तेव्हां तिनें आपला मुलगा पद्माकर यास हांक मारून, अंगणांतील गोंवऱ्या आणण्यास सांगितलें. त्याप्रमाणें पद्माकर गोंवऱ्यांच्या ढिगापाशीं गेला आणि गोंवऱ्या काढण्यासाठीं ढिगांत त्यानें हात घातला. तोंच, तेथें लपून बसलेल्या एका भयंकर विषारी सर्पानें त्याच्या हातास दंश केला. पद्माकरानें भिऊन किंकाळी फोडली आणि " आई, लवकर बाहेर ये, मला साप चावला, " असें त्यानें आपल्या आईस म्हटलें. पुत्राचे ते अत्यंत करुणाजनक शब्द कानीं पडतांच सुमतीचें हृदय दुभंग झालें. हातांतलें काम टाकून ती धांवतच मुलापाशीं गेली. तेव्हां तेथें तो सर्प तिच्या दृष्टीस पडला. पद्माकरही तिच्या देखत अल्पावकाशांत गतप्राण झाला. एकुलत्या एका पुत्राचा बोलतां बोलतां अंत झालेला पाहून त्या साध्वीस किती दुःख झालें असेल ? परंतु प्रसंगाकडे लक्ष्य देऊन तिनें मोठ्या मुष्किलीनें आपलें दुःख आवरलें. ती मनांत म्हणाली, " मी जर आतां येथें अशीच रडत बसलें तर संतांच्या भोजनाची व्यवस्था कोण करील ? तेव्हां आतां हें दुःख घटकाभर बाजूस ठेवून आधीं संतसेवेस सादर झालें पाहिजे. " असा विचार करून तिनें पद्माकराचें प्रेत उचलून घरांत नेलें आणि तें पाळण्यांत घालून वस्त्रांनीं झांकून ठेविलें. महीपति म्हणतात—

**"ती सत्ववैराग्याची खाणी। कीं धैर्यस्तंभाची अचळ ठेवणी।**
**वैराग्यपीठींची कुळस्वामिणी। मजलागोनि भासत॥ "**

हरिश्चंद्राची पत्नी तारामती, श्रियाळाची चांगुणा, यांच्या पंक्तीस बसण्याची योग्यता या कमलाकराच्या सुमतीची होती. आपल्या सत्त्वपरीक्षणासाठीं पांडुरंगानेंच हा प्रसंग मुद्दाम आपल्यावर आणला आहे, तेव्हां समयाला सादर झालेंच पाहिजे या भावनेनें भयंकर पुत्रशोक घटकाभर बाजूस सारून साध्वी सुमति संतमंडळीच्या स्वागताच्या तयारीस लागली. इतक्यांत सर्व संतांसह कमलाकर घरीं आला. त्यांस पाहून सुमतीचा आनंद गगनांत मावेना. महीपति म्हणतातः—

**“म्हणे धन्य आजिचा सुदिन । आम्ही जाहलों परमपावन ।**
**आजि चुकलें जन्ममरण । लाभ याहून कोणता ॥**
**आज आयुष्य उजवण जाहली । कीं दैवदशा उदया आली ।**
**ऐसें म्हणोनि वेल्हाळी । लोटांगण घालितसे ॥ ”**

सर्पदंशानें पद्माकर मृत्यु पावला व त्याचें प्रेत पाळण्यांत झांकून ठेवलें आहे ही गोष्ट सुमतीनें कमलाकरास कळविली नाहीं. तिनें संतांचें पादक्षालन करून, तें पादोदक मोठ्या भक्तीनें प्राशन केलें. नंतर कमलाकरानें पात्रें मांडलीं. सुमतीनें सर्व भोज्य पदार्थ आणून पात्रांत वाढल्यावर “ पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ” या नामघोषांत संतमंडळी भोजनास बसली. कमलाकरानें संकल्प सोडतांच नामदेवांनीं मनोद्वारें पंढरिनाथास पाचारण केलें. परंतु पंढरिनाथ त्यांच्या ध्यानांत येईनात. तेव्हां, आजच्या भोजनांत कांहीं तरी व्यंग असलें पाहिजे हें जाणून नामदेवांनीं इतर संतांस तसें बोलून दाखविलें. पद्माकराच्या मृत्यूमुळें तेथील वातावरणच असें कांहीं अशुभसूचक व शून्य दिसत होतें कीं, त्यामुळें कोणाच्याही मनास स्वस्थता वाटेना. शिवाय, सकाळीं कमलाकर जेव्हां संतमंडळीस आमंत्रण देण्यास गेला होता तेव्हां पद्माकर त्याच्याबरोबर होता व संतमंडळीनें त्या वेळीं त्यास पाहिलें होतें. घरांत एखादा समारंभ असला म्हणजे मुलें कधीं स्वस्थ बसावयाचीं नाहींत, हा नित्याचा अनुभव आहे. अशा स्थितींत, आपण इतकी मंडळी कमलाकराच्या घरीं भोजनास आलों असतां त्याचा मुलगा पंक्तींत कोठें दिसत नाहीं, हा विचार संतमंडळीच्या मनांत येणें साहजिक होतें. व तीच गोष्ट जेव्हां नामदेवांनीं बोलून दाखविली, तेव्हां एका पाहुण्यानें कमलाकरास स्पष्ट सांगितलें कीं, “ सकाळीं तुजबरोबर जो तुझा मुलगा होता त्याला आणून आमच्या पंक्तीस बसव. ” पाहुण्याचे हे शब्द कानीं पडतांच साध्वी सुमति चिंताक्रांत झाली. कारण खरा प्रकार तिला एकटीलाच माहीत होता. ती मनांत ह्मणाली, “ मोठ्या धैर्यानें पुत्रशोक आंवरून मी येवढी यातायात

केली ती आतां व्यर्थ जाणार असें वाटतें. अशा वेळीं, पांडुरंगा, तुझ्याशिवाय माझी लाज कोण राखणार ? केवळ सत्वरक्षणासाठीं येवढा पुत्रशोक मी गिळून बसलें असतां, हे संत जर आतां विन्मुख होऊन परत गेले तर मी खचित प्राणत्याग करीन." भगवंताची अशी मनोमय प्रार्थना करून सुमति बाहेर आली आणि नम्रतापूर्वक हात जोडून संतमंडळीस म्हणाली, "महाराज, पद्माकरास जेवण घालून मी पाळण्यांत निजविलें आहे. मी घरांत एकटी असल्यामुळें जेवण तयार होण्यास उशीर झाला. त्यामुळें मुलगा भुकेनें व्याकुळ झाला, म्हणून त्याला मी जेऊं घालून निजविलें आहे. आपण मनांत कांहीं संकोच न धरितां स्वस्थचित्तानें भोजन करावें." यावर नामदेवांनीं सांगितलें," बाई, तुमचा लहान मुलगा आमच्या पंक्तीस असल्याशिवाय आम्हांस अन्न गोड लागणार नाहीं, तरी तुम्ही त्याला उठवा आणि आमच्या पंक्तीस आणून बसवा." सुमति म्हणाली, "मुलास अगदीं गाढ झोंप लागली आहे. तो लवकर जागा होणार नाहीं." यावर नामदेवानीं तिला अगदीं निक्षून सांगितलें, "तुम्ही काय वाटेल तें करा, पण तुमचा मुलगा आमच्या पंक्तीस असलाच पाहिजे. नाहीं तर, मी विठोबाची शपथ घेऊन सांगतों कीं, मी तुमच्या घरीं अन्नग्रहण करणार नाहीं." नामदेवांचा हा आग्रहीपणा इतर संतांस फारसा आवडला नाहीं. ते म्हणाले, "नामदेवा, आम्ही भुकेनें अगदीं व्याकुळ झालों आहोंत. अशा वेळीं तूं हा भलताच हट्ट घेऊन काय बसतोस ?" नामदेव म्हणाले, "तुम्ही सगळे खुशाल जेवा. माझें कांहीं म्हणणें नाहीं. कमलाकराचा मुलगा निजला आहे, तो जेव्हां उठेल तेव्हां मी जेवीन." हें ऐकून इतर संत एकमेकांस हातांनीं खुणावून गालांतल्या गालांत हंसूं लागले. ते म्हणाले, "नामदेव वेडा आहे असें लोक म्हणतात, त्याचा प्रत्यक्ष अनुभव आज आपणास आला !" त्यांचें हें भाषण ऐकून नामदेवांस वाईट वाटलें. ते त्यांस म्हणाले, "तुम्ही सगळे संत म्हणवितां, परंतु परदुःखाची कल्पना तुम्हास नाहीं, याबद्दल मला वाईट वाटतें." इतकें बोलून ते पानावरून उठले आणि टाळवीणा हातीं घेऊन, एकाग्रचित्त करून, ऊर्ध्ववदनानें पांडुरंगाचें ध्यान करूं लागले. त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचा सारखा प्रवाह चालला होता. ते पांडुरंगास उद्देशून म्हणाले,

**"अरे हा कमलाकर द्विजवर । शुद्ध सत्वाचा पूर्ण सागर । तयाचा त्वां डंखिला कुमर । निष्ठुर अंतर पैं तुझें ॥ भावें भजती जे तुजसी । त्यांची छळणा करितोसि ऐसी । देवा तुझिया स्वभावासी । गोष्ट कैसी करूं आतां ॥ "**

पांडुरंगाचा असा उपहास करूनच नामदेव थांबले नाहींत तर त्यांनीं लागलीच प्रतिज्ञा केली कीं, " देवा, तूं जर या वेळीं येथें प्रगट होऊन माझें समाधान केलें नाहींस, तर यापुढें मी तुझें नांवही घेणार नाहीं. " आपल्या परमभक्ताचे हे निर्वाणीचे शब्द ऐकून त्या भक्तवत्सल पांडुरंगाचें चित्त द्रवलें. तो तत्काळ नामदेवांपुढें येऊन उभा राहिला. परंतु नामदेव देहभानावर नसल्यामुळें, भगवंताची श्यामसुंदर चतुर्भुज मूर्ति आपल्या-पुढें उभी आहे हें त्यांस कळलें नाहीं. मग पांडुरंगानेंच विचारलें, " नामदेवा, तुजवर असें कोणतें भयंकर संकट ओढवलें म्हणून तूं मला हांक मारलीस ? " नामदेवांनीं उत्तर दिलें. " देवा, वेड घेऊन पेडगांवास जाण्याची तुझी ही संवय मला ठाऊक आहे. अरे, तूं सर्वसाक्षी सर्वांतरात्मा असतां, मी तुला कां पाचारण केलें, हें तुला खरोखरच माहीत नाहीं काय ? देवा हीं सोंगें आतां पुरे कर, आणि या कमला-कराचा मुलगा पद्माकर हा सर्पदंशानें मृत्यु पावला आहे, त्याला आधीं जीवंत कर. " नामदेवांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडले मात्र तोंच, पाळण्यांतून पद्माकर आपल्या आईस हांक मारून म्हणाला, " आई, मला कांहीं तरी खायला दे ग. " बालकाचे हे शब्द कानीं पडतांच सुमति धांवत येऊन मुलापाशीं गेली आणि त्याला पाळण्यांतून बाहेर काढून तिनें नामदेवांच्या पायांवर घातलें. मग साश्रु नयनांनीं ती नामदेवांस म्हणाली, " महाराज, आपण साक्षात् परमेश्वर आहांत. आज मला आपण पुत्रदान दिलें. " इतर संतमंडळी हा सर्व देखावा तटस्थ होऊन पहात होती, त्यांना यांतलें कांहींच कळलें नाहीं. मग त्यांच्या सांगण्यावरून सुमतीनें पद्माकराच्या मृत्यूची सर्व हकीकत त्यांस सांगितली. तीं ऐकल्यावर नामदेवांच्या अधिकाराची पूर्ण कल्पना त्यांस होऊन, त्यांनीं नामदेवांची मुक्तकंठानें स्तुति केली. पुढील हकीकत महिपतीबुवांच्या प्रासादिक शब्दानींच सांगतों:—

**आम्ही म्हणवितों विष्णुभक्त । परी न कळे देवाचें मनोगत ।**
**ऐसें म्हणोनि सकळ संत । नमस्कारित नामया ॥**
**ऐसें म्हणोनि ते वेळीं । जयजयकारें पिटिली टाळी ।**
**सुमतीचे हृदयकमळीं । परमानंद उचंबळे ॥**
**मग पात्रीं बैसोनि सकळ संत । भोजनें करिती पंचामृत ।**
**कमळाकर पुत्रासहित । वैष्णवपंक्तींत बैसला ॥**
**जें जें रुचेल जयाप्रती । तें तें पात्रीं आणोन वाढी सुमति ।**
**तृप्त झालिया सकळ पंक्ति । करशुद्धि देत निजकरें ॥**

**विडे करोनि त्रयोदशगुणी । सुमति कमळाकर दोन्ही ।**
**येती सद्भावें लोटांगणीं । परमानंद ते समयीं ॥**
**म्हणती स्वामीचें झालें आगमन । आज चुकविलें महाविघ्न ।**
**आम्हांसि दिधलें पुत्रदान । म्हणोनि चरण वंदिती ॥**
**धन्य पतिव्रता सुमति । मंदिरीं जेविली संतपंक्ति ।**
**त्यांचें उच्छिष्ट महीपति । सेवोनि सत्कीर्ति गातसे ॥**

कमलाकराची ही कथा महीपतिकृत " संतलीलामृत " ग्रंथाच्या २९ व्या अध्यायांतून मी घेतली आहे. **मुळे**कृत जुन्या नामदेवचरित्रांतही ही कथा दिलेली आहे, परंतु ती **नरहरि धुंडीराज मालू**कृत " भक्तकथामृत " नामक अप्रसिद्ध व अमुद्रित ग्रंथाच्या आधारानें दिली असून, तींत आणि वरील कथेंत कांहीं ठिकाणीं थोडासा फरक आहे. महीपतींनीं कमलाकराच्या पत्नीचें नांव सुमति व मुलाचें नांव पद्माकर दिलें आहे, परंतु नरहरीच्या ' भक्तकथामृतांत ' हीं नांवें अनुक्रमें शुद्धमती आणि गोपाळ अशीं दिलीं आहेत. त्याचप्रमाणें, पंढरपुरांत संत आले आहेत हें नदीवर पाणी आणण्यास गेलेल्या शुद्धमतीनें पाहिलें व त्या संतांस आपल्या घरीं जेवावयास आणावें अशी विनंति तिनें कमलाकरास केली. कमलाकर देवपूजा करण्यांत गुंतला होता, त्यानें जेव्हां गांवांत संत आले आहेत असें ऐकलें तेव्हां तो देवपूजा तशीच टाकून संतांस बोलावण्यास वाळवंटावर गेला. कमलाकराची दारिद्र्यावस्था ऐकून, इतक्या मंडळीच्या जेवणाची सोय त्यास करितां येणार नाहीं, अशा समजुतीनें संतांनीं त्याचें आमंत्रण नाकारलें; व त्यामुळें कमलाकर, शुद्धमती व गोपाळ यांस फार वाईट वाटलें. गोपाळ म्हणाला, " मी स्वतः जाऊन संतांस घेऊन येतों. कदाचित् ते नच आले तरी त्यांच्या दर्शनाचा लाभ मला होईल. " इतकें बोलून तो तेथून निघाला आणि नामदेव ध्यानस्थ होऊन भगवंताची मानसपूजा करीत बसले होते तेथें आला व त्यांचे समोर नासाग्रीं दृष्टि लावून व कटीवर कर ठेवून उभा राहिला. कांहीं वेळानें नामदेवांनीं नेत्र उघडले तेव्हां गोपाळ समोर उभा असलेला पाहून, हा पांडुरंगच आहे असें त्यांस वाटलें व ते त्याचे चरणीं मस्तक ठेवूं लागले. परंतु गोपाळानें त्यांस तसें करूं न देतां, स्वतःची सर्व हकीकत त्यांस सांगितली व " सर्व संतांसह आज आपण आमच्या घरीं भोजनास आलें पाहिजे, " अशी त्यांस विनंति केली. नामदेवांनीं ती विनंति मान्य केली. पुढें गोपाळ गोंवऱ्या आणण्यास गेला असतां तेथें त्यास सर्पदंश होऊन तो मृत्यु पावला, तेव्हां

शुद्धमतीनें त्याचें प्रेत पाळण्यांत झांकून ठेविलें, हा कथाभाग महीपतींनीं वर्णिल्याप्रमाणेंच दिला आहे. पुढें, सर्व संत कमळाकराच्या घरीं येऊन पानावर बसले व ते पहिला घांस घेणार तोंच नामदेवांनीं त्यांस म्हटलें, " थांबा, घाई करूं नका. तुम्हांस विठ्ठलाची शपथ आहे. " हें ऐकतांच कांहीं संतांनीं हातांत घेतलेला ग्रास खालीं टाकला. मुलापरी मुलगा गेला आणि संतही आतां विन्मुख होऊन परत जाणार या विचारानें शुद्धमती फार दुःखाकुल झाली. नामदेव म्हणाले, " ज्यानें आम्हांस भोजनाचें आमंत्रण दिलें त्या गोपाळास आणून आमच्या पंक्तीस बसवा. " कमळाकरानें, मुलाच्या पायांस कांटा लागल्यामुळें तो निजला आहे असें सांगून वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. " मुलगा कोठें निजला आहे तो आम्हांस दाखवा, " असें नामदेवांनीं त्यांस सांगितलें. कमलाकरानें, पाळण्यांत आहे असें सांगितलें. तेव्हां नामदेवांच्या सूचनेवरून गोरोबा कुंभार मुलास आणण्यासाठीं पाळण्याजवळ गेले. परंतु घरची मोलकरीण त्यांस मुलास हात लावूं देईना. तेव्हां तिचें न ऐकतां गोरोबांनीं मुलाच्या अंगावरील वस्त्र काढलें, तों मुलाचें प्रेत त्यांच्या दृष्टीस पडलें. मग तें प्रेत बाहेर काढून व सर्व संतांस दाखवून ते म्हणाले, " अहो, हें प्रेत येथें पडलेलें असतां तुम्ही भोजन कसें करितां ?" तेव्हां सर्व मंडळी पात्रावरून उठूं लागली. त्या वेळीं नामदेव त्यांस म्हणाले, " जर कोणी पात्रावरून उठेल तर त्यास विठ्ठलाची शपथ आहे. " आतां पुढें काय होतें तें पहावें म्हणून सर्व मंडळी स्वस्थ बसली. नामदेवांनीं गोरोबांकडचें प्रेत घेऊन तें सर्व संतांच्यामध्यें आणून ठेविलें आणि तुम्हीं आपल्या दैवी सामर्थ्यानें या मुलास जिवंत करा, नाहींतर आपली अपकीर्ति होईल, असें त्यांस सांगितलें. सर्व संतांनीं ज्ञानदेव महाराजांकडे बोट दाखविलें. त्यांची आज्ञा वंद्य मानून, नामदेवांनीं तें प्रेत आपल्या मांडीवर घेतलें व भगवंताचा धांवा आरंभिला. पांडुरंगाच्या कृपेनें कांहीं वेळानें कमलाकराचा मुलगा जिवंत झाला. "

महीपतिकृत ' संतलीलामृत ' आणि नरहरि मालोकृत ' भक्तकथामृत ' या दोनी ग्रंथांत आलेल्या कमलाकराच्या गोष्टींत जो थोडासा फरक आहे व तो वरील माहितीवरून वाचकांच्या लक्षांत येईल.

पंढरपुरांत **परिसा भागवत** नामक एक ब्राह्मण रहात असे, तो रुक्मिणीचा उपासक होता. त्यानें निष्ठापूर्वक अनेक वर्षें रुक्मिणीची उपासना केल्यावर ती आदिमाया त्याला प्रसन्न झाली व तिनें त्यास एक परीस दिला. त्यानें तो परीस मोठ्या आनंदानें घरीं नेला आणि आपल्या कमळजा नामक बायकोपाशीं देऊन, "याच्या संबंधान फार काळजी

घे व आपल्यापाशीं परीस आहे ही गोष्ट कोणासही सांगूं नकोस," असें तिला बजावून सांगितलें. कारण रुक्मिणी प्रसन्न झाल्यावर तिजपाशीं दुसरा एखादा चांगला वर न मागतां, आपण परीस मागून घेतला ही गोष्ट जर नामदेवादि संतांस कळेल तर ते आपला उपहास करतील असें त्यास वाटलें. तो नित्य थोडेंसें लोखंड घेऊन त्याला तो परीस लावी व तें सोनें बाजारांत विकून त्याच्यावर आपल्या कुटुंबाचा निर्वाह मोठ्या थाटानें चालवी. परंतु आपली श्रीमंती लोकांस दिसूं नये याविषयीं तो फार खबरदारी घेत असे. अशा रीतीनें कांहीं दिवस गेल्यावर, एके दिवशीं त्याची बायको कमळजा ही चंद्रभागेवरून पाण्याची घागर घेऊन घरीं येत असतां, वाटेंत तिला नामदेवांची पत्नी राजाई भेटली. तेव्हां राजाई कमळजेस म्हणाली, "कमळजाबाई, अमळ थांबा, मी येवढी घागर भरून आणतें, मग आपण दोघीही बोलत बोलत घरीं जाऊं." त्याप्रमाणें राजाई, घागर भरून परत आल्यावर त्या दोघीही घरीं जाण्यास निघाल्या. राजाईच्या अंगावर धड वस्त्र नाहीं आणि गळ्यांत फुटका मणि नाहीं हें पाहून कमळजेस वाईट वाटलें. तिनें राजाईस विचारलें, "राजाई, तुमचा संसार कसा काय चालला आहे?" राजाई म्हणाली, "कमळजाबाई, तुम्हाला काय सांगूं? आमची स्थिति फार वाईट आहे. आपल्या घरचें दारिद्र्य कोणास सांगूं नये, पण तुम्ही येवढ्या कळवळ्यानें विचारतां म्हणून तुम्हास सांगत्यें. माझे यजमान संसार सोडून आणि सगळी लाजलज्जा टाकून पांडुरंगाच्या भजनीं लागले आहेत. घरांत काय आहे काय नाहीं, तें कांहीं पहात नाहींत. त्यांना मानापमान कळत नाहीं, लौकिकाची चाड नाहीं आणि लोक काय म्हणतील याची पर्वा नाहीं. अशा स्थितींत येवढ्या मोठ्या कुटुंबाचा निर्वाह कसा चालणार?" कमळजेनें विचारलें, "तुझे यजमान पांडुरंगाचे मोठे भक्त असून पांडुरंग त्यांना प्रसन्न आहे असें लोक बोलतात. मग पांडुरंगानें त्यांना चरितार्थाचें कांहीं तरी साधन दिलें नाहीं, हें कसें? तुमचें दारिद्र्य ज्याला दूर करितां येईना, त्या देवाला भजून लाभ कोणता? म्हणून आमच्या यजमानांनीं पांडुरंगाची उपासना न करतां रुक्मिणीची उपासना केली आणि तिनें प्रसन्न होऊन आम्हांस एक परीस दिला आहे. त्या परिसाला लोखंड लावून आम्ही त्याचें सोनें करितों आणि तें बाजारांत विकून जो पैसा येईल त्याजवर कुटुंबाचा निर्वाह करितों. आई रुक्मिणीच्या कृपेनें आम्हाला कांहीं कमी नाहीं हो. हे पाहिलेस का माझे दागिने! ही डुल्लड, ह्या वांक्या, हे तोडे आणि ही नथ परवां सोलापुराहून मुद्दाम आणली आहे! आमच्या

मुलांच्या अंगावरही असेच भारी किंमतीचे दागिने आहेत. आतां, आमच्या घरांत परीस आहे हें लोकांस कळूं नये म्हणून आम्ही बाहेरून फारशी श्रीमंती दाखवीत नाहीं; नाहींतर आम्ही नोकर चाकर देखील ठेवले असते आणि गाडीघोड्यांतून फिरलों असतों. " कमळजेच्या श्रीमंतीचें हें सगळें वर्णन ऐकून गरीब बिचारी राजाई अगदीं चकित होऊन गेली. ती म्हणाली, " कमळजाबाई, परीस कसा असतो तो मी अद्याप पाहिला नाहीं. तुम्ही आपला परीस क्षणभर मला दाखवाल काय ? " कमळजा म्हणाली, " दाखवीन हो. तूं केव्हां तरी माझ्या घरीं ये म्हणजे दाखवीन. मात्र ही गोष्ट या कानाची त्या कानास देखील कळतां कामा नये हें लक्ष्यांत ठेव. नाहींतर मोठा घात होईल. "

दुसरे दिवशीं, राजाई कमळजेच्या घरीं गेली तेव्हां कमळजेनें देव्हाऱ्यांतला परीस आणून तिजपाशीं दिला आणि तिला सांगितलें कीं, " हा परीस आपल्या घरीं ने आणि एखाद्या लहानशा लोखंडाच्या वस्तूस लाव, म्हणजे तिचें सोनें होईल. मग हा परीस, दुसऱ्या कोणास न दाखवितां, माझा मला परत आणून दे. " " ठीक आहे " असें म्हणून व कमळजेचे आभार मानून, राजाई परीस घेऊन घरीं गेली. व घरांतलें थोडेसें लोखंड त्या परिसास लावून त्याचें तिनें सोनें केलें. मग तें सोनें बाजारांत विकून, सर्व प्रकारची अन्नसामग्री घेऊन ती घरीं आली. स्वयंपाकाच्या गडबडींत कमळजेचा परीस परत करण्याची आठवण तिला राहिली नाहीं. ती स्वयंपाकांत गुंतली असतां नामदेव बाहेरून घरीं आले. स्वयंपाकाचा घमघमाट सुटलेला पाहून त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. त्यानीं राजाईस विचारलें, " ही येवढी अन्नसामग्री कोठून आली ? " राजाई म्हणाली, " ती चौकशी तुम्हास कशास पाहिजे ? तुम्ही आपले हातपाय धुवा आणि पाटावर बसा. आजपासून तुम्हास संसाराची चिंता करण्याचें कारण राहिलें नाहीं. " राजाईची ती बोलण्याची तऱ्हा आणि घरांतला एकंदर थाटमाट पाहून, " आज हें गौडबंगाल आहे तरी काय ? " असें त्यानीं राजाईस विचारलें व " ही गोष्ट मला समजल्याशिवाय मी अन्नग्रहण करणार नाहीं, " असेंही त्यानीं तिला निक्षून सांगितलें. राजाई मोठ्या विचारांत पडली. काय करावें हें तिला सुचेना. सांगावें तर कमळजेस दिलेलें वचन मोडावें लागतें, न सांगावें तर नामदेव अन्नग्रहण करणार नाहींत. शेवटीं, काय होईल तें होवो, पण खरी गोष्ट नामदेवांस सांगावी हेंच बरें, असा विचार करून, परिसा भागवताच्या घरून आणलेल्या परिसाची सर्व हकीकत तिनें नामदेवांस सांगितली. आपल्या घरास आज

द्रव्याचा विटाळ झाला या विचारानें नामदेवांच्या अंगावर शहारे आले, परंतु उघड तसें न दाखवितां ते राजाईस म्हणाले, " परीस मीं कधीं पाहिला नाहीं, तो कसा असतो पाहूं बरें. " राजाईनें तो परीस आणून त्यांच्या हातीं दिला. परीस हातांत पडतांच नामदेवांनीं जी एकदम धूम ठोकली ती चंद्रभागेपर्यंत. चंद्रभागेवर येऊन त्यांनीं तो परीस पाण्यांत फेंकून दिला आणि महीपतींच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे, ' उपाधिरहित ' होऊन ते परत घरीं आले. आणि भजन करीत बसले. राजाईच्या मनाचा पूर्ण विरस होऊन, वर आणखी लोकांचा परीसही गेल्यामुळें ती बिचारी स्फुंदस्फुंदून रडत होती. इकडे परिसा भागवत आपल्या घरीं पूजेस बसला असतां देव्हाऱ्यांतील सांबळींत ठेवलेला परीस नाहींसा झाल्याचें त्यास आढळून आलें तेव्हां त्याच्या पोटांत धस्स झालें. परीस जर खरोखर चोरीस गेला असेल तर आज आपला संसार साफ बुडाला असें त्यास वाटलें. परंतु छाती बडवून आरडाओरड करण्यापूर्वीं पत्नीस एकदां विचारून पहावें, म्हणून कमळजेस हाक मारून त्यानें विचारलें, " अग या संबळींतला परीस काय झाला ? " तिनें भीत भीत उत्तर दिलें, " नामदेवांच्या राजाईनें घटकाभर मागून नेला आहे. " परिसा म्हणाला, " ठीक ! हें भविष्य मी पूर्वींच केलें होतें. तुम्हां बायकांची जातच अशी मूर्दाड ! तुमच्या तोंडांत कोणती गोष्ट कधीं राहिली आहे ? आतां अगोदर जा आणि राजाईकडून तो परीस मागूण आण. " बिचारी कमळजा निमूटपणें उठली आणि राजाईच्या घरीं गेली. कमळजेस पाहतांच, ही आपला परीस मागण्यास आली आहे हें राजाईनें ताडलें. परंतु नामदेवांनीं चंद्रभागेंत नेऊन टाकलेला परीस ती कमळजेस कसा देणार ? ती तिला मोठ्या काकुळतीनें म्हणाली, " कमळजाबाई, माफ करा. माझ्या हातून तुमचा मोठा अपराध घडला आहे. माझ्या यजमानांनीं तुमचा परीस पहावयास म्हणून मागून घेतला आणि चंद्रभागेंत नेऊन टाकला. " ते शब्द कानीं पडतांच कमळजेच्या उरांत भयानें धडकी भरली. परीस न घेतां जर आपण घरीं गेलों तर आपली कांहीं धडगत नाहीं असें तिला वाटलें. मग ती, राजाईस बरोबर घेऊन, नामदेव चंद्रभागातीरीं ध्यानस्थ बसले होते त्यांजपाशीं आली. राजाईनें नामदेवांस सांगितलें कीं, परिसा भागवताची स्त्री कमळजा आपला परीस मागण्यास आली आहे. नामदेव म्हणाले, " तो परीस मी चंद्रभागेंत टाकला. " हें ऐकतांच राजाई व कमळजा दोघीही मोठमोठ्यानें ओक्साबोक्शीं रडूं लागल्या. त्यांची ओरड ऐकून पुष्कळ लोक तेथें जमा झाले. इतक्यांत, परिसा भागव-

ताच्या घरीं जाऊन कोणी उपद्यापी माणसानें त्यास कळविलें कीं, " तुझा परीस नामदेवानें चंद्रभागेंत टाकला, म्हणून तुझी बायको नदीवर ऊर बडवीत बसली आहे. " परिसा भागवत धांवतच नदीवर गेला आणि आपलें डोकें बडवीत म्हणाला, " अहो, या लबाड नाम्यानें आमच्या परिसाचा अभिलाष धरून तो युक्तीनें आपल्या बायकोकडून मागवून नेला आणि आतां नदींत टाकला म्हणून खोटेंच सांगत आहे. " लोकांस काय ? त्यांना ती एक करमणूकच झाली. त्यांतले कोणी परिसा भागवतास म्हणाले, " तुजपाशीं परीस होता याला आधीं प्रमाण काय ? आणि जर तुजपाशीं खरोखरच परीस होता तर ही गोष्ट तूं आमच्यापासून इतके दिवस लपवून कां ठेवलीस ? " दुसरे कोणी म्हणाले, " याजपाशीं असलें कांहीं तरी असेल हें आम्ही पूर्वींच ताडलें होतें. येरवीं इतका पैसा अडका, इतके दागदागिने या ब्राह्मणाच्या घरांत आले कोठून ? " तिसरा एक जण म्हणाला, " नामदेवाची स्थिति याला ठाऊक असून, यानें आपला परीस त्याला दिला कसा ?" याप्रमाणें—

**" नाना परींचे त्रिविध जन । दोघांसि निंदिती लावून गुण ।**
**कोणी भाविक भक्तजन । करिती स्तवन नामयाचें ॥**
**म्हणती सोनें आणि माती । विष्णुदासांसि सारखीं दिसती ।**
**परिसाचा अभिलाष चित्तीं । हा कल्पांतीं करीना ॥**
**कुटिल म्हणती ते वेळां । मैंद गळां घालिती तुळसीमाळा ।**
**ब्राह्मणाचा परीस अभिलाषिला । हा कैसा भला म्हणावा ॥**

लोकांच्या या बडबडीनें परिसा भागवत अगदीं वैतागल्यासारखा होऊन नामदेवांस म्हणाला, " तुझा देव आणि तूं त्याचा भक्त, दोघेही चोराचे भागिदार दिसतां. बाहेरून विरक्तता दाखवून आणि तुळसीच्या माळा गळ्यांत घालून लोकांचे असे गळे कापतोस काय ? " नामदेवांनीं शांतपणें उत्तर दिलें, " तुमचा परीस मला कशाला पाहिजे ? आणि तुम्हीही स्वतः उदासीनता दाखवितां, तेव्हां तुम्हाला तरी तो कशास पाहिजे ? म्हणून मी तो चंद्रभागेच्या डोहांत फेंकून दिला. तुम्ही डोहांत उतरून पाहिजे तर आपली खात्री करून घ्या. " हें ऐकून सगळे लोक हंसूं लागले. कोणी म्हणाले, " काय हो याचें विचित्र भाषण हें ! डोहाच्या तळाशीं लक्षावधि गोटे आहेत. त्यांतला अमकाच परीस हें कोण कसें ओळखणार ?" नामदेव म्हणाले, 'अमळ थांबा. मी याचा परीस आतांच काढून दाखवितों. ' इतकें बोलून त्यांनीं डोहांत उडी टाकली आणि एक ओंजळभर दगड घेऊन ते वर आले. मग त्यांनीं परिसा भागवतास म्हटलें,

" महाराज, यांतला तुमचा परीस कोणता तो ओळखून घ्या." हें ऐकून लोक पुनः हांसूं लागले. कोणी म्हणाले, " याच्या दृष्टीस दगड आणि परीस सारखेच दिसतात." इतक्यांत एक गृहस्थ म्हणाला, " पण येवढें कशाला? कोणी तरी थोडेंसें लोखंड आणा, आपण तें या दगडांस लावून पाहूं, हातच्या कांकणास आरसा कशाला?" मग एक मूठभर सुया आणून त्या नामदेवांच्या हातांतल्या खड्यांस लावण्यांत आल्या. खड्यांचा स्पर्श होतांच सगळ्या सुयांचें सोनें झालें! नामदेवांनीं डोहांतून काढलेले सगळेच दगड परीस आहेत हें पाहतांच भाविकांस मोठा आनंद होऊन त्यांनीं विठ्ठल नामाचा जयजयकार केला. ज्याचा हस्तस्पर्श होतांच दगडाचे परीस होतात तो महासमर्थ नामदेव आपल्या परिसाचा अभिलाष कशास करील हा विचार परिसा भागवताच्या मनांत येतांच त्याला फार पश्चात्ताप झाला. तो नामदेवांस म्हणाला, ' हे साधु पुरुषा, तुझी खरी योग्यता मी आतां ओळखली. तुझ्या भाग्याचें वर्णन मी काय करूं? रुक्मिणी मातेनें कृपाळू होऊन मला एक परीस दिला होता, तो दृष्टिआड होतांच मी जीव द्यावयास निघालों; पण स्वतःच्या नुस्त्या हस्तस्पर्शानें दगडाचा परीस करण्याचें सामर्थ्य तुझ्या अंगीं आहे. मी मूर्खपणानें, माझ्या परिसाचा अभिलाष केल्याचा आरोप तुजवर केला, या महान् अपराधाची मला क्षमा करून मजवर आतां अनुग्रह कर. आतां या उपर परिसाची मला जरुरी नाहीं, तुझा वरदहस्त मस्तकीं असला म्हणजे पुरे." मग नामदेवांनीं हातांतले सगळे परीस चंद्रभागेंत फेंकून दिले व परिसा भागवतास अनुग्रह देऊन त्याचा उद्धार केला.

रा. आवटे यांनीं प्रसिद्ध केलेल्या नामदेवी गाथ्यांत परिसाभागवताचे म्हणून १९ अभंग दिले आहेत. हे सर्वच अभंग जरी परिसा भागवताचे नसले तरी त्यांतील कांहीं अभंगांवरून असें दिसतें कीं, तुकारामबुवांचें शिष्यत्व पतकरण्यापूर्वी रामेश्वरभट्ट हे जसा बुवांचा द्वेष करीत असत, त्याप्रमाणें हा परिसा भागवतही आरंभीं नामदेवांचा द्वेष करीत असे. पुढील अभंग पहाः—

**" परिसा म्हणे नामयासी। अरे नामदेवा परियेसीं।**
**तूं तंव दवडिल्या न जासी। मनीं न लाजसी अजुनी॥ १॥**
**परसा वदे नामयासी। तुझे पूर्वज माझे चरणापाशीं।**
**जरी तूं हरिदास झालासी। तरी याती हीनचि॥ २॥**
**तुवां कोठवरी काय देखिलें। नाहीं वेदशास्त्र म्हणितलें।**
**एक तुजचि जाणितलें। इतुकें झालें सांगावया॥ ३॥**

आणीक सांगेन एक । तूं तर ठायींचाचि वासनिक ।
मातें लाविसी मौन टिलक । तेथें पाईक काय करी ॥ ४ ॥
तयासी त्वां कौटल्य केलें । सहस्र वैष्णवांमाजी भुरळ ठेले ।
तंव ते उमगों लागले । मग भुलले आपोआप ॥ ५ ॥
ऐसा तूं कंवटाळिया पाहीं । तुझे पूर्वज माझे पायीं ।
मनीं शंका धरिसी कांहीं । अझुनी तरी विचारीं पां ॥ ६ ॥
तुजसी करितों वादक । तरी हे शंकतील लोक ।
तूं तंव माझाचि सेवक । विष्णुदासा म्हणे परसा ॥ ७ ॥

यावरी नामदेव काय बोलिला । आजी मनीं संतोष फार झाला ।
शब्द पूर्वजांचा ऐकिला । आनंदें भरला सागर ॥ १ ॥
परसोबास म्हणे नामा । चरणतीर्थ द्यावें आम्हा ।
तुमचे चरणींचा महिमा । माझ्या पूर्वजां आतुडला ॥ २ ॥
इतुके दिवस गिवसितां पाहीं । परि हे व्यवस्था न पडे ठायीं ।
पूर्वज आहेत तुझे पायीं । तें म्या आजी जाणितलें ॥ ३ ॥
तयांसि आपुले चरणीं राहविलें । म्यां काय पूर्वीं कर्म केलें ।
त्वां मज वेगळें धरियेलें । थितें अंतरलें चरणतीर्थ ॥ ४ ॥
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य समस्त । हे तंव तुमच्या पायां पडत ।
तयां दंडवत घडत । दोष जाती तयांचे ॥ ५ ॥
ऐसें ठायींचेंचि जाणतों । तरी कासया हिंडतों ।
चरण धरूनीच रहातों । विष्णुदास ह्मणे नामा ॥ ६ ॥

हे दोन्ही अभंग नामदेव किंवा परिसा भागवत यांचे नाहींत परंतु त्यांची भाषा बरीच जुनी–एकनाथांपूर्वीची दिसते. अशा प्रकारचे जे हे अनेक फुटकळ अभंग गाथ्यांत छापलेले आहेत, त्यांचें सामग्र्येंकरून अवलोकन केलें असतां, असें खात्री-पूर्वक वाटतें कीं, प्रस्तुत चरित्रनायक नामदेव व त्यांच्याशीं ज्यांचा ज्यांचा संबंध आला होता असे नामदेव, विसोबा खेचर, परिसा भागवत, गोरा कुंभार वगैरे तत्कालीन इतर संत यांच्या कथा एकत्र संगृहीत करण्यासाठीं एखाद्या तत्कालीन कवीनें अभंगबद्ध असा एक मोठा स्वतंत्र ग्रंथच लिहिला असला पाहिजे व कालांतरानें तो ग्रंथ नष्ट होऊन त्यांतले हे थोडेसे फुटकळ अभंग मात्र शिल्लक राहिले असले

पाहिजेत. आतां वरील दोन अभंगांतून आपणास कोणती माहिती मिळतें हें पाहूं. पहिल्या अभंगाच्या पहिल्या चरणावरून, नामदेव हे शूद्र असतां आपणास संत म्हणवितात व हजारों लोक त्यांच्या भजनीं लागले, या गोष्टीचा परिसा भागवतास मोठा संताप आलेला दिसतो; व म्हणून त्यानें, " तूं हीन जातीचा असून, साधुत्वाची मोठी घमेंड बाळगतोस; पण लक्ष्यांत ठेव, मी मोठा दशग्रंथी विद्वान् ब्राह्मण आहें आणि तुझे पूर्वज माझ्या पायांजवळ आहेत. तुझ्याशीं जर मी वाद घालीत बसलों तर 'काय हो, हा विद्वान् ब्राह्मण या शूद्राशीं वाद घालीत बसला आहे,' असें हे लोक म्हणतील. म्हणून तुला इतकेंच सांगतों कीं तूं माझा सेवक आहेस आणि माझी आज्ञा तुला मान्य केलीच पाहिजे," ह्या त्याच्यासारख्या कर्मठ ब्राह्मणास शोभण्यासारख्या कठोर शब्दांनीं नामदेवांचा त्यानें अधिक्षेप केला. त्यावर, नामदेवांनीं आपल्या शांततेचा बिलकुल भंग होऊं न देतां जें मासलेवाईक उत्तर दिलें तें दुसऱ्या अभंगांत ग्रथित झालेलें आहे. परिसा भागवतास नामदेव म्हणाले, " महाराज, माझे पूर्वज आपल्या पायांपाशीं आहेत हें ऐकून खरोखरच मला मोठा आनंद झाला. माझ्या पूर्वजांस आपल्यासारख्या थोर पुण्यपुरुषाच्या पायांपाशीं स्थान मिळालें तें ठीकच झालें. पण माझी गरिबाची वाट काय ? माझा उद्धार कसा होणार ? तर कृपा करून आपण मला आपलें चरणतीर्थ देऊन पावन करावें. माझ्या पूर्वजांस आपण आपल्या पायांपाशीं स्थान देऊन त्यांचें सार्थक्य केलें; पण माझ्या हातून पूर्वं जन्मीं कांहीं तरी भयंकर पातक घडलेलें असल्यामुळें मी मात्र आपल्या चरणतीर्थास अंतरलों. आपल्या पायांच्या ठिकाणीं येवढें विलक्षण सामर्थ्य आहे हें जर मला पूर्वींच कळतें तर, महाराज, आत्मोद्धारार्थ गांवोगांव न फिरतां आपलेच पाय धरून मी बसलों असतों." नामदेवांच्या ह्या उपरोधिक भाषणाचा, स्वतःस अनुकूल असा अर्थ करून व नामदेव आपणास शरण आला आहे असें समजून परिसा भागवत मोठ्या दिग्विजयी मुद्रेनें घरीं गेला आणि नामदेवांच्या स्वकृत पराजयाची हकीकत आपल्या पत्नीस त्यानें मोठ्या आढ्यतेनें सांगितली—

**" परसा सांगे स्त्रियेपाशीं । अवो अपूर्व वर्तलें पंढरीसी ।**
**मज आणि नामयासी । जाला वाद परस्परें ॥ १ ॥**
**परसा सांगे आपुली महिमा । आजी फजित केला नामा ।**
**पुढती शरण आला आम्हां । सकळ जनां देखतां ॥ २ ॥**

आम्ही तयासी निर्भर्त्सिलें । परि ते आमुच्या पायीं लागले ।
काकुळती शरण आले । मग सोडिलें तयातें ॥ ३ ॥
आम्ही साक्षात् विष्णुदास । त्यानें म्हणवावें विप्रदास ।
ऐसें असावें प्रत्यक्ष । विष्णुदास कां म्हणवी ॥ ४ ॥
तूं म्हणसी एक नामा । येर वाउगीच उपमा ।
त्यापाशीं असता परमात्मा । तरि कां आम्हा शरण येता ॥ ५ ॥
खालील पायरी तयाची जाण । वरी आम्हासि महिमान ।
आमुच्या हृदयीं परमात्मा आपण । सदा जागृत वसतसे ॥ ६ ॥
धन्य धन्य माझें कुळगोत्र । नाम पावलों भागवत ।
केलिया पुण्या नाहीं मित । आणि वेदांत मी जाणें ॥ ७ ॥
यातिहीन विष्णुदास म्हणविती । तेणें ते नर भय पावती ।
तयांसि न चुके पुनरावृत्ति । विष्णुदास म्हणे परसा ॥ ८ ॥

यावर त्याच्या बायकोनें त्याची जी कानउघाडणी केली तीही मुद्दाम वाचण्यासारखी आहे:—

यावरी काय बोलिली पतिव्रता । विनंति करितें कोपूं नका ।
तुम्हासी गर्व जरी नसता । तरी घरीं भेटता परमात्मा ॥ १ ॥
तुम्ही ब्राह्मण पवित्र धन्य । मुखीं वेद हरीचें नाम ।
वरी गर्व अवलक्षण । सकळही धर्म लोपले ॥ २ ॥
अमृत घातलें पाषाणावरी । वरिवरी ओला कोरडा भीतरी ।
तसा घात तुमच्या शरीरीं । गर्वें हरि न भेटेचि ॥ ३ ॥
गाय ते सर्वां ठायीं पवित्र । परी तिची वासना अपवित्र ।
तैसें तुमचें धन्य कुळगोत्र । गर्व अपवित्र सांडा जी ॥ ४ ॥
तुम्हासी चाड जरी हरीसी । तरी मत्सर करूं नका नामदेवासी ।
तो आलिया घरासी । हरि तुह्मासी भेटेल ॥ ५ ॥
आतां आदर करोनि आणाल नामा । तयासवें येईल परमात्मा ।
भेट होईल तुम्हा आम्हा । त्या नामयाचेनि प्रसादें ॥ ६ ॥
आणखी एक अवधारीं । राउळा येत होते हरि ।
नामा होता बरोबरी । अंचळ सरसावी रखुमाई ॥ ७ ॥

**आणखी येक वृत्तांत ऐकिला । कीर्तनासी नामदेव आला ।**
**द्वारकेचा भोपा पोळला । तो बुझाविला येथोनी ॥ ८ ॥**
**आणिक महादेवद्वारीं कीर्तन मांडिलें । हें आंवढ्यासी वर्तलें ।**
**देऊळ तयाकडे फिरलें । भलें नवल नामयाचें ॥ ९ ॥**
**ऐसें बोलली कमळजा । तुम्ही स्वामी मी तुमची भाजा ।**
**गर्व सांडा जी वोजा । तरी पंढरिराज भेटेल ॥ १० ॥**

नामदेवांची खरी योग्यता परिसा भागवताच्या बायकोस समजत होती, पण खुद्द परिसा मात्र आपल्या उच्चवर्णीयत्वाच्या तोऱ्यांत नामदेवांची निंदा करीत असे. कर्मठ ब्राह्मण आणि भागवतधर्मीय संत यांचा हा विरोध याच कालीं सुरू झाला व पुढें एकनाथ आणि तुकाराम यांच्या वेळीं त्याची पुनरावृत्ति झाली. वरील अभंगांत, द्वारकेंत लागलेली आग पंढरीहून नामदेवांनीं विझविली व आंवढ्या नागनाथानें देऊळ फिरविलें, या दोन चमत्कारांचा उल्लेख आलेला आहे.

परिसा भागवत हा एकदां लंकेसही गेला होता अशी कथा एका अभंगांत आढळते. परिसा भागवतास रुक्मिणी प्रसन्न होती, तिजपाशीं त्यानें एकदां, लंका पाहण्याची आपली इच्छा व्यक्त केली. तेव्हां रुक्मिणीनें त्याला आपल्या दैवी सामर्थ्यानें लंकेंत नेऊन सोडलें. परिसा भागवतास लंकेस जाण्याची इच्छा होण्याचें कारण हें कीं तो पंढरींत महाद्वारीं रामायणावर पुराण सांगत असे व पुष्कळ श्रोते त्याचें पुराण ऐकण्यास येत असत. एके दिवशीं तो पुराण सांगत असतां, कथानुषंगानें लंकेचा उल्लेख आला, तेव्हां नामदेवांनीं त्यास विनंति केली कीं, " लंका नगरी कशी काय आहे व तेथें कोणते लोक राहतात हें आम्हांस कृपा करून आपण सांगावें. " यावर " शास्त्रांत पाहून सांगतों, " असें उत्तर परिसा भागवतानें दिलें. नंतर, वर सांगितल्याप्रमाणें रुक्मिणीच्या प्रसादानें तो लंकेंत गेला व तेथील शोभा पाहूं लागला. फिरत फिरत तो जेव्हां लंकापति बिभीषणाच्या वाड्यांत आला तेव्हां तेथें नामदेवांचें कीर्तन चाललें आहे असें त्याला दिसलें. पंढरीचा नामदेव लंकेंत कसा आला याचा तो विचार करतो आहे, इतक्यांत, नामदेवांच्या तोंडून कीर्तनांत, " जे माझ्या पंढरिनाथाला शरण गेले त्यांस काय अशक्य आहे ? " असे उद्गार निघालेले त्यानें ऐकले व संतांच्या विलक्षण सामर्थ्याविषयीं त्याची खात्री होऊन चुकली. मग परत पंढरपुरास जाण्याची आपली इच्छा त्यानें व्यक्त करितांच रुक्मिणीनें निमिषार्धांत त्याला पंढरींत आणून सोडलें. दुसरे दिवशीं, पुराणाचे वेळीं नामदेवांस त्यानें लंकेची सर्व हकीकत सांगितली व बिभीषणाच्या मंदिराचेंही वर्णन केलें. तेव्हां नामदेव त्यास

म्हणाले, "बिभीषणासारख्या महाभगवद्भक्ताचें प्रत्यक्ष दर्शन तुम्हांस झालें असतां, त्याला तुम्ही नमस्कारही न करितां परत आलां हें काय ?—

**"हातीं तुझ्या आला होता चिंतामणि । कैसा तो गोफणी लाविलासी ॥ कल्पवृक्ष तुझ्या अंगणीं लाविला । कैसा उपडिला अभागिया ॥ अमृताचा घट हातासी लाधला । कैसा उलंडिला वेडिया तूं ॥ तैसा महाराज तोचि बिभीषण । कां नाहीं नमन केलें त्यासी ॥ सदोदित ज्याचे हृदयीं रामचंद्र । दुजा कां विचार धरिला तेथें ॥ अहंकारें मोठेमोठे नाडलेती । सांगसी त्या युक्ति शास्त्रार्थाच्या ॥ तोचि अहंकार धरिला अजून । होईं आतां लीन संतांपायीं ॥ तेणें हा झडेल अंतरींचा मळ । दिसेल सकळ ब्रह्मरूप ॥"**

नामदेवांची ही स्पष्टोक्ति ऐकून परिसा भागवत अगदीं लज्जायमान् झाला, परंतु ब्राम्हण्याच्या अभिमानाचें वारें त्याच्या अंगांतून अद्याप पूर्णपणें गेलेलें नसल्यामुळें, तेथल्या तेथें नामदेवांस शरण जाण्याची बुद्धि त्याला झाली नाहीं. तो तेथून उठून रुक्मिणीपाशीं गेला आणि पांडुरंगाचें आपणास प्रत्यक्ष दर्शन करविण्याविषयीं तिनें तीस विनंति केली. परंतु तिनें सांगितलें कीं, "भगवंताचें दर्शन करविण्याचा अधिकार मला नाहीं. तूं निरभिमान होऊन नामदेवास शरण जा, म्हणजे तो तुला पंढरिनाथाचें दर्शन करवील." त्याप्रमाणें, परिसा भागवत शेवटीं नामदेवांस शरण गेला व त्यांच्या उपदेशानें कृतार्थ होऊन, तत्कालीन संतमंडळांत आपलें नांव त्यानें दाखल करून घेतलें. परिसा भागवताची म्हणण्यासारखी कविता उपलब्ध नाहीं; गाथ्यांत त्याच्या नांवावर कांहीं अभंग छापले आहेत, परंतु त्यांतले चार दोन अभंग शिवायकरून, बाकीचे सर्व अभंग निर्विवाद क्षेपक दिसतात. तथापि या बाबतींत एक गोष्ट मुद्दाम लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे ती ही कीं, नामदेवी गाथ्यांत नामदेवाची आदि, तीर्थयात्रेचे अभंग वगैरे नामदेवचरित्रात्मक जीं अभंगबद्ध प्रकरणें आहेत, त्यांचा कर्ता हा परिसा भागवतच असण्याचा संभव आहे. नामदेवांचा तो शिष्य असल्यामुळें, नामदेवांच्या उत्तरवयांत, त्यानें त्यांजकडून त्यांची स्वतःची व त्यांच्या पूर्ववयांत होऊन गेलेल्या निवृत्ति, ज्ञानदेवादि भावंडांची माहिती विचारून घेतली असावी व तिच्या आधारानें उपरिनिर्दिष्ट चरित्रविषयक प्रकरणें लिहून ठेवलीं असावीं, असा माझा तर्क आहे.

---

# प्रकरण चौथें.

मागील प्रकरणांत, परिसा भागवत हा रुक्मिणीदेवीच्या कृपेनें लंकेस जाऊन आल्याची कथा दिली आहे. ती नामदेवचरित्रविषयक जुन्या अभंगांच्या आधारानें दिली आहे. परंतु हीच कथा संतचरित्रकार महीपतिबावांनीं आपल्या 'संतलीलामृत' ग्रंथांत थोड्या भिन्न रीतीनें सांगितलेली आढळते. 'साळ्या रसाळ' या नांवाचा एक ब्राह्मण पंढरपुर येथें रहात असे, त्यास रुक्मिणी प्रसन्न होती. या साळ्या रसाळानें रामायणावर एक प्राकृत ग्रंथ लिहिला होता, त्याचें नांव 'रसाळ रामायण.' या ग्रंथाचें वर्णन महीपतींनीं येणेंप्रमाणें केलें आहेः—

**" ऐसें असतां साळयानें । आरंभिलें प्राकृत रामायण ।**
**आदिमातेसि पुसोन । ग्रंथ गीर्वाण पाहिला ॥**
**त्याच्या संमतें निश्चिती । प्राकृत टीका केली वरुती ।**
**अमृताहूनि रसोत्पत्ती । दृष्टांत रीति अनुपम ॥**
**परम रसिक त्याचें बोलणें । ऐकतां द्रवे खळाचें मन ।**
**साळया रसाळ नामाभिधान । यास्तव सज्ञान बोलती ॥ "**

अशा प्रकारचा सुंदर ग्रंथ लिहिण्यास साळ्या रसाळानें प्रारंभ केला व सुंदरकांड पुरें होतांच त्याला मोठें समाधान वाटलें. आपल्या हातून अशी सुंदर ग्रंथनिष्पत्ति करविल्याबद्दल रुक्मिणी मातेचे त्यानें कृतज्ञतापूर्वक आभार मानले. तेव्हां ती म्हणाली, 'साळ्या, नामदेवाला आपल्या घरीं बोलावून त्याला ग्रंथ दाखव. त्याला जर तो पसंत पडला तर तो तुला वरप्रसाद देईल.' साळ्या म्हणाला, " देवी, मी उच्चवर्णीय ब्राह्मण असून नामदेव हा यःकश्चित् शिंपी आहे. त्याला मी आपली रचना कशी दाखवूं ? " यावर रुक्मिणीनें त्याचा निषेध करून त्याला म्हटलें, " साळ्या, नामदेवास तूं सामान्य मनुष्य समजतोस काय ? त्याचा अधिकार फार मोठा असून, पांडुरंगाचा तो एकनिष्ठ उपासक आहे. तरी, आपल्या उच्चवर्णीयत्वाची प्रौढी बाजूस ठेवून तूं त्याला आपल्या घरीं सन्मानपूर्वक आण आणि आपलें रामायण त्याला दाखव." मग, त्याप्रमाणें साळ्यानें नामदेवांस आपल्या घरीं बोलावून नेलें आणि त्यांचा यथोचित आदरसत्कार करून, आपल्या सुंदरकांडाचा कांहीं भाग त्यांस ऐकविला. ग्रंथाचें वाचन पुरें होईपर्यंत, नामदेव साळ्याच्या घरीं नित्यनियमानें जात असत. एके दिवशीं

साळ्या रसाळ ग्रंथ वाचीत असतां, " मारुती समुद्र उल्लंघन करून लंकेंत गेला आणि एका वृक्षावर बसला, " या कथेचा उल्लेख आला. तेव्हां नामदेवांनीं ग्रंथकारास सहज विचारलें कीं, " मारुती ज्या वृक्षावर बसला, तो वृक्ष कशाचा ? " साळ्या रसाळास या प्रश्नाचें उत्तर देतां येईना. त्यानें पोथी गुंडाळून ठेवली व श्रोतेही घरोघर निघून गेले. मग साळ्यानें आसन ठोकून, समाधिद्वारा रुक्मिणी मातेचें आवाहन केलें. तेव्हां ती प्रगट होऊन त्यास म्हणाली, " तूं मला कां बोलावलेंस ? " साळ्यानें तिचे पाय धरून सांगितलें, ' देवी, मारुती समुद्रोल्लंघन करून लंकेंत ज्या वृक्षावर जाऊन बसला, त्या वृक्षाचें नांव कृपा करून मला सांग. ' देवी म्हणाली, " चल, तुला मी लंकेंत घेऊन जातें. तेथें तो वृक्ष तूं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनींच पहा. " यापुढील सर्व कथाभाग, मागील प्रकरणांतील परिसा भागवताख्यानांतल्यासारखाच आहे. तेव्हां निरनिराळ्या दोन चरित्रकारांनीं, या कथेंत, परिसा भागवत आणि साळ्या रसाळ, हे जे दोन नायक घातले आहेत त्यांतला खरा कोण व तोतया कोण, कीं ही कथाच खोटी, याचा निर्णय वाचकांनींच करावा हें बरें.

' तीर्थावळी ' या नांवाचें एक अभंगबद्ध प्रकरण उपलब्ध आहे व त्याचें कर्तृत्वही, प्रत्येक अभंगाच्या शेवटीं ' नामा ' किंवा ' नामदेव, ' या नांवांचा उल्लेख असल्या-मुळें, नामदेवांनाच देण्यांत आलेलें आहे. परंतु सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केल्यास असें दिसून येईल कीं, ही रचना खुद्द नामदेवांची नसून, त्यांच्या मागून त्यांच्या चरित्रा-वर ग्रंथरचना करणाऱ्या दुसऱ्या कोणातरी कवीची असावी. तथापि, महीपतिकृत संतचरित्रविषयक ग्रंथांहून हें प्रकरण निखालस प्राचीन असल्यामुळें, ' नामदेव आणि ज्ञानदेव ' यांनीं केलेल्या तीर्थयात्रांची माहिती, मुख्यतः याच प्रकरणाच्या आधारानें मी येथें देत आहें. परंतु ही माहिती देण्यापूर्वी, एका महत्वाच्या प्रश्नाचा अगोदर विचार करणें जरूर आहे; आणि हा प्रश्न म्हणजे, या तीर्थयात्रेच्या वेळीं नामदेव आणि ज्ञानदेव यांचीं वयें काय होतीं, हा होय. नामदेव हे शके ११९२ त जन्म पावले व ज्ञानदेवांचा जन्मशक ११९७ हा होय. म्हणजे ज्ञानदेव महाराजांनीं आपला ' ज्ञानेश्वरी ' हा ग्रंथ शके १२१२ त लिहिला त्या वेळीं नामदेव २० वर्षांचे व ज्ञानदेव १५ वर्षांचे होते. * तेव्हां अशा अल्पवयांत, परस्परांपासून शेंकडों कोस दूर राहणाऱ्या या दोन संतांचें सख्य होऊन ते जोडीनें तीर्थयात्रेस गेले

* हें प्रस्तुत ग्रंथकाराचें स्वतःचें मत नव्हे; ज्ञानेश्वरीरचनाकालीं ज्ञानदेव हे चांगले प्रौढ असले पाहिजेत, असें त्याचें मत आहे.

होतें, या कथेवर माझा विश्वास बसत नाहीं. तथापि ही तीर्थयात्रेची कथाच अजिबात खोटी आहे असें मात्र माझें म्हणणें नाहीं. मला असें वाटतें कीं, ज्ञानदेव आणि नामदेव हे जरी समकालीन होते, तरी त्यांच्या जन्ममृत्युकालाचे जे शक हल्लीं प्रसिद्ध आहेत ते खरे नसावेत; आणि माझी अशी समजूत होण्यास कारणेंही तशींच सबळ आहेत. नामदेव हे मूळचे मोगलाईत राहणारे. पुढें तारुण्यांत, दरोडेखोर लोकांच्या संगतींत राहून, कांहीं वर्षे त्यांनीं वाटमारेपणा केला. नंतर त्यांना पश्चात्ताप होऊन ते पंढरपुरांत येऊन राहिले. त्या वेळीं त्यांचें वय निदान वीस बावीस वर्षांचें तरी असलेंच पाहिजे. त्यानंतर साधु म्हणून त्यांची प्रसिद्धि होण्यास व ज्ञानदेवां-सारख्या अवतारी पुरुषाशीं त्यांचा विशेष परिचय होण्यास आणखी पांच दहा वर्षे तरी सहज गेलीं असलीं पाहिजेत. म्हणजे, तीर्थयात्रेच्या वेळीं नामदेवांचें वय कमींतकमी ३२ वर्षांचें तरी असावेंच लागतें. त्यांचा जन्म शके ११९२ त झाला, तर तीर्थयात्रेच्या वेळीं, वरील हिशोबानें शके १२२४ हें वर्ष येतें. आतां ज्ञानदे-वांचा समाधिशक १२१८ हा प्रसिद्धच आहे. अशा स्थितींत, शके १२१८ त समाधिस्थ झालेल्या ज्ञानदेवांबरोबर शके १२२४ च्या सुमारास नामदेवांनीं तीर्थयात्रा केली ही गोष्ट विश्वसनीय कशी मानावयाची याचा विचार वाचकांनींच करावा. शिवाय निवृत्तिनाथांनीं नामदेवांच्या दोन मुलांचा उल्लेख आपल्या अभंगांत केलेला आहे. माझ्या मतें, या कोड्याचा उलगडा करण्यास एकच मार्ग आहे व तो कोणता म्हणाल तर या सत्पुरुषांचे जे जन्मशक हल्लीं प्रसिद्ध आहेत ते आणखी कांहीं वर्षे मागें ढकलणें हा होय. असो.

एकदां, ज्ञानदेव हे, मुद्दाम नामदेवास भेटून, त्यांना आपल्या बरोबर तीर्थयात्रेस घेऊन जाण्याच्या उद्देशानें पंढरपुरीं आले. तेव्हां नामदेवांनीं त्यांना प्रेमानें लोटांगण घालून त्यांचा सत्कार केला व म्हटलें, “ महाराज, आपल्या या अकल्पित दर्शनानें मी आज धन्य झालों; प्रत्यक्ष पांडुरंग भेटल्यानें जें समाधान वाटतें, तें समाधान आपल्या या भेटीमुळें मला होत आहे. मायामोहानें संसारासक्त आणि तापत्रयानें संतप्त झालेल्या जीवांच्या उद्धारार्थ आपला अवतार आहे. मी आपला एक दीन, मूढ आणि मतिमंद, संतचरणाचा केवळ रजरेणु आहें. म्हणूनच पांडुरंग प्रेमाचें जीवन घालून माझा परिपाल करितो. आज स्वामींनीं मुद्दाम माझ्या पर्णकुटिकेंत येऊन व मला कृपादृष्टीनें पाहून मजवर सुखाची वृष्टि केली. महाराज, आपल्या पायांच्या प्रसादानें या भवनदीचा पैलपार गांठण्यास मी समर्थ होईन, अशी माझी खात्री आहे. ”

ज्ञानदेव म्हणाले, " नाम्या, तूं सर्व भक्तांचा शिरोमणि आहेस; मनुष्यजन्मास येऊन तूं पांडुरंगास आपला सखा केलास—

**प्रेमसुख गोडी तुजाचि फावली। वासना मावळली समूळ तुझी॥ धन्य तुझें जन्म धन्य तुझें कुळ। धन्य तुज राऊळ जवळी असे॥ भक्तिप्रेम धन्य साधिलें तुवां सार। केला पैं संसार देशधडी॥**

नामदेवा, आतां आपण क्षणभर एकांतांत बसून, थोडेंसें हितगुज करूं या. हें पहा, जीवन्मुक्त आणि ज्ञानी हे जरी वस्तुतः मुक्त झालेले असतात तरी ते देवदेवतार्चन व तीर्थयात्रा यांचा त्याग करीत नाहींत. म्हणून, आपल्या या भरतखंडांतलीं सर्व तीर्थें एकदां प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहावीं अशी माझी इच्छा आहे. आणि या प्रवासांत तुझ्यासारख्या सत्पुरुषाच्या समागमसुखाचा लाभ व्हावा, अशी उत्कंठा लागल्यामुळें, तुला पाचारण करण्यास मी मुद्दाम येथें आलों आहें. तर आतां प्रयाणाचा मुहूर्त ठरवून, निघण्याच्या तयारीस लागावें. ज्ञानदेव महाराजांचें हें भाषण ऐकून, त्यांस काय उत्तर द्यावें याचा नामदेवांस मोठा विचार पडला. पांडुरंगाचे पाय मनांत आठवून ते नम्रपणें ज्ञानदेवांस म्हणाले, " महाराज, माझ्या सर्व सुखाचा ठेवा हा माझा पांडुरंग आहे. मग, त्याचे पाय सोडून कोणत्या सुखासाठीं मी तीर्थयात्रा करूं? इहलोकींच्या किंवा परलोकींच्या कसल्याच सुखाची मला चाड नाहीं; मला पुरुषार्थ नकोत आणि चारी मुक्तीही नकोत. मी पंढरीचा भिकारी होऊन पांडुरंगाच्या महाद्वारांत कुत्र्याप्रमाणें पडून राहीन. या पांडुरंगदर्शनाच्या सगुण सुखाकरितां मी देहास इतके कष्ट दिले आणि हें दुरत्यय मायाजाल तोडून टाकलें. त्रिभुवनांतल्या सगळ्या वैभवावर लाथ मारून मी पंढरीचा भिकारी झालों आहें. कल्पतरूची छाया, कामधेनूचें दूध वगैरे सर्व कांहीं मला या ठिकाणीं मिळतें. विठोबाच्या पायांपाशीं मला काय कमी आहे? पण मला कशाची वासनाच उरलेली नाहीं. ज्यानें मला जन्म दिला आणि ज्यानें माझें पालनपोषण केलें, त्या पांडुरंगाचा मी बंदा गुलाम आहें. म्हणून महाराज, तुम्ही पांडुरंगास विचारा, जर त्यानें आज्ञा दिली तर मी आपल्याबरोबर येण्यास तयार आहें. "

नामदेवांचें हें भक्तिप्रेमपूर्ण आणि अत्यंत वैराग्ययुक्त भाषण ऐकून ज्ञानदेवांस साश्चर्य आनंद झाला. ते म्हणाले, " हे भक्तश्रेष्ठा नामदेवा! तूं धन्य आहेस:—

**धीर आणि चतुर सर्वस्वें उदार । साजे तुज अधिकार प्रेमभक्ति ॥ धन्य तूं संसारीं भक्तिभावशीळ । साधिलें तुवां केवळ प्रेमसुख ॥**

इतकें बोलून ज्ञानदेव महाराजांनीं नामदेवांस प्रेमभरानें आलिंगन दिलें व त्यांस हातीं धरून म्हटलें, "चल, आपण पांडुरंगापाशीं जाऊं व दोघेही तीर्थयात्रेस जाण्याची आज्ञा मागूं." मग ते उभयतां पांडुरंगाकडे आले व ज्ञानदेवांनीं आपला तीर्थयात्रेचा विचार भगवंतास कळविला. तो ऐकून पांडुरंग हांसून म्हणाला, "ज्ञानोबा, तूं अत्यंत ज्ञानसंपन्न, केवळ चिद्रूप असा आहेस. स्फटिकाप्रमाणें तुझें अंतःकरण अंतर्बाह्य निर्मळ आहे. तूं स्वतःच तीर्थरूप असतां, हा तीर्थयात्रेस जाण्याचा विचार तुझ्या मनांत उद्भवला तरी कसा ?" यावर ज्ञानदेवांनीं उत्तर केलें, "देवा, नामदेवाच्या प्रेमळ सहवासांत तीर्थयात्रा करीत फिरावें, अशी माझी इच्छा आहे, इतकेंच." पांडुरंगानें हास्य करून नामदेवांस म्हटलें, "नाम्या,

**प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ति ज्ञानेश्वर । करीतसे आदर संगतीचा॥ ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावें । तरीच जन्मा यावें विष्णुदासा ॥ जावें स्वस्तिक्षेम यावें शीघ्रवत । करावें स्वहित कळल तैसें ॥ सर्व भावें आमुचा विसरू न पडावा । लोभ असों द्यावा मजवरी ॥ "**

याप्रमाणें नामदेवांशीं बोलून पंढरिनाथ ज्ञानदेवांस म्हणाला, ज्ञानोबा, तूं तर सर्वज्ञ सुखमूर्ति आहेस. परंतु तुजपाशीं माझें एक मागणें आहे तें लक्ष्यांत ठेव. माझ्या कृपेनें मी वाढविलेला हा नामदेव माझा फार आवडता आहे. याला अगदीं जीवापलीकडे जप, क्षणभरही दृष्टिआड करूं नकोस. तूं स्वतः येऊन मला संकट घातलेंस म्हणूनच मी याला पाठवीत आहें. पण तसें करितांना, भावी विरहदुःखानें माझें हृदय अत्यंत व्याकुल होत आहे.

**आरुष साबडें नामा माझें वेडें । मार्गीं मागें पुढें सांभाळावें ॥ तहान भूक तुवां जाणावी जीवींची । मज चिंता याची थोर वाटे ॥ रानीं वनीं जनीं विसंवसी झणीं । धाडितों देखोनि आर्त तुझें ॥ "**

इतकें बोलून भगवंतानें नामदेवांस ज्ञानदेवांच्या हातीं दिलें व ते दोघेही देवाच्या चरणावर मस्तक ठेवून निघाले. चंद्रभागेवर स्नान करून नामदेवानीं पुंडलिकाचें दर्शन घेतल्यावर, नदी उतरून ते मार्गस्थ झाले.

इकडे, नामदेवांस निरोप देऊन पांडुरंग मंदिरांत आला, तेव्हां त्यास साश्रुनयन पाहून रुक्मादेवीनें विचारलें, " आज आपण असे उदासीन कां दिसतां ? " पांडुरंग म्हणाला, " देवी, आज माझा नामा ज्ञानदेवाबरोबर तीर्थाटनास निघून गेला. त्याच्या वियोगानें माझें हृदय अगदीं कासावीस झालें आहे. कांहीं केल्या माझ्या मनाची हुरहुर थांबत नाहीं. नामदेव पुनः कधीं दृष्टीस पडेल असें मला झालें आहे. इष्ट, मित्र, बंधु, मायबाप, सखा या गोड नांवांनीं तो मला नेहमीं आळवीत असे. माझ्या वियोगानें तो जिवंत तरी कसा राहील, हीच मला मोठी काळजी लागली आहे." यावर रुक्मिणी-म्हणाली, " महाराज, नामदेवाविषयीं आपण बिलकुल काळजी करूं नये. शोक, मोह, दुःख इत्यादिकांचें निरसन करण्यास पूर्ण समर्थ असें जें आपलें नाम तें त्याच्या जिव्हाग्रीं वास करीत असल्यामुळें त्याला कळिकाळाचेंही भय नाहीं. " पंढरि-नाथ म्हणाला:—

**" माझे भक्त मज अनुसरले चित्तें । त्यांहुनि पढियंतें मज आणिक नाहीं ॥ १ ॥ व्यक्तीस येणें मज तयांचिये आवडी । युगायुगीं प्रौढी हेचि मिरवीं ॥ २ ॥ त्यांचेनि कृतार्थ असें मी पूर्णकाम । ते माझे परम प्राणसखे ॥ ३ ॥ ते माझे आश्रम मी त्यांचा विश्राम । जींहीं रूप नाम केलें मज ॥ ४ ॥ मी त्यांचा सोयरा ते माझे सांगाती । करीं त्यांसीं एकांतीं सुखगोष्टी ॥ ५ ॥ जींहीं तनुमन प्राण लाविला मजकडे । मी तयां आवडें जीवाहूनि ॥ ६ ॥ ते माझ्या भाग्याचे अधिकारी विभागी । वैकुंठ त्यां-लागीं वसतें केलें ॥ ७ ॥ त्यांचें गुज गौप्य मीचि एक जाणे । माझी प्रेमखूण कळली तयां ॥ ८ ॥ मनाची साउली करोनियां मातें । भोगिती आतां ते प्रेमसुख ॥ ९ ॥ आपु-लियाचि किरणें विराजे गभस्ती । परी किरणें तीं नव्हती आन जेवीं ॥ १० ॥ तैसे माझे दास मजमाजी उदास । असती समरस दुजेनवीण ॥ ११ ॥ मी तों भक्तरूप भक्त माझें स्वरूप । प्रभा आणि दीप जयापरी ॥ १२ ॥ हे खूण अनुभवी जाणती ते ज्ञानी । ज्यां नाहीं आयणी कास-याची ॥ १३ ॥ त्यांचिये चरणींचें रजरेणु माझें नाम ।**

**जींहीं सांडिलें रज तम सत्वशीळ ॥ १४ ॥ त्याचे भेटीलागीं हृदय माझें कळवळे । कैं देखेन डोळे निवती माझे ॥ १५ ॥**

नंतर पांडुरंगानें आपल्या सगळ्या भक्तांस बोलावून आणलें, आणि त्यांजपुढें नामदेवांची स्तुति आरंभिली. देव म्हणाला, " भक्त हो, नामदेवाइतकें प्रिय मला दुसरें कोणी नाहीं. त्याला पाहिलें म्हणजे माझी दृष्टि आणि मन यांचें समाधान होतें; आणि निरंतर त्याला हृदयांतच ठेवावा असें वाटूं लागतें. त्याच्या लोभानें माझें मन इतकें मोहून गेलें आहे कीं, त्यानें त्याच्यापाशीं अखंड वस्तीच केली आहे. तोही माझ्याशिवाय दुसरें कांहीं जाणत नाहीं. असा तो माझा प्रेमळ आणि अनन्य भक्त आहे. मी स्वतःला मोठा भक्तकाजकैवारी म्हणवितों, परंतु नामदेवाचें कोणतेंही काम मी अद्याप केलेलें नाहीं. नरदेहीं येऊन त्या भागवतोत्तमानें मला आपला सेवार्कणि केला आहे, पण मी मात्र त्याला धर्म, अर्थ, काम वगैरे एकही पुरुषार्थ अद्याप दिलेला नाहीं. त्यानें आपल्या पुरुषार्थानें संसार जिंकून मदमत्सरादि षड्विकार देशोधडीस लाविले आहेत. तो दुसऱ्या देवांस मानीत नाहीं आणि त्यांची सेवा करीत नाहीं. मीच एकटा त्याच्या विश्रांतीचें स्थान आहें. प्रवासांत चालून चालून तो आतां दमला असेल आणि उन्हानें त्याचें मुखकमल कोमेजून गेलें असेल. पण हें आपलें सुखदुःख तो कोणाला सांगणार ? त्याच्या अडीअडचणी फक्त मीच एकटा जाणतों. " पांडुरंगाचें हें कळवळ्याचें भाषण ऐकून सर्व संतांचीं अंतःकरणें प्रेमातिशयानें भरून आलीं.* असो.

इकडे ज्ञानदेव आणि नामदेव पंढरींतून बाहेर पडून मार्गक्रमण करीत चालले, पण नामदेवांचें सगळें लक्ष्य पांडुरंगाकडे लागलें होतें. पंढरी सोडून जाण्याचें त्यांच्या अगदीं जीवावर आलें असल्यामुळें ते पुनः पुनः मागें वळून पंढरीकडे पहात. ते मनांत म्हणाले, " हे पंढरिनाथा, माझी बोवळण करून तूं मागें कसा परतलास ? माझा सांभाळ करावयास मजबरोबर कां आला नाहींस ? या परदेशांत आणि परक्या

---

* ज्या मूळ अभंगांत हें पांडुरंगाचें भाषण ग्रथित झालें आहे, त्याचा शेवटचा चरण, " **परिसा भागवत** आनंदें नाचत । लोटांगणीं येत गरुडपारीं, " असा आहे, यावरून या नामदेवचारित्रविषयक सर्व अभंगांचा कर्ता हा परिसा भागवतच असावा, असें मला तरी निदान नक्की वाटतें, व हें मी मागेंही सांगितलें आहे.

लोकांत मला अगदीं चुकल्यासारखें वाटतें. माझा जिवलग येथें कोणी दिसत नाहीं. काळजीनें आणि तुझ्या विरहानें माझें हृदय दुभंग होऊं पहात आहे, आणि मला मोठा उद्वेग वाटत आहे. देवा, माझा मायबाप, भाऊ, इष्टमित्र, गणगोत सर्व कांहीं तूं आहेस, आणि माझें आवडतें कुळदैवतही तूंच आहेस.

**तूंचि माझें व्रत तूंचि माझें तीर्थ । तूंचि धर्म अर्थ काम देवा ॥ तूंचि ज्ञानचक्षु तूंचि माझा लक्षु । तूंचि माझा साक्षु स्वभावासी ॥ साच कीं लटिकें हें माझें बोलणें । तुजवांचुनि जाणे कवण दुजा ॥ नामा म्हणे आपुलें अनाथ सांभाळीं । येउनि हृदयकमळीं राहें माझ्या ॥**

नामदेवांचीं हीं करुणावचनें ऐकून, त्यांस धीर देण्यासाठीं ज्ञानदेव म्हणाले, "विष्णुदासा, प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयांत असून तूं वरचेवर असा शोकविव्हल कां होतोस ? हे भक्तराया, तूं विवेकपूर्वक पहा, म्हणजे तुझा आनंद तुजपाशींच आहे असें तुला दिसून येईल." नामदेव म्हणाले, "महाराज, मी ज्ञानी नाहीं किंवा योगीही नाहीं. एका पांडुरंगाशिवाय मला दुसरें विश्रांतिस्थान नाहीं. पुंडलिकासमोर उभें असलेलें तें सुंदर रूपच सर्व प्रकारीं मला प्रिय आहे. तो माझा विठ्ठल मला दाखवा, म्हणजे त्याला मी डोळे भरून पाहीन. मला आणखी दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं." ज्ञानदेव म्हणाले, "अरे, हा विठ्ठल सर्वदेशी आणि सर्वव्यापक आहे, हें, भेदभ्रम सोडून पाहशील तर तुझ्याही अनुभवास येईल. जेथें पांडुरंग नाहीं असा ठाव कोठें आहे ? गगन जसें सर्वव्यापी आहे तसा तो परमात्मा हें सर्व विश्व भरून राहिलेला आहे." परंतु ज्ञानी ज्ञानदेवांचा हा अध्यात्मोपदेश नामदेवांसारख्या प्रेमळ सगुणोपासकास कसचा पटतो ? त्यांनीं स्पष्ट सांगितलें,

**"कायावाचा मनें मज तोचि व्हावा । गीतीं गातां जीवा सुख वाटे ॥ ऐकावा श्रवणीं पहावा तोचि नयनीं । नवजावा जवळोनि दूर कोठें ॥"**

ज्ञानदेव म्हणाले, "ज्ञानी सोहंभावानें ज्याची उपासना करतात, तें परब्रह्म अव्यक्त, अक्षर आणि देशकालातीत आहे. ज्ञानी जे आहेत ते सर्वेंद्रियांसह चित्ताचा अवरोध करून, नित्य अद्वैतसुखाचा उपभोग घेतात." हें ऐकून नामदेवांनीं उत्तर दिलें, महाराज, पांडुरंगाच्या पायीं मला सर्व सुख आहे. मग दुसऱ्या उठाठेवी करण्याचें मला काय प्रयोजन ? सर्वभावेंकरून माझें चित्त पांडुरंगाच्या पायीं रममाण झालें

आहे, आणि त्यामुळें मला जें सुख होतें, तें तुमच्या ब्रम्हानंदाहून कांहीं कमी नाहीं. ज्ञानदेव म्हणाले, " अरे, हा परमात्मा सर्वगत, संपूर्ण, सार्वकालीन असून, त्याला जन्ममृत्यु नाहीं. तो तुझ्या आंत, आणि तूं त्याच्या आंत आहेस, असें अनुभवानें तुला प्रतीत होईल. " यावर त्यांचा आणखी संवाद झाला तो येणेंप्रमाणें:—

नामदेव—" **मी न मनी न मनी लटकी हे कहाणी। परि जळधरा वांचोनी चातक जैसा ॥ तैसें माझें मन स्मरे रात्रंदिवस। पंढरिनिवास जीवन माझें ॥ " ऐसें ऐकोनी बोलणें म्हणे ज्ञानदेव। " धन्य तुझा भाव एकविध ॥ " नामा म्हणे, " माझ्या सुखाचा विसांवा। आवडे या जीवा पंढरिरावो ॥ "**

अशा रीतीनें वादविवाद करीत ते दोघे संत मार्गक्रमण करीत होते. भजन, भक्ति, निदिध्यास, वैराग्य, धृति, श्रवण, मनन, ध्यान वगैरे अनेक विषयांवर त्यांचें बोलणें झालें. नामदेवांची परमार्थप्रवणता पाहून ज्ञानदेव संतुष्ट होऊन म्हणाले,

**भक्त भागवत बहुसाल ऐकिले। बहु होउनि गेले होती पुढें ॥ परी नामयाचें बोलणें नव्हे हें कवित्व। हा रस अद्भुत निरुपमु ॥ हे सुख विश्रांति नाहीं हो कल्पांतीं। विचारावें संतीं दूरदृष्टी ॥ होतु शास्त्रवक्ते व्युत्पत्तीचे माथे। होतु बहुश्रुत बुद्धिवंत ॥ होतु कर्मनिष्ठ विधीचे उद्भट। होतु सर्वश्रेष्ठ पूज्य लोकां ॥ होतु कळावंत कवित्वकुशळ। होतु कां वाचाळ चतुरतेचे ॥ होतु कां पाठक होतु कां साधक। होतु कां वाचक ग्रंथकार ॥ होतु आत्मज्ञानी होतु निजध्यानी। होतु वज्रासनी बैसकेचे ॥ होतु योगयुक्त होतु जीवन्मुक्त। होतु कां विरक्त सर्व संगीं ॥ ऐसे होतु कां सभाग्य संपन्न सर्वज्ञ। परि मी न मनी तुजवीण विष्णुदासा ॥ हे खूण जाणता एक पंढरिरावो ॥ रुक्मादेवी नाहो श्रीविट्ठलु ॥**

ज्ञानदेव हे योगी आणि ज्ञानी होते, तरी, नामदेवांसारख्या अत्यंत प्रेमळ भक्ताच्या भजनानें त्यांचेंही हृदय हेलावल्याशिवाय राहिलें नाहीं. प्रेमळ भक्ताच्या भावनायुक्त

भोळ्या भजनांत अशीच कांहीं विलक्षण दैवी जादू असते कीं तिच्या योगानें रूक्ष पंडित आणि परमहंस योगीही नागाप्रमाणें डोलूं लागतात. " घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं । मुक्ता आत्मास्थिति सांडवीन," अशी जी प्रतिज्ञा तुकारामबुवांनीं केली आहे, ती या आत्मविश्वासाच्या जोरावरच केली आहे. असो.

ज्ञानदेव व नामदेव हे पंढरीहून निघाल्यानंतर उत्तरेकडे ते द्वारकेपर्यंत गेले व द्वारका, प्रभास वगैरे तीर्थें करून मारवाडांत गेले. त्या मरुदेशांत पाण्याचें मोठें दुर्भिक्ष्य असल्यामुळें प्रवासांत, पाण्याच्या अभावीं त्यांचे फार हाल झाले. बिकानेरपासून १०।१२ कोसांवर कोलादजी नामक गांव आहे, तेथें येतांच ते अत्यंत तृषाक्रांत होऊन पाण्याच्या शोधांत असतां अतिशय खोल असा एक कूप त्यांच्या दृष्टीस पडला. तेव्हां योगी ज्ञानदेवांनीं, आपल्या योगबळानें सूक्ष्मदेह धारण करून कूपांत प्रवेश केला व यथेच्छ जलपान करून आपली तृषा शांत केली. परंतु भक्त नामदेवांस ती विद्या अवगत नसल्यामुळें त्यांची मोठी पंचाईत झाली. तेव्हां ज्ञानदेव त्यांस म्हणाले, " नाम्या, तुला जर पाणी पाहिजे असेल तर संकोच न धरतां मला स्पष्ट सांग, म्हणजे मी पुनः कूपांत उतरून तुजसाठीं पाणी घेऊन येईन. अभिमानानें गप्प राहून विनाकारण दुःख भोगूं नकोस. बोल, तुला पाणी हवें आहे काय ? " नामदेव म्हणाले, " सर्व भूतीं विठ्ठल आहे असें तुम्हीच सांगतां, तेव्हां त्याला माझीच चिंता कशी नसेल ? अंमळ दम धरा आणि काय चमत्कार होतो तो पहा. " इतकें बोलून त्यांनीं नेत्र झांकले आणि मनांतल्या मनांत पांडुरंगाची प्रार्थना केली कीं, " हे विठ्ठला, माझा इष्ट, बंधु, सोयरा, एकटा तूं आहेत; तुझ्याशिवाय या जगांत मला कोणाचा आधार नाहीं. यासाठीं आतां लवकर धांवत ये, माझा अंत पाहूं नकोसः—

**तुझिये भेटीची बहु खंती वाटली । आसुवें दाटलीं नेत्रकमळीं ॥ धीर न धरवे जीवा पोकारितों धांवा । ये माझ्या केशवा मायबापा ॥ काया वाचा मनें विनटलों चरणासी । तो मी शरण आणिकांसी जाऊं कोणा ॥ जन्मोनी पोसणा तुझाचि म्हणती । मोकलितां अंतीं लाज कोणा ॥ अनाथा कैवारी नामाची आयणी । वर्णिजे पुराणीं कीर्ति तुझी ॥ ते काय लटिकी वाणी करिशील आजी । अजुनी तुज माजी रे करुणा नये ॥**

**गजेंद्राकारणें ज्या वेगीं धांवणें। केलें तंव स्मरणें कळवळोनी ॥ द्रौपदीचे आकांतीं येसी सोडविणें। तें मजकारणें विसरलासी ॥ येतां निरविलें ज्ञानदेवाप्रती। दिधला त्याचे हातीं हात माझा ॥ तो तूं कैसा मजलागीं करिसी उदास। धांव कासावीस थोर झालों ॥ सर्वभावें तूं मजलागीं लोभापर। मी तुझा डिंगर आवडता ॥ नामा म्हणे हांसें आलें पिसुणाचें। न करीं मज दीनाचें अव्हेरण ॥**

आपल्या आवडत्या भक्ताचा हा हृदयभेदक धांवा ऐकतांच त्या दीनदयाघन पांडुरंगानें काय चमत्कार केला? एका क्षणांत त्या खोल कूपांतलें पाणी वर येऊन एखाद्या झऱ्यासारखा त्याचा प्रवाह सुरू झाला! नामदेवांचें हें अलौकिक सामर्थ्य पाहून योगिराज ज्ञानदेवही आश्चर्यचकित होऊन गेले. त्यांनीं नामदेवांस सावध करून त्यांस मोठ्या प्रेमानें आलिंगिलें, तेव्हां नामदेव म्हणाले, " महाराज, माझी सर्व चिंता माझ्या पांडुरंगास आहे. आजपर्यंत त्यानें माझे पुष्कळ लळे पुरविले. त्याचे पाय पुनः माझ्या दृष्टीस कधीं पडतील, येवढीच उत्कंठा मला आतां लागून राहिली आहे." ज्ञानदेव म्हणाले, " नामदेवा, तुझ्या भाग्यास पारावर नाहीं.

**योगी परम ध्यानीं बैसलिया जाण ॥ कांहीं या रे मना विश्रांति नुपजे ॥ तुजवीण दुसरें कांहींच नाठवे। लागली तुझी सवे विष्णुदासा। कवण कुळीं तूं जन्मलासी नामा। केशव परमात्मा तुजजवळी ॥ धेनु वसे वनीं वत्स असे घरीं। चित्त तयावरी ठेवुनि चरे ॥ ते तया देखोनी संतोषली मनीं। तैसा तुझ्या गुणीं वोल्हावलों ॥ तीर्थयात्रे जाणें न लगे कांहीं करणें। ऐकोनि तुझें गाणें सुखरूप ॥ वेडावल्या श्रुति स्मृति आणि पुराणें। योगियांचीं ध्यानें विसर्जिलीं ॥ तुझें प्रेम सांडावें आणि मनें कोठें जावें। जावोनियां पहावें काय कोठें ॥ समाधिसोहळा लय लक्ष वैराग्य। आम्हालागीं भाग्य आणियेलें ॥ ऋषिगण गंधर्व ब्रह्मादिक सर्व। लक्षिताति ठाव अरूपाचा ॥ तो तुवां आम्हां सन्मुख उभा केला। चरणासी लागला ज्ञानदेव ॥**

वरील कथेंत वर्णिलेला हा ' नामदेव कूप ' त्या प्रांतीं अद्याप प्रसिद्ध आहे, असें रा. मुळे यानीं आपल्या नामदेवचरित्रांत लिहिलें आहे. " नामा झाला तृषाक्रांत । ते स्थळीं अद्यापि कूप वाहत । यात्रा मारवाड देशांत । मार्गशीर्षांत भरतसे, " असें महीपतीबुवांनींही आपल्या भक्तविजयांत म्हटलें आहे.

पुढें ही संतांची जोडी उत्तरेकडून दक्षिणेंत आंवढ्या नागनाथ येथें आली. यथाशास्त्र तीर्थविधि केल्यावर नामदेव नागनाथाच्या सभामंडपांत कीर्तनास उभे राहिले. देवाचे पुजारी ब्राह्मण होते त्यांस, नामदेवांसारख्या अब्राह्मणानें देवासमोर कीर्तन करावें, ही गोष्ट बिलकुल रुचली नाहीं. परंतु ब्राह्मणाच्या आवडीनिवडीकडे लक्ष्य देण्यासारख्या स्थितींत नामदेव नव्हते. महीपति म्हणतातः—

**हृदयीं चिंतूनि विठ्ठलमूर्ति । दोन्ही लाविलीं नेत्रपातीं । नाठवेचि देहस्फूर्ति । विदहस्थिती झालासे ॥ सांडोनियां मानापमान । सोडोनि दांभिक लोकाचरण । सांडोनि वासनेचें लक्षण । करी कीर्तन निजप्रीतीं ॥ सोडोनियां भेदाभेद । द्वैत कल्पनेचा करूनि छेद । सोडोनियां आशाप्रबंध । नाचे स्वानंदप्रीतीनें ॥**

वक्त्याची अशी स्थिति झाल्यावर, श्रोत्यांच्या स्थितीचें आणखी निराळें वर्णन करण्याची जरुरी नाहीं. नामदेवांच्या मुखमंडलांतून वाहणाऱ्या भक्तिरसाच्या अस्खलित वाक्प्रवाहांत सर्व श्रोते केवळ डुंबत होते, आणि ' ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी ' अशी त्यांची अवस्था झाली होती. इतक्यांत, धूतवस्त्र परिधान करून, सर्वांगास भस्म चर्चून आणि गळ्यांत रुद्राक्षमाला धारण करून ' सांब सांब ' या नामाचा घोष करीत कांहीं ब्राह्मण त्या ठिकाणीं अवतीर्ण झाले. देवास अभिषेक करण्यासाठीं त्यांस देवळांत जावयाचें होतें, परंतु महाद्वारीं जमलेल्या श्रोतेजनांच्या गर्दींतून सोंवळ्यानें गाभाऱ्यांत जाण्यास त्यांस वाट मिळेना. एका शूद्राच्या कीर्तनास लोकांची इतकी गर्दी झालेली पाहून त्या भूदेवांस असें वाटलें कीं, आतां धर्माची कांहीं धडगत नाहीं. मग अत्यंत क्रोधायमान् होऊन, वक्ता आणि श्रोते यांजकडे वळून ते त्यांस म्हणाले, " काय रे तुम्ही येथें हा गोंगाट चालविला आहे ? टाळ काय कुटतां ? आणि टाळ्या काय पिटतां ? हें काय पंढरपुर आहे ? हा असला टाळकुटेपणा पंढरपुरांत चालतो, पण आमच्या नागनाथास हें बिलकुल खपावयाचें नाहीं. शंकराच्या देवालयांत विष्णूचें नामस्मरण करण्यास तुम्हास लाज नाहीं वाटत ? "

ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून श्रोतेमंडळीपैकीं एका खमंग गृहस्थानें त्यांस विचारलें, " काय हो भटजीमहाराज, हरि आणि हर यांत कांहीं भेद नाहीं, असें जें शास्त्रांत सांगितलें आहे तें तुम्हांस मान्य नाहीं कीं काय ? " यावर भूदेवांनीं रागानें उत्तर दिलें, " शास्त्रांत काय सांगितलें आहे आणि काय नाहीं, याची चर्चा करण्याचा तुम्हास अधिकार नाहीं. तो अधिकार फक्त आम्हां ब्राह्मणांसच आहे; आणि आम्ही सांगूं तें तुम्ही ऐकलेंच पाहिजे. आमची तुम्हांस अशी आज्ञा आहे कीं, या क्षणीं येथून उठा आणि घरोघर चालते व्हा. नाहीं तर तुम्हांस ताडन करूं. " पण ब्राह्मणांच्या या धमकीस एकाही श्रोत्यानें भीक घातली नाहीं. सर्व मंडळी आपापल्या जागीं स्वस्थ बसून राहिली. लोकांनीं आपल्या आज्ञेची अशा रीतीनें अवज्ञा केलेली पाहून ब्राह्मणांच्या अंगाचा अगदीं तिळपापड झाला. आतां कलियुग अगदीं नक्की सुरू झालें असें त्यांस वाटलें. शिंपी जातीच्या एका टाळकऱ्यानें शंकराच्या देवालयांत येऊन विष्णूचें भजन करावें आणि शेंकडों लोकांनीं मोठ्या भाविकपणानें आ पसरून तें ऐकावें, हा देखावा पाहून त्या सोंवळ्या कर्मठ ब्राह्मणांच्या मनाची काय स्थिति झाली असेल याची कल्पना करणें फारसें कठिण नाहीं. एक भटजी मोठ्या तावातावानें म्हणाले, " अरे पहातां काय ? या नाम्याला येथून हांकून द्या. यांचा स्पर्श झाल्यास आम्हांस पुनः स्नान करावें लागेल ना ? " नंतर दोघे ब्राह्मण धक्काबुक्की करीत कीर्तनांत घुसले आणि नामदेवांस म्हणाले, " हा काय गलबला मांडला आहेस रे ! आम्हाला शिवदर्शन घ्यावयाचें आहे, पण ह्या गर्दीतून जाण्यास वाट मिळत नाहीं. तूं स्वतः आपला देहाभिमान सोडून दिलास आणि लोकांनाही आपल्यासारखेंच केलेंस. तुझ्या या भक्तिमार्गामुळें आमचें कर्माचरण मात्र बुडत आहे. तुला जर कीर्तनच करावयाचें, तर देवळामागें जा आणि तेथें खुशाल कीर्तन कर. " ब्राह्मणांचें हें भाषण ऐकून नामदेवांनीं त्यांस वंदन केलें व " तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे, " असें म्हणून ते देवळाच्या मागच्या बाजूस जाऊन भजन करूं लागले. आयत्या वेळीं कीर्तनरंगाचा भंग झाल्यामुळें श्रोत्यांचा अगदीं विरस झाला. नामदेव देवळांतून बाहेर पडतांच लोकही त्यांच्या मागून निघाले व देवळाच्या मागें जाऊन कीर्तन श्रवण करूं लागले. " पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ! " असा त्यांनीं हरिनामाचा गजर केला, तेव्हां नामदेवांच्या डोळ्यांतून प्रेमाश्रूंच्या धारा चालल्या. इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, आकाशांतून हजारों पताका खालीं उतरल्या आणि कीर्तनांत येऊन उभ्या राहिल्या. तो प्रकार पाहून सगळे श्रोते अगदीं

तटस्थ झाले. नामदेवांनीं टाळी देतांच सगळीकडे टाळ्यांचा सारखा कडकडाट सुरू झाला. नामदेव मनांत म्हणाले, आज कीर्तनांत सर्व साहित्याची पूर्ण अनुकूलता आहे. परंतु एक व्यंग राहिलें आहे. नागनाथानें आमच्याकडे पाठ केली आहे, त्यामुळें कीर्तनाची पूर्णता होत नाहीं. मी देवाचा असा कोणता अपराध केला आहे, म्हणून त्यानें मजवर ही अवकृपा केली ? असें म्हणून, अत्यंत सद्गदित अंतःकरणानें त्यानीं पांडुरंगाचा धांवा सुरू केलाः—

**अविंधें मारिली कीर्तनीं गाय । तैं तुज संकट घातलें माये । तेव्हां पावलीस लवलाहें । जीवविली धेनु क्षणमात्रें ॥ तृषा लागतां वनांतरीं । तैं तूं पावलासि झडकरी । आतां कां निष्ठुर अंतरीं । न येसी लवकरी विठ्ठला ॥ मजकडेस करून पाठी । राउळीं बैसला धूर्जटी । आतां पाहूनि कृपादृष्टीं । पाव जगजेठी मजलागीं ॥**

नामदेवांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतांच असा चमत्कार झाला कीं, नागनाथाचें देऊळ पूर्वाभिमुख होतें, तें तत्काळ पश्चिमेकडे फिरलें ! सर्व श्रोते आश्चर्यचकित होऊन आनंदानें टाळ्या पिटूं लागले. देवळांत शिवरात्रीनिमित्त देवपूजा करण्यांत गुंतलेल्या ब्राम्हणांस नागनाथानें देऊळ फिरविलें, या गोष्टीची दादही नव्हती ! सूर्योदय होतांच ब्राह्मण देवळांतून बाहेर येतात तों तेथें नामदेवांचें कीर्तन चाललेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. जवळच्या तीर्थांत स्नान करून ते सूर्यास अर्घ्यें देण्यास निघाले तेव्हां सूर्याकडे पाहतांच तो आज पश्चिमेकडे उगवला आहे असें त्यांस वाटलें ! ते आपापसांत म्हणाले, " अरे, आपलीच तर कांहीं दिशाभूल झाली नाहीं ना ? कदाचित् जागरणामुळें आपणास ही भ्रांति पडली असेल. " मग त्यांनीं एकंदर परिस्थिति लक्ष्यपूर्वक पाहिली तेव्हां नागनाथानें नामदेवांच्या भक्तीसाठीं देऊळ फिरविलें ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत आली; व अशा थोर अधिकारी भक्ताचा आपण छल केला, याबद्दल त्यांस पश्चात्ताप वाटला. मग,

**नामयास ह्मणती द्विजवर । धन्य तूं प्रेमळ वैष्णव वीर । पूर्ण उद्धवाचा अवतार । कळलें साचार आम्हासी ॥ नाहीं ऐकिलें देखिलें नयनीं । तैसीच करून दाविली करणी । धन्य नामया तुझी जननी । सभाग्यें पूर्ण**

**आथिली ॥ ऐसी अद्भुत तुझी कीर्ति । फांको आतां त्रिजगतीं । पृथ्वी चंद्र आणि गभस्ती । तोंवरी चरित्र न ढळो हें ॥**

याप्रमाणें नामदेवांची स्तुति करून ब्राह्मणांनीं त्यांस वंदन केलें. तेव्हां नामदेव फार सद्गदित झाले. मग त्यांनीं प्रेमानें आरती करून कीर्तन संपविलें व सर्वांस खिरापत वांटली. कीर्तन पुरें होतांच, आकाशांतून आलेल्या पताका परत आकाशांत गेल्या. नागनाथानें देऊळ फिरविलें तें अद्याप तसेंच आहे, असें **महीपति**बुवांनीं आपल्या भक्तविजयांत म्हटलें आहे. नामदेवांनीं देऊळ फिरविल्याची ही कथा दुसऱ्या अनेक संतांनीं वर्णिली आहे. ‘ भक्तांसाठीं तो जगजेठी बसोनि माळ्यावर० ’ ह्या प्रसिद्ध जुन्या पद्यांत वरील कथेचा स्पष्ट उल्लेख आहे:—

**नामदेवासी म्हणती ब्राम्हण जात तुझी ओंगळ । निघ बाहेर करिसी विटाळ ॥ मग तो गेला देउळामागें केले दगडाचे टाळ । हरीनें फिरविलें देऊळ ॥**

ज्ञानदेव आणि नामदेव हे तीर्थयात्रा करीत फिरत होते, तेव्हांच ही गोष्ट घडली असेल असें मात्र म्हणवत नाहीं. कारण, या कथेंत ज्ञानदेवांचा उल्लेख नाहीं. असो.

तीर्थयात्रा पुरी झाल्यावर नामदेव पंढरीस आले, व पांडुरंगाचें दर्शन घेऊन त्यांनीं आपलें हृद्गत देवास सांगितलें:—

**तीर्थें करोनि नामा पंढरीये आला । जिवलगा भेटला विठोबासी १ सद्गदित कंठ वोसंडला नयनीं । घातली लोळणी चरणावरी २ शिणलों पंढरिराया पाहें कृपादृष्टी । थोर झालों हिंपुटी तुजवीण ३ अज्ञानाचा भाग होता माझे मनीं । हिंडविलें म्हणोनि देशोदेशीं ४ परी पंढरीचें सुख पाहतां कोटि वाटे । स्वप्नींही परि कोठें न देखोंचि ५ उदंड तीर्थांची ऐकों जाय प्रौढी । परि चित्त माझें वोढी चंद्रभागा ६ म्हणोनी चरणाची ठाकोनी साउली । आलों मज सांभाळीं मायबापा ७ तया देवांची वास न पाहती माझे नयन । न करिती पूजन कर त्यांचें ८ तेणें पंथें माझे न चलती चरण ।**

नायकती श्रवण कीर्ति त्यांची ९ कटींतटीं जेणें कर नाहीं ठेविले। न देखें पाउलें विटेवरी १० त्यातें म्हणतां देव लाजे माझें मन। ते कष्ट दारुण कवणा सांगूं ११ जये गांवीं नाहीं वैष्णवांचा मेळु। न देखें सुकाळु हरिकथेचा १२ कुंचे गरुडटके न देखों पताका। त्या देवाची शंका वाटे थोर १३ हें जेथें न देखें तेथें खंती वाटे जीवीं। ते वेळीं आठवीं रूप तुझें १४ इष्टमित्र बंधु तूं कुळदेवता। नामा म्हणे आवडता प्राण माझा १५

नामदेवांची स्वतःविषयींची ही अनन्य भक्ति पाहून भक्तकाजकैवारी पांडुरंग सद्गदित झाला व त्यानें प्रेमाचे दोन शब्द सांगून नामदेवांचें समाधान केलें. आपल्या गळ्यांतील तुलसीची माळ काढून त्यानें नामदेवांच्या गळ्यांत घातली. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, विसोबा खेंचर, नरहरि सोनार, सांवता माळी वगैरे संतांनीं नामदेवांचें स्वागत करून त्यांस प्रेमालिंगन दिलें.

औंढ्या नागनाथ येथें घडलेली आणखी एक गोष्ट नरहरि मालूकृत भक्तकथामृताच्या १२ व्या अध्यायांत दिलेली आहे, ती अशी. औंढ्या नागनाथ येथें **हरिपाल** या नांवाचा एक वाटमाऱ्या रहात असे. तो विठ्ठलाचा मोठा भक्त होता. प्रत्येक आषाढी कार्तिकीस तो पंढरपुरास नियमानें जात असे. आपल्या कुळधर्माप्रमाणें तो चौर्यकर्म करीत असतांही, त्याचा एक नियम असा होता कीं, ज्यास विठ्ठल हें दैवत माहीत नाहीं व जे विठ्ठलाची उपासना करीत नाहींत, अशाच लोकांचें मात्र द्रव्यहरण करावयाचें; पांडुरंगभक्तांच्या वाटेस जावयाचें नाहीं. एके दिवशीं गांवाजवळच्या टेंकडीवर हातीं धनुष्यबाण घेऊन व कमरेला तलवार लटकावून तो शिकारीची वाट पहात उभा असतां, ज्ञानदेव, नामदेव वगैरे संतमंडळी त्या अरण्यांत प्राप्त झाली. त्यांस पाहून आज आपणास बरीच शिकार सांपडणार, असें हरिपालास वाटलें; व तो टेंकडीवरून खालीं उतरला. ज्ञानदेवादिकांच्या जवळ येऊन पाहतो तों ते ' विठ्ठल ' नामाचा सारखा गजर करीत आहेत असें त्यास दिसलें. तेव्हां, हे कोणी तरी मोठे भगवद्भक्त असले पाहिजेत असें जाणून त्यानें त्यांस साष्टांग नमस्कार घातला व नम्रतेनें विचारलें, " महाराज, आपण कोण ? आपलीं नांवें काय ? आपण कोठून आलां ? व कोठें चाललां ? " तेव्हां नामदेवांनीं सर्वांचीं नांवें त्यास सांगितलीं व आपण तीर्थयात्रेस जात असल्याचें कळविलें.

हरिपाल हा पंढरीचा वारकरी असल्यामुळें, नामदेवादि संतांचीं नांवें पूर्वीं पंढरपुरांत त्यानें ऐकलीं होतीं. तेव्हां, त्यांच्या प्रत्यक्ष भेटीचा हा अपूर्व योग आलेला पाहून त्यास मोठा आनंद झाला. नंतर त्यानें त्यांस आदरपूर्वक आपल्या घरीं नेऊन त्यांची पूजा केली व आग्रहानें त्यांस भोजनास ठेवून घेतलें. नंतर त्यानें घरांत जाऊन चौकशी केली तेव्हां त्याच्या बायकोनें त्यास सांगितलें कीं, घरांत धान्याचा एक दाणाही नाहीं ! तें ऐकून त्यास फार वाईट वाटलें. मग, आपल्या नित्यव्यवसायाप्रमाणें कोणाचें तरी द्रव्य लुबाडून आणावें व या सत्पुरुषांस भोजन घालावें, असा विचार करून व आपलीं शस्त्रें घेऊन तो ताबडतोब निघाला व टेंकडीवर जाऊन वाटसरू लोकांची टेहळणी करीत उभा राहिला. पण दुर्दैव त्याचें, कीं त्या दिवशीं तीन प्रहर-पर्यंत त्या मार्गानें कोणी वाटसरूच आला नाहीं ! तेव्हां हरिपालास फार वाईट वाटलें. तो मनांत म्हणाला, "आज नामदेवासारखे संत माझ्या घरीं आलेले असतां त्यांच्या भोजनाची कांहींच व्यवस्था मला करतां येऊं नये, ही केवढ्या दुर्दैवाची गोष्ट ! आतां मी रिक्तहस्तानें परत घरीं जाऊन त्या सत्पुरुषांस काय सांगू ? हर हर ! यापेक्षां मृत्यु येईल तर चांगला." असें म्हणून निराशेच्या भरांत आत्महत्या करण्याच्या विचारानें त्यानें धनुष्याचा बाण आपल्या छातीकडे फिरविला व आपल्या हृदयांत तो आतां मारून घेणार, इतक्यांत, हरिपाळाची भगवद्भक्तांविषयींची खरी भक्ति, त्याचा दृढविश्वास व शेवटीं प्राणत्याग करण्याचीही तयारी पाहून, दीनवत्सल पांडुरंग, सावकाराच्या वेषानें रथारूढ होऊन त्या ठिकाणीं अकस्मात् प्रगट झाला. वस्त्रालंकारमंडित रुक्मादेवीही रथांत त्याच्या शेजारीं बसली होती. तें पाहून हर्षनिर्भर झालेला हरिपाल मनांत म्हणतो, "काय हो आज माझें भाग्य ! पांडुरंगानें मजवर ही मोठीच कृपा केली. त्या दीन-दयाघनास माझी करुणा येऊन त्यानेंच ही अपूर्व शिकार पाठविली. मात्र ही मंडळी पांडुरंगाची उपासक नसो, म्हणजे झालें." मग तो त्वरेनें टेंकडीवरून खालीं उतरला व सावकाराचा रथ अडवून त्यास म्हणाला, "अहो महाराज, तुम्हीं कोण आहांत व तुमचें नांव काय, तें सांगा आणि मग पुढें जा." सावकारवेषधारी पांडुरंगानें उत्तर दिलें कीं, 'माझें नांव जगत्पाळशेट व ही स्त्री माझी पत्नी आहे.' हरिपाळानें पुनः विचारिलें, "तुम्ही कधीं पंढरपुरास जाऊन पांडुरंगास नमस्कार केला होता काय ? किंवा त्याचें नामस्मरण तुम्ही करीत असतां काय ?" सावकारानें सांगितलें, "आम्हांस तुझें पंढरपुरही ठाऊक नाहीं आणि विठोबाही ठाऊक नाहीं ! त्या देवाची उपासना तुझ्यासारख्या चोरांनींच करावी; आम्ही तर त्याचें मुखावलोकन करण्यासही तयार

नाहीं." ही आपल्या उपास्य दैवताची निंदा ऐकून हरिपाळास मोठा क्रोध आला. तो सावकारास म्हणाला, "अरे चांडाळा, आधीं तुम्हीं आपल्या अंगावरचीं वस्त्रेंभूषणें येथें उतरून ठेवा. आज तुमच्या मृत्यूनें तुम्हास गांठलें आहे." इतकें बोलून हरिपाळ मोठ्या आवेशानें रथावर चढला आणि सावकारास खालीं ओढून, डाव्या हातानें त्याची शेंडी धरून व उजव्या हातांत खड्ग घेऊन त्यास म्हणाला, "दुष्टा! माझ्या पंढरिनाथाची निंदा करतोस काय? आतां दुसरा कोणता देव तुला सोडवितो तें पाहूं." हें ऐकून सावकाराची पत्नी डोळ्यांत आंसवें आणून हरिपालास म्हणाली, "अरे बाबा, मी तुझ्या पायां पडतें, पदर पसरतें; आमच्या अंगावरचीं सगळीं वस्त्रें आणि दागिने तूं खुशाल घे. पण आम्हांस मारूं नकोस. मी तुझी धर्मकन्या आहें. माझ्या भ्रतारास जीवदान देऊन माझें सौभाग्य कायम राख. श्रीविठ्ठल तुझें कल्याण करील." परंतु ही विनवणी ऐकूनही हरिपाळानें सावकाराची शेंडी सोडलीं नाहीं, तेव्हां, तूं आम्हांस मारशील तर तुला विठ्ठलाची शपथ आहे, असें सावकारपत्नीनें ( रुक्मिणीनें ) त्यास सांगितलें. ही शपथ ऐकतांच हरिपालानें सावकारास सोडून दिलें व त्यांचीं वस्त्रेंभूषणें घेऊन तो मोठ्या आनंदानें घरीं आला. इकडे पांडुरंगही रुक्मिणीसहवर्तमान अंतर्धान पावले.

नंतर हरिपाळानें त्या भूषणांपैकीं एक सुवर्णकंकण बाजारांत विकून, भोजनाचें सर्व साहित्य घरीं आणलें व स्वयंपाक करून सर्व संतमंडळीस यथास्थित भोजन घातलें. रात्रीं कीर्तन संपल्यावर नामदेवादि संतांनीं त्यास विचारलें कीं, तुला इतका उशीर कां लागला? तेव्हां हरिपाळानें जगत्पाळ शेटजींचा वृत्तांत त्यांस सांगितला. तो ऐकून, हरिपाळाचे भक्तीसाठीं पांडुरंगानेंच हें नाटक करून दाखविलें, अशी त्यांची खात्री झाली.

तीर्थावळीच्या अभंगांत व महीपतींच्या ग्रंथांत, ज्ञानदेव व नामदेव हे दोघेच तीर्थयात्रेस गेले होते असें वर्णन आहे. परंतु नरहरि मालू यानें आपल्या 'भक्तकथामृत' ग्रंथांत तत्कालीन सर्व संतांस एकदम तीर्थयात्रेस पाठवून दिलें आहे! निवृत्तिनाथ, सावंता माळी वगैरे सर्व संत नामदेवांबरोबर तीर्थयात्रेस गेले होते असें त्याचें म्हणणें आहे, इतकेंच नव्हे तर, सजन कसाई, नरसी मेहता, नानक, पैठणकर भानुदास, तुळसीदास, कबीर, सेना न्हावी, रामानंद वगैरे निरनिराळ्या काळीं व स्थळीं होऊन गेलेल्या अनेक पुरुषांशीं नामदेव–ज्ञानदेवांची त्यानें भेट करविली आहे! त्यानें सांगितलेल्या ह्या सगळ्या भाकडकथा रा. मुळे यांनीं आपल्या ग्रंथांत दिल्या आहेत, पण त्या सर्वांचा समावेश प्रस्तुत नामदेवचरित्रांत करणें मला प्रशस्त वाटत नाहीं.

रा. आवटे यांनीं छापलेल्या नामदेवी गाथ्यांत काशीयात्रेसंबंधाचे तीन अभंग सांपडले तेवढे मात्र येथें देऊन हें प्रकरण संपवितों.

१ ज्ञानदेव आले काशी । विश्वेश्वर आडवे येती १
रामनगरा वेशीपाशीं । भेटी झाल्या उभयतांसी २
परस्परें आलिंगन । नामा वंदी उभयचरण ३

२ पुढें उभे वेशीपाशीं । त्याला लोटांगण काशी १
स्वर्गी देवा जाहल्या भेटी । भोंवत्या पातकांच्या थाटी २
नामा म्हणे विठ्ठल बोला । ज्ञानोबासी म्हणे चला ३

३ ज्ञानोबाचा हात । प्रेमें धरी विश्वनाथ १
ऐसे बोलत चालत । दोघे आले गंगेआंत २
ज्ञानोबाचे पायीं । मिठी घाली गंगाबाई ३
नामा म्हणे सोडा बाई । ज्ञानदेव सर्वां ठायीं ४

हे अभंगही उघड उघड क्षेपक दिसतात.



# प्रकरण पांचवें.

मागील प्रकरणीं सांगितल्याप्रमाणें नामदेव तीर्थयात्रा संपवून पंढरपुरास परत आले, तेव्हां खुद्द पांडुरंगानें व नरहरि सोनारादि संतांनीं त्यांचें प्रेमानें स्वागत केलें. दुसरे दिवशीं मामद्याचा समारंभ मोठ्या थाटाचा झाला. विप्रवेषानें खुद्द पंढरिनाथ नामदेवांस हातीं धरून आमंत्रणास निघाला होता. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, जगमित्र नागा, सांवता माळी, जाल्हण, चोखामेळा, वंका इत्यादि संत बरोबर होते. नामदेवांचा पण सिद्धीस नेण्यासाठीं पांडुरंग स्वतः यजमान झाला होता. सर्वांनीं क्षेत्रप्रदक्षिणा करून गांवांतल्या ब्राह्मणांस भोजनाचीं आमंत्रणें दिलीं. विप्रवेषधारी भगवंतांचें तें दिव्यस्वरूप पाहून ब्राह्मण म्हणाले, " तुमचें सौंदर्य अपूर्व आहे. महाराज, आपण कोणता व्यवसाय करितां ? येथें कोणत्या ठिकाणीं आपण मुक्काम केला आहे ? व आजच्या ब्राह्मणभोजनाचें प्रयोजन काय ? " पंढरिनाथानें सांगितलें, "सर्व हरिदासांना माझी कुलवृत्ति ठाऊक आहे, कारण ते मला पूर्णपणें ओळखतात. खरें पुसाल तर मी स्वतः अगदीं निःसंग आहे, पण मी आपला सर्व काळ या संतांच्या संगतींत घालवितों. कारण, त्यांचा माझा अनंत जन्मांचा ऋणानुबंध आहे. हा नामदेव तर माझा अगदीं जिवलग मित्र आहे. आतां आपण सगळे स्नान करून आमच्याकडे भोजनास या आणि आम्हांस कृतार्थ करा. माझें नांव अनंत ब्राह्मण; आणि माझें बिऱ्हाड खुद्द पंढरिनाथाच्या देवळांतच आहे. " खूष होऊन ब्राह्मण म्हणाले, " ठीक आहे. तुम्हीं आपल्या बिऱ्हाडीं जाऊन स्वयंपाकाची पूर्ण सिद्धता करा. आम्ही स्नानसंध्या करून योग्य वेळीं तुमच्याकडे येतों. " पंढरिनाथानें ही आमंत्रणाची हकीकत रुक्मिणीदेवीस सांगितली.

**मग रुक्माईसी सांगे सकळ विवंचना । प्रार्थिलें ब्राह्मणां सकळिकांसी १ कर्मठ अभिमानी नोळखती मज । देखोनियां चोज वाटे त्यांसी २ कुळवृत्ति नाम पुशिलें मज तिहीं । सांगितलें म्याही सर्व त्यांसी ३ सांगाती संतांचा मी मैत्र नामयाचा । अनंत जन्मांचा निकट म्हणोनि ४ बिढार तरी असे राउळाभीतरीं । सांगें खूण परी न कळे त्यांसी ५ नाम तरी अनंत दाविला संकेत ।**

परी नेघे त्यांचें चित्त आठवण ६ तंव ते विश्वमाता म्हणे जी कृपानिधि । सदा भेदबुद्धि त्यांचे ठायीं ७ विद्या वयसा जाती कुळाचा अभिमान । त्यां कैंचे चरण प्राप्त तुमचे ८ उदार चक्रवर्ती भक्तांचा विसांवा । त्यांच्या निजभावा वेळाईतू ९ तो भाग्यें जोडला वैकुंठींचा ठेवा । उजरी झाली दैवा नामयाच्या १०

मूळ अभंगवद्ध नामदेवचरित्रकारानें रचिलेले तीर्थावळीचे हे सगळेच अभंग इतके सुंदर आहेत कीं त्यांचा येथें गद्यांत अनुवाद केल्यास, मूळांतल्या सौंदर्याचा एकदशांशही त्यांत येणें शक्य नाहीं. म्हणून मूळ चरित्रकाराच्या प्रासादिक व मधुर शब्दांतच पुढील कथाभाग सांगणें भाग आहे. रा. मुळे यांनींही असेंच केलें आहे आणि त्याचेंही कारण हेंच असावें असें वाटतें.

तंव अणिमादि सिद्धी उभ्या महाद्वारीं।तिहीं सर्व सामुग्री सिद्ध केली १ सडा संमार्जनें गुढिया तोरणें । शृंगारिलीं भुवनें परिचारिकीं २ म्हणती काय पुण्य केलें येणें विष्णुदासें । देवा लोभपिसें लावियेलें ३ द्वारीं दीपावळी चौक रंगमाळा ।अभिनव सोहळा आरंभिला४ हरुषें मंगळ तुरें वाजती विनोदें । भक्त जयजय शब्दें गर्जताती ५ मंगळ मार्जन नामयातें करविलें । मग तें आरंभिलें पुण्याहवाचन ६ देवें अंगवस्त्रें आपुलेनि हातें। वाहिलीं अनंतें विष्णुदासां ७ सत्यभामा राई रुक्मामाई जननी । वेगें अक्षवाणी घेउनि येती ८ आनंदें नरनारी कवतुक पाहती । जीवें वोवाळिती नामयासी ९ आपुलिया दासाचा करी समारंभु । दीननाथ प्रभु कृपासिंधु १० धन्य हा नामा म्हणती सकळ लोक । नेणती याचें सुख ब्रह्मादिक ११

मग झाला स्वयंपाक स्नानाविधि सारा । सकळां हांकारा जाणविला १ आले महाद्वारीं दिधलीं आसनें। पूजा नारायणें आरंभिली २ तंव ठकलों म्हणती देव

पहा वो कैसें जालें । सर्व दुःख नेलें इहीं भक्तीं ३ रत्नजडित पाट सत्वरीं आणिले । वरी द्विज बैसविले पृथक्कारें ४ प्रक्षाळोनी चरण पुसिले पीतांबरें । मस्तकीं आदरें तीर्थ वंदी ५ कस्तुरीचे टिळे दिव्य चंदन उटी । घातलिया कंठीं तुळसीमाला ६ दशांग धूप रत्नाचा दीपक । वोवाळी नायक वैकुंठींचा ७ दोहीं बाहीं पंक्ति मांडिल्या देव्हडी । राई रुक्माई परवडी वाढितसे ८ चतुर्विध अन्नें आथिलीं बहुगुणें । षड्रस पक्वान्नें सर्वा ठायीं ९ मग संकल्प सोडिला नामयाचे करें । भक्त जयजयकारें गर्जिन्नले १० भोक्ता नारायण लक्ष्मीचा पति । म्हणोनि प्राणाहुती घेतल्या वेगीं ११ भर्ता भोक्ता कर्ता करविता आपण । सहज तेथें पूर्ण सकळ काम १२ विश्वंभर कृपादृष्टी न्याहाळित । प्रार्थना करीत ब्राह्मणाची १३ देखोनि ते समृद्धि हरिखले द्विज । झालें नवल चोज पहा कैसें १४ कोण हा गृहस्थु केव्हडा भाग्यवंतु । नेणवे अद्भुतु महिमा याचा १५ ऐसे जेविले आनंदें धाले परमानंदें । मुखशुद्धि गोविंदें दिधली करीं १६ कर्पूरेंसहित समर्पिले विडे । कर जोडोनि पुढें विनवितसे १७ ऐसा भक्तजन कृपाळु दीनाचा दयाळु । आनंदें गोपाळु उभा असे १८ तया नामदेवें भुलविलें लोभें । वेडावलें उभें चिदानंद १९

सकळिकां नमस्कार करुनी यादवरावो । सांगे जीवींचा भावो तयांप्रती १ तुमचे कृपादृष्टी करावें भोजन । येणें होईल संपूर्ण व्रतसिद्धि २ हेचि आरती आहे बहु माझ्या जीवीं । ते आजी गोसावी पूर्ण कीजे ३ क्षण एक बैसावें स्वस्थ अंतःकरणें । संकल्पिलें नारायणें तुळसीदळ ४ संतुष्ट मानसें यातें अंगीकारा । मग निजमंदिरा जावें स्वामी ५ आजि तुमचा लाभु जाला भाग्ययोगें । नाम-

याच्या प्रसंगें घडली सेवा ६ तुह्मी ब्रह्मबीज ब्रम्हादिकां पूज्य । सांभाळिलें मज कृपादृष्टी ७ मज निरालंबासी करोनि अवलंबन । निष्कामासी पूर्ण केलें काम ८ अकर्ता असंगु तुमचेनी कृतार्थ । जालों पैं यथार्थ वचन माझें ९ मग ते चतुर्वेदी महामंत्रेश्वर । द्विज जयजयकार करिताती १० विजयी सर्व काळ व्हावें पुढतोपुढती । आशीर्वाद देती मंत्राक्षता ११ पीतांबराचे अचळीं घेउनि मंत्राक्षता । घालितसे माथां नामयाच्या १२ हेंचि तुझें प्रेम राहों दे चिरंतन । मुखीं नाम ध्यान हृदयीं सदा १३ तंव म्हणती धरामर तुम्ही श्रमलेती थोर । लागला उशीर भोजनासी १४ सर्वां ठायीं तुम्ही सर्वच होउनि एक । कारण सार्थक केलें निकें १५ स्वामीचा आदर सांगतां अभिनव । नम्रता गौरव निरुपम १६ आकल्प आयुष्य चिरंजीव व्हावें । आम्हां सांभाळावें पुढतपुढती १७ आतां संतांचिया पंक्ती सारावें भोजन । करावें परिपूर्ण जीवींचें कोड १८ उच्छिष्ट प्रसाद द्यावा नामयातें । आस करूनि पहात वाट तुमची १९

सुवर्णाचें ताट पक्वान्नें वोगरूनी परिकर । रुक्माईनें सत्वर आणियेलें १ कनककलश घेउनी सत्यभामा आली । आपोशन घाली देवराया २ सुखाचा सुरतरु भक्तचिंतामणि । पुरवितो आयणी निजभक्तांची ३ तेथें उद्धव अक्रूर नारद तुंबर । आणिक अपार भक्त येती ४ महाद्वारीं होता उभा नामा ठेला । तो जवळी बोलाविला केशिराजें ५ देवाचा वोरसु देखोनी गौरव । देहीं देहभाव विसरला ६ निजबोध निवृत्ति राहिली निवांत । हृदयीं वोसंडत प्रेमरसें ७ देखोनि पंढरिनाथ धाविन्नला वेगीं । जैसी वत्सालागीं पान्हे धेनु ८ उचलोनी चहुं भुजीं दिलें आलिंगन । आणिलें उमजून देहावरी ९

धरोनि बाहुवटीं बैसविला ताटीं। स्फुंदतां हिंपुटी होत असे १० कुरवाळोनी माथा घांस घाली मुखीं। तंव तो पर लक्षी तन्मय होतु ११ अंतरींचें गुज बोले कृपासिंधु। करूनि सावधु नामयासी १२ म्हणे जिवलगा बोलें सुखगोष्टी। आर्त आहे पोटीं बहु दिवसांचें १३ अंतरींचें सुख बाहेरी तूं पाहें। गगना काय आहे पाठीपोट १४ तैसा तूं आनंदु आहे पैं निर्मळ। चिद्रूप केवळ सदोदित १५ तुझें तेंचि माझें माझें तेंचि तुझें। आहे सहजीं सहजें एकविध १६ परतोनियां दृष्टी घालीं मजवरी। मी तंव गा निरंतरी तूंचि होसी १७ हा तुझा सोहळा पाहें उघडा डोळा। मी आहें तुजजवळां ज्ञानदीपू १८ आर्त तुझिये भेटी आले भक्तराणे। सुखाचें पारणें करवीं त्यांसी १९ परमानंदमूर्ति धन्य हा निवृत्ति। सुखाचा सांगाती ज्ञानदेव २० पवित्र हा सोपान परदेशींचें तारूं। करीं याचा आदरू भाग्यवंता २१ म्हणोनि पंढरिनाथें आश्वासिलें करें। मिठी दिली येरें चरणकमळीं २२ नामा म्हणे तुझे कृपेचा ओलावा। विश्रांति या जीवा झाली असे २३

नामयाचे मुखीं घालुनी कवळु। पुसतसे गोपाळु शिणभागु १ जें करकमळ सनकादिकां शिरीं। नामा तिहीं करीं कुरवाळिला २ सांडीं सर्व खंती जीवींची काजळी। विश्रांति मजजवळी आहे तुज ३ वियोगाचेनि शोकें शिणलासी मार्गीं। देह मजलागीं वाळविला ४ कोमाईलें वदन निडारला नयनीं। नेणे तुझी कोणी तानभूक ५ गेलासी जवळूनी ज्या दिवसापासूनी। न दिसे माझें कोणी आवडतें ६ धीर न धरवे जीवा पाहें दाही दिशा। माझा विष्णुदास येइल केव्हां ७ तुज पाहें गरुडपारीं पाहें

महाद्वारीं । पाहें भीमातीरीं चंद्रभागे ८ पाहें पद्मतीर्थी पाहें वेणुनादीं । न लगे तुझी शुद्धि खंती वाटे ९ अनुदिनीं भोजन करितां उदकपान । तेव्हां आठवण होय तुझी १० मी ह्मणे धांवत ऐसी न धरत । प्रसादाचें आर्त बहु तुज ११ धांवोनियां येसी आलिंगन देसी । पुसेन सांगसी सुखगोष्टी १२ तेणें हर्षें निघती डोळियांसी दोंदें । हृदय माझें कोंदे करुणारसें १३ आवडतें आळुकें जननीयेचें बाळ । जाणे ते कृपाळ भूक त्याची १४ तैसा पंढरिनाथ मोहें वोसरला । नाम्यातें पाजिला प्रेमपान्हा १६

ऐसी ते जेवणीं ब्रह्मरसाची धणी । पुरविली आयणी निजभक्तांची १ नाम्याचें उच्छिष्ट स्वीकारिलें देवें । कौतुक आघवे पाहती द्विज २ म्हणती आम्हां येणें कैसी केली माव । बुडविलें सर्व क्रियाकर्म ३ नेणवे हा कोण दिसे सुलक्षण । नव्हे क्षत्रिय ब्राम्हण वैश्य शूद्र ४ चहूं वर्णावेगळी दिसे याची लीला । विस्मृति सकळां पडिली कैसी ५ निर्धारें नाम्याचा होय मायबापू । सोडविला संकल्पु त्याच्या हातीं ६ काया वाचा मनें लोभ याच्यावरी । घातलिया शिरीं मंत्राक्षता ७ एक म्हणती झाले होते ते निर्माण । आतां आपुलें आपण गौप्य करा ८ लौकिकीं ही मात प्रकट कराल ह्मणी । न बोलावी कोणी कोणापाशीं ९ एक म्हणती आतां यासीच वाळावें । आपुलें टाळावें लोकनिंद्य १० अज्ञानासी दोष नाहीं प्रत्यवाय । शास्त्रीं हा उपाय सिद्ध असे ११ आत्मशुद्धीसाठीं करा विचारणा । करा मंत्रस्नाना त्रिपदा जप १२ म्हणोनी सत्वर चालिले आघवे । प्रार्थूनियां देवें बोलाविले १३ संकोचित मनें दिसती कवण्या गुणें । कोमाइलीं

**वदनें सकळिकांचीं १४ काय शंका वाटे तुमच्या मनीं स्वामी । ते कृपा करूनि सांगा मज १५ मनाचे मवाळ तुम्ही ब्रह्मबीज । गौप्य नये गुज करूं कांहीं १६ मी तुम्हां सकळांचें असें कृपापात्र । सांगा जीवींचें आर्त करीन पूर्ण १७ मग संपूर्ण दक्षिणासहित तुळसीदळ । वरी त्या पुण्यजळ प्रोक्षुनियां १८ चरणावरी नामा घोलोनी निरवी । म्हणे कृपा असों द्यावी याजवरी १९**

या अभंगांची एकंदर रचना पाहिली म्हणजे ही वाणी कोणातरी ब्रम्हकुलोत्पन्न सुसंस्कृत आणि व्युत्पन्न पुरुषाची असली पाहिजे असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. असो.

नामदेवांच्या तीर्थयात्रेचें मामदें घालण्यासाठीं पांडुरंगानें स्वतः ब्राह्मणवेष धारण करून पंढरींतील ब्राह्मणांस भोजनाचें आमंत्रण दिल्यावर, ठरलेल्या वेळीं सर्व ब्राह्मण नियमित स्थलीं जमा झाले. प्रत्यक्ष भगवंताच्याच घरचें तें भोजन, तेव्हां त्याचा थाट कसा असेल हें सांगावयास नकोच. भोजनाची सिद्धता झाल्यावर पांडुरंगानें नामदेवांकडून संकल्प सोडविला. जेवणाच्या गडबडींत हा प्रकार ब्रम्हवृंदाच्या लक्ष्यांत आला नाहीं. जेवण आटोपल्यावर, ब्राह्मणवेषधारी विठ्ठलाचें एकंदर वर्तन पाहून, विशेषतः नामदेवांचें उच्छिष्ट त्यानें ग्रहण केलेलें पाहून भोजनास आलेले ब्राह्मण थोडेसे साशंक झाले. ते आपसांत चर्चा करूं लागले, "काय हो, हा अनंत ब्राह्मण अंमळ विचित्रच दिसतो, नाहीं का? यानें कोणती जादू केली कोण जाणे, पण नामदेवाच्या पंक्तीस बसून आपण भोजन केलें, हें शेवटपर्यंत कांहीं आपल्या लक्षांत आलें नाहीं. यानें आमचें क्रियाकर्म आज साफ बुडविलें. हा चांगला सुलक्षण दिसतो, पण ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांपैकीं याची जात कोणती हें कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. याचें सगळें वर्तन चतुवर्णांच्या बाहेरचें दिसतें. आणि नामदेवावर तर याचें मोठेंच प्रेम आहे; आमच्या मंत्राक्षता यानें नामदेवाच्या मस्तकावर टाकविल्या." एक भटजी म्हणाले, "अहो, झालें तें झालें; आतां निदान या गोष्टीचा गांवांत परिस्फोट होणार नाहीं, येवढी तरी खबरदारी घ्या." दुसरे एक भटजी म्हणाले, "या अनंत ब्राह्मणालाच आपण वाळींत टाकूं म्हणजे झालें. आमच्या हातून अज्ञानानें हें पातक घडलें, आणि अज्ञानानें झालेल्या कृत्यास दोष नाहीं, असें शास्त्रांत सांगितलें आहे. आतां, आत्मशुद्धीसाठीं फार तर स्नान करून गायत्री मंत्राचा जप करावा म्हणजे झालें." मग हा बेत मुक्रर करून ब्राह्मण आपापलें चंबू गवाळें घेऊन

घरीं जाण्यास निघाले. तेव्हां ब्राह्मणवेषधारी पांडुरंगानें त्यांची विनवणी करून त्यांना थांबविलें व विचारलें, " महाराज, तुमचीं तोंडें अशीं उतरलेलीं कां दिसतात ? तुमच्या मनांत जर कांहीं शंका असेल तर ती मला स्पष्ट सांगा, म्हणजे मी तिचें निराकरण करीन. " इतकें बोलून देवानें त्यांना विडे व दक्षिणा दिली व नामदेवांस त्यांच्या पायांवर घालून, " याजवर आपली कृपा असावी " अशी त्यांस विनंति केली. तेव्हां ब्राह्मण म्हणाले, " हा नामदेव बोलून चालून शिंपी; असें असतां तुम्हीं त्याला आमच्या पंक्तीस बसविलेंत; इतकेंच नव्हे तर याचें उष्टेंदेखील तुम्ही खाल्लें ! काय हा भ्रष्टाकार ! या नामदेवावर तुमचें इतकें प्रेम कां, कीं ज्याच्यासाठीं तुम्ही आपली जात बुडवितां ? तुमचें हें एकंदर वर्तन पाहून आम्हास आतां असें वाटूं लागलें आहे कीं, तुम्ही कोणी तरी वेषधारी पुरुष आहांत. वर्णाश्रमधर्माचीं कोणतींही लक्षणें तुमच्या ठिकाणीं दिसत नाहींत.

**वंद्य निंद्य तुम्हां न दिसेचि कोणी । दृष्टी दुजेपणीं न पडे तुमची ॥ विश्व आपरूप दिसे तुम्हा सर्व । नेणवे हे भाव ब्रह्मादिकां ॥ आम्ही विश्वासलों वरवेषा तुमच्या । परी भाव अंतरींचा न कळे कांहीं ॥ आपुलें स्वहित देखोनि आपण । पाप अथवा पुण्य विचारावें ॥ सर्वभावें करुनी विधीतें पाळावें । सत्य सांभाळावें वेदवचन ॥ वर्णाश्रमपरत्वें बोलिले जे धर्म । तें तें विहित कर्म आचरावें ॥ स्वामीचें वचन स्वामीनीं पाळावें । यश मिरवावें उभय लोकीं ॥ तरी हा तुमचा जिवलग नामा । निर्धारें हें आम्हां कळों आलें ॥**

ब्राह्मणांचा हा भडिमार ऐकून पांडुरंगानें उत्तर दिलें, " नामदेवांच्या पंक्तीस बसून मीं भोजन केलें, यांत दोष तो कोणता ? एकच चैतन्य सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं चालक आहे; तेथें अमका वंद्य आणि तमका निंद्य असें म्हणण्याचा आपणास काय अधिकार आहे ? ज्याची बुद्धि शुद्ध आहे त्याला पापपुण्याची बाधा कधींही होत नाहीं. देहालाच विटाळ आहे म्हणाल तर देह हा पंचभूतात्मक असल्यामुळें, आकाशांत जसा अभ्राचा भास व्हावा, त्याप्रमाणें तो फक्त भासमान् मात्र होतो. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या ज्या पंचभूतांपासून देह झालेला आहे, त्यांतल्या कोणत्या भूताच्या अस्तित्वामुळें देह दोषी होतो हें आपण सांगाल काय ? तुम्ही

मोठे वेदवक्ते आणि धर्मशास्त्रवेत्ते असाल, परंतु आत्मनिष्ठा तुम्हास अद्या झालेली नाहीं व तुमचा भेदभ्रमही मावळलेला नाहीं. आणि त्यामुळें तुमच्य भ्रम झालेला आहे. येरवीं, या नामदेवानें जेव्हां संकल्प सोडला तेव्हां तुम्ही कशीं घेतलीं असतीं ? शिंप्यानें संकल्पिलेलें अन्न ग्रहण करणें युक्त आहे याचा विचार तुम्ही त्याच वेळीं कसा केला नाहीं ? आशीर्वाद देतांना तु मंत्राक्षता दिल्या त्याही मी नामदेवांच्याच माथ्यावर टाकल्या. अशा प्रक निष्कामाला तुम्ही पूर्णकाम केलें, तरी माझी ओळख तुम्हास अद्याप पटत तुम्ही सर्व ब्राह्मणांनीं अगोदर भोजन केलें व तुमचें उरलेलें शेष अन्न आम्हीं रलें. हा जर आमचा दोष असेल तर ग्रंथांत त्याबद्दल जें काय प्रायश्चित्त सां असेल तें घेण्यास मी तयार आहें. परंतु खरें पुसाल तर, या हरिदासांचे आणि तुमचें चरणतीर्थ यांच्या योगानें माझा देह पूर्णपणें पावन झालेला अशा स्थितींत प्रायश्चित्ताची तरी काय जरुरी ? ज्या पुरुषाच्या ठायीं भूतद करित तेथें व्रत, तप, दान आणि सगळ्या कर्मक्रिया यांचें स्वयंभू अधिष्ठान अ

**तोचि सत्य मानी भक्त आणि ज्ञानी । न विसंबे निर्वाणीं जीवें त्यासी ॥ ज्ञानाचें सौभाग्य भक्ति आणि वैराग्य । तयाचें आरोग्य प्रेमरस ॥ त्यासी संजीवन सदा संतसंगु । त्यावरी अनुरागु वज्रकवच ॥ धर्म अर्थ काम मोक्ष दृष्टी नाणी । वोळगती आंगणीं मुक्ति चारी॥ अनुहात गजरू होतसे नामाचा । दीप अलक्ष्याचा पाजळीतू ॥ इंद्रपदादिकें नाशिवंत होती । म्हणोनी आसक्ति न धरावी त्यांची ॥ हें जाणोनि साच न धरावी त्यांची आस । अखंड माझा वास हृदयीं त्यांच्या ॥ काम क्रोध वैरी दुराविले दुरी । मज हृदय-मंदिरीं सांठविलें ॥ तेणें त्याच्या उच्छिष्टा झालोंसे अधिकारी । ब्रह्मरसा सरी न पवे जेथें ॥ म्हणोनी संसारीं धन्य एक नामा । जेणें माझा प्रेमा अनुभविला ॥**

**महा मुक्तिक्षेत्र तीर्थांचें तारक । उपमेसी आणीक नाहीं दुजें ॥ तें हें पंढरपुर प्रेमाचें भांडार । नामें**

निरंतर गर्जतसे ॥ येवढें तीर्थ जवळी असतां पैं समर्थ। कोण भाग्यहत दैन्य भाकी ॥ जीवन्मुक्त ज्ञानी येथ पुंडलीक मुनि। बैसलासे ध्यानीं परलक्षी॥ योग्यांचे हृदयींचें निजध्यान नेटकें। तें जयाचे सुखें वेडावलें ॥ पुण्यपावन भीमा दक्षिणवाहिनी। अमृत-संजीवनी पुण्यराशी ॥ आनंदरसकूपिका प्रत्यक्ष चंद्र-भागा। दर्शनें न या गा गर्भवासा ॥ स्वर्गीं मंदाकिनी लाजोनी राहिली। पाताळीं प्रवेशली भोगावती॥ सहस्रभाग येणें होउनि भागीरथी। सागरा मिळती झाली वेगीं॥ भक्तजन भाग्याची कीं सुख आरोग्याची। जे कां वैराग्याची जन्मभूमी ॥ तेथें हरिखें निर्भर नामा संतांचे संगती। गीतीं गाय कीर्ति विठोबाची ॥

सकाम निष्काम वाचे म्हणे राम। तो माझा परम प्राणसखा ॥ जीवाहूनि आवडता न करीं जीवापरता। पूजीं परमदेवताभावें त्यासी ॥ हे माझी प्रसिद्ध जगीं ब्रीदावळी। हरिदासाचे कुळीं वोळंगें सदा ॥ जन्मोनि ज्याचे कुळीं एक हरिदास। धन्य त्याचा वंश पुण्यशीळ॥ काया वाचा मनें न विसंबें त्यांसी। ते माझ्या दैवासी दैव झाले॥ नामधारकाचें उच्छिष्ट जेथें पडे। उभा राहोनि पुढें झेलीं मुखें ॥ तें मज गोमटें सेवितां सुख वाटे। म्हणोनि धाटें मोठें शरीर माझें॥ बहु कांति पुष्टि यश कीर्ति प्रभा। नित्य नवी शोभा होय तेणें ॥ ते संत सोयरे भेटती जे वेळीं। ते माझी दिवाळी दसरा सण॥ म्हणोनि नामयातें जेवविलें सांगातें। बहु दिवस होतें आर्त पोटीं ॥ झालें तें सर्वथा नव्हे पैं अन्यथा। पुढती सांगा आतां काय करणें ॥

याप्रमाणें ब्राह्मणवेषधारी पांडुरंग, स्वतःची अगदीं सहज ओळख पटेल अशा रीतीनें उघड भाषण करीत असतांही भोजनभाऊ ब्रह्मवृंदास त्याच्या खऱ्या स्वरू-

पाची परीक्षा शेवटपर्यंत झाली नाहीं ! त्यांनीं ब्राह्मणवेषधारी पांडुरंगास प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्यास सांगितलें ! ती त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून, सर्व संत व ब्राह्मण यांसहवर्तमान पांडुरंग चंद्रभागेवर गेला व पुंडलीकास प्रणिपात करून, ब्राह्मणाचें चरणतीर्थ त्यानें घेतलें. मग सर्व ब्राह्मणांस प्रदक्षिणा घालून, गोमय मृत्तिका अंगास लावून त्यानें यथाविधि स्नान केलें. नंतर ब्राह्मणाचें चरणतीर्थ मस्तकीं वंदून, सर्व संतांचें अभिवंदन केलें. पुढें संध्याविधि करून सर्व ब्राह्मणांचें त्यानें पूजन केलें व त्यांस दानें दिलीं. नंतर, हात जोडून त्यांची प्रार्थना केली कीं, " महाराज, आपण कृपादृष्टीनें मला सनाथ केलें, तरी आतां मजविषयीं कोणताही किंतु मनांत ठेवूं नये. " इतकें बोलून भगवंतानें ब्राह्मणांस निरोप दिला व समस्त संतमंडळीसह तो महाद्वारीं आला. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, सावंता, जनमित्र इत्यादि अनेक संत या प्रसंगीं हजर होते. महाद्वारीं आल्यावर, पांडुरंग संतमंडळीस म्हणाला, " सर्व ब्राह्मणांस पुनः एकदां भोजनास बोलावून त्यांचा संदेह कायमचा दूर करावा, असा माझा विचार आहे. तरी उद्यां सकाळीं, प्रातःकाळींच उठून, ब्राह्मणांस अक्षत देण्यासाठीं इकडे या. "

पुढील वृत्तांत मूळ चरित्रकाराच्या अत्यंत प्रासादिक शब्दांतच येथें देतोः—

**सुखशेजारीं देव पर्यंकीं पहुडले। विश्रांतीसी गेले सकळ भक्त १ ब्रह्मवीणा करीं घेउनि ब्रह्मसुत । जाणवी एकांत नारदमुनी २ बाप पंढरिनाथ सुखाचा सुखसिंधु । नित्य नवा आनंदु सोहळा करी ३ विश्रांति विसांवा जें विश्वमंगळ । तें नाम निर्मळ विठोबाचें ४ तो भक्तशिरोमणि वैराग्यपुतळा । गातो प्रेमकळा धरुनी कंठीं ५ तेणें श्रवणामृतें हृदय कोंदाटलें । प्रेमाचे सुटले पाझर नयनीं ६ हर्षानिर्भर दोन्ही देव नारदमुनि । प्रीति आलिंगनीं एकमेकां ७ जाती चंपक सुमनें माजी तुळसीमिश्रित । दिधल्या त्या उचित कंठीं माळा ८ नमस्कार करुनी केलें विसर्जन । भरलें त्रिभुवन ब्रम्हरसें ९ मग चालिले तेथोनि ऋषि नारदमुनि । हृदयीं संजीवनी कृष्णनाम १० तेणें त्या विश्रांति नित्यतृप्ति मनीं । नामा जीवें चरणीं विनटला ११**

जीवींचें गुज राही रुक्माईसी पुसे । न धरवे मज हांसें नवल वाटे १ काय अभिश्राप आला देवराया । केली आपणया आत्मशुद्धि २ हें मज बाई सत्य सांगा वाणी । कवणें चक्रपाणी भुलविलें ३ सूर्य आणि अंधारू वर्ते एके ठायीं । हें भूत भविष्य नाहीं वर्तमान ४ ऐसें हें अघटित जरी घडेल प्रसंगीं । तरीच दोष संसर्गी देवराया ५ अग्नीमाजी बीज पाल्हेजती सुरवाडें । कीं बुडालें सांपडे लवण जळीं ६ ऐसें हें अभिनव जरी सांपडे प्रसंगीं । तरीच ससंगीं पडती देवो ७ ज्योतीसी अळुमाळु मिळाल्या कर्पुरीं । पुढती त्यासी उरी उरे जरी ८ ऐसें होय जरी या त्रिभुवनामाझारी । तरीच श्रीहरीं वसती दोष ९ तरि हें न कळे मातें सांगावें साचार । सर्वज्ञ चतुर वडील तुम्ही १०

रुक्माई म्हणे परियेसीं वो आरजे । सांगेन सकळ जें वर्म तुज १ अनाथा माहेर एक चक्रपाणी । बहु दीनालागोनी लोभापर २ म्हणोनि भुलला देव नाम्याचेनि लोभें । कर्मे शुभाशुभें अंगीकारी ३ आवडीचा वोरसु न करी काय काय । हा प्रसिद्ध अनुभव आहे लोकां ४ विषयीं विषम सुख विषयींचें गळालें । तयाचे सोहळे करिती लोक ५ आंधळे पांगुळे मुके अनर्गळ । परि जीवापरीस बाळ पढियंतें मातें ६ अंतरींच्या कळवळें खेळवी लाडेंकोडें । परि विलासाचें नावडे चोख चांग ७ प्रीतीच्या पडिभरें नेघे पैं विकृति । देखोनी विश्रांति थोर मानी ८ म्हणे माझे अळिवे दिठावेल झणी । इडा पिडा घेउनी वदन चुंबी९ स्नेहाच्या संभ्रमें नेणें लोकलाज । उचलोनी भुज घाली कंठीं १० तनुमन प्राणाची करुनी वोवाळणी । जावें हें माझेनी म्हणे जीवें ११ तैसीच परी आहे या

विठ्ठलाच्या ठायीं । चित्त याच्या पायीं ठेविलें जेणें १२ न पाहे तयाचें जाती कुळ कर्म । वर्णाश्रमधर्म शुद्ध वाणी १३ अनंत जन्मांचा काया मनें वाचा । आहे या दोघांचा ऋणानुबंधु १४ तो न कळे न सुटे कोणिये कल्पांतीं । जिवलग सांगाती झाला नामा १५

मग नारदातें पुसे सत्यभामा देवी । विस्मयो माझ्या जीवीं फार वाटे १ सांडोनियां थोरी देवमुकुटमणि । नाचतो कीर्तनीं संतांपुढें २ तरी कोणीये जन्माचें काय काय याचें । घेतलें नाम्याचें ऋण देवें ३ एका पुंडलिकाचेनि पांगें येणें हो श्रीरंगें । अठ्ठावीस युगें उभ्यां गेली ४ न पाहे परतोनी अझुनी पाठीमोरा । न बोले निष्ठुरा वचन कांहीं ५ तरी कोण प्रीति देवा कोण्या ऋणानुबंधें । राखितो आनंदें बळिचें द्वार ६ विकिला पायिकू काया मनें वाचा । झाला पांडवांचा वेळाइतु ७ जें जें जया आवडे तें तें धरूनि रूप । पाववी संकल्प सिद्धी त्यांचे ८ एकला एकटु एकलेनि जीवें । भक्तांचें करावें सकळ काज ९ ऐसे भक्त अपार आहेत भूमंडळीं । किती लागावळी असेल त्यांची १० म्हणोनि माझ्या जीवीं वाटे थोर खंती । स्वामीतें शिणविती युगायुगीं ११ भक्तांचे आवडी त्यजिलें वैकुंठभुवन । चित्तीं अमृतपान न वाटे गोड १२ अखंड आवडे संतांची संगती । बैसोनी एकांतीं घेती सुख १३ ऐसें इंहीं चाळविलें वैष्णवीं । आमुचे घर गोसावी भुलविले १४ त्या सकळांहूनि पढियंता देवा एकु नामा । भक्तिभावें प्रेमा दिधला त्यासी १५

तंव म्हणती नारदमुनि परियेसीं वो माते । सांगेन मी तूतें सत्य मानीं १ हा निर्विकल्प देव येतसे रूपा ।

करावया कृपा भक्तजनां १ हा शरणागतवत्सलु अनाथा कृपाळु । मिरवी दीनदयाळू ब्रीद जगीं २ जो शब्दब्रह्म-जनिता सकळ विधिकर्ता । धर्मांचा पाळिता पक्ष-पाती ४ म्हणोनि जन्मकर्मे असंख्यात जगीं। केलीं याच-लागीं नारायणें ५ अंबऋषीचे येणें सोसिले गर्भवास । राखितो उदास बळिचें द्वार ६ विकिला पायिकू काया मनें वाचा । झाला पांडवांचा मोलेंवीण ७ गोकुळीं नंदाचीं राखिलीं गोधनें । प्रीती उच्छिष्ट खाणें गौळि-यांचें ८ विघ्न पडे तेथें आपणा वोडवी । संकटीं सोडवीं माझीं म्हणुनी ९ सांडोनि अभिमान न्यून कामें करी । झालासे अधिकारी दास त्यांचा १० आज्ञा वाहे शिरीं जीवीं जतन करी । मानिलीं सोयरीं जिवलगें ११ एक अपमानिती दावे वरी बांधिती । उपहास करिती हर्ष मानी १२ केले अपराध नेघे आपुले चित्तीं । दुणावितो प्रीति नित्य नवी १३ ऐसा ब्रह्मांडनायकु देव मुकुटमणी । हे त्याची करणी ख्याति जगीं १४ आम्ही सकळ भक्त याचे पूर्ण अंशु । चरणींचा सौरसु नामयासी १५

निजगुज रुक्माई पुसे पंढरिनाथा । ठेवूनियां माथा चरणावरी १ सर्वांह्नि पढियंतें काय स्वामियातें । तें मज निरुतें सांगा स्वामी २ हे माझ्या जीवींची फेडावी आशंका । ब्रह्मांडनायका कृपाळुवा ३ न रिगे तुमचें चित्त योगियांचे ध्यानीं । वैकुंठभुवनीं प्रीति नाहीं ४ तेथींचे सुखभोग सकळ विलास । नावडती उदास कवण्या गुणें ५ सायुज्यता मुक्ति आपुली देऊनी । ज्ञानी ते निर्गुणीं बुडविले ६ त्यांह्नि जिवलग कोण तुमचे सखे । जे त्यांचेनि पैं सुखें वेडावलेती ७ चतु-राननाऐसा स्तविता चतुरपणें । अठराही पुराणें वेद

चारी ८ परि तेही उबगलीं म्हणती नेति नेति। शिणलीं वेवादती साही जणें ९ ऐकुनि पंढरीनाथ बोले रुक्माईसी। तूं कां वो नेणसी गुज माझें १० काया वाचा मनें सर्व निरंतरीं। आहे नाम्यावरी लोभ माझा ११ जीवींचें निजगौप्य सांगेन वो तूतें। ऐक एकाचित्तें मनोधर्मे १ आवडते हे माझे भक्त परम सखे। जे सबाह्य सारिखे सप्रेमळ २ त्या परीस थोर नाहीं मज दुजें। मज त्यांचेनि काजें नांव रूप ३ भक्त सर्वांहोनि पढियंते माझिया हो जीवा। भक्त हा विसांवा ज्ञानियांचा ४ भक्त योगियांच्या सुखाचा शृंगारू। भक्त अलंकारू वैराग्याचा ५ भक्त वो माझिया जीवींचें निजध्येय। भक्त परम प्रिय कुळदैवत ६ भक्तसंगें सुख विश्रांति विसांवा। भक्त माझा ठेवा सर्व धन ७ भक्त हे माझिया भाग्याचें भूषण। भक्त ते निधान निक्षेपींचे ८ भक्त यश कीर्ति भक्त सुखमूर्ति। भेटे तरी पुरती सकळ काम ९ भक्त माझ्या सर्व सुखाचा अधिकारी। भक्ताचिया घरीं वस्ती माझी १०

मज आणि भक्ता नाहीं वेगळिक। ध्यावें सर्व सुख भक्तें माझें ११ भक्तें नाम घ्यावें भक्तें रूप ध्यावें। भक्तें रूप पहावें घडिये घडिये १२ भक्तें हृदयीं माझे चिंतावे चरण। भक्तें आलिंगन द्यावें मज १३ धर्म अर्थ काम मोक्ष मुक्ति चारी। देतां न धरी करीं भक्त माझा १४ भक्त न मागे कांहीं न घाली मज भार। मजहूनि उदार भक्त माझा १५ पत्र पुष्प फळ जळ तें सर्व भावें। भक्ताचें मज व्हावें भलतैसें १६ आस करूनी वास पाहें घडिये घडिये। भक्ताचें तें पढिये सर्व मज १७ तरी मी भक्तांचा कीं भक्त आमुचे। सोइरे निजाचे एकमेक १८ म्हणोनि नामयाचें आर्त थोर जीवा। जवळोनी नवजावा दूर कोठें १९

सत्यभामा, रुक्मिणी, नारद आणि पांडुरंग यांचा हा काल्पनिक संवाद कवीनें भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व प्रतिपादण्यासाठींच केवळ घातलेला दिसतो. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाचा हा बहुतेक अनुवाद आहे; व या प्रकरणाच्या शेवटीं 'नव्हे हें प्राकृत पाठांतर कवित्व । हा उपनिषदमथितार्थ ब्रम्हरस' असें कवीनेंच स्वतः सांगितलें आहे. असो.

वरील संवाद झाल्यावर ज्ञानदेवादि संतमंडळी राउळांत पुनः आली व ज्ञानदेवानीं रुक्मादेवीस विनंति केली कीं, चंद्रभागेवर केलेला संकल्प आतां पूर्ण केला पाहिजे. या पंढरिक्षेत्रांतले सुशील आणि सदाचारी ब्राम्हण आदरपूर्वक बोलावून त्यांना भोजन दिलें पाहिजे. मग रुक्मादेवीनें भगवंतास सांगितलें कीं, आतां ब्राम्हणांस तुम्ही अक्षत देऊन या. तोंपर्यंत आम्ही भोजनाची तयारी करितों. तें ऐकून पंढरिनाथ विप्रवेषानें सर्व संतांसह ब्राम्हणांस आमंत्रण देण्यास निघाला. कुंडलतीर्थावर सगळे ब्राम्हण जमले होते त्यांस प्रणिपात करून पांडुरंग म्हणाला, " महाराज, कृपा करून आमच्याकडे आज भोजनास आलें पाहिजे. भोजनास येण्याचें अभिवचन आपण पूर्वींच दिलें आहे, तें आज पाळलें पाहिजे. तर आतां या तीर्थावर स्नानसंध्या सारून लवकरच नैवेद्यास यावें. " विप्रवेषधारी पांडुरंगाचें हें विनम्र भाषण ऐकून ब्राम्हण खूष झाले. ते म्हणाले " महाराज, आम्ही तुमचे आश्रित आहोंत. तुम्हास आशीर्वाद द्यावा, येवढाच आमचा अधिकार. " याप्रमाणें ब्राम्हणांनीं आमंत्रणाचा स्वीकार करितांच पंढरिनाथानें राउळांत येऊन तें वर्तमान रुक्मिणीस सांगितलें. इतक्यांत ब्राम्हणही तेथें येऊन दाखल झाले. पांडुरंगानें बहुमानपूर्वक त्यांना आसनावर बसवून त्यांचें चरणतीर्थ घेतलें. त्यांच्या मस्तकीं गंध लावून, गळ्यांत तुलसीमाला घातल्या. मग जेवणाची तयारी होतांच ब्राम्हणाच्या पंक्ति बसवून पांडुरंगानें संकल्प सोडला. जेवण आटोपल्यावर मुखशुद्धि झाली. मग देवानें सर्व संतांस हांक मारून एका पंक्तीस बसविलें. बहुतेक तत्कालीन संत या सहभोजनास हजर होते. चरित्रकार म्हणतातः—

**निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान सावंता । जनमित्र पाढियंता जिवलगू १ आसंद सुदामा विसोबा खेचर । नरहरि सोनार आदिकरुनी २ बाप आर्तबंधु कृपाळू दीनाचा । अभिमान भक्तांचा न संडी कदा ३ चोखामेळा वंका भक्त वत्सरा लाडका । तो बोलाविला देखा आरोगणें ४ वैराग्याचा मेरू तो गोरा कुंभारू । आवडता डिंगरू केशवाचा ५ ऐसे थोर साने सकळ भक्तराणे । देवें**

आरोगणें बोलाविले ६ धूप आणि दीप तुळशीच्या माळा । पूजिलें सकळां देवरायें ७ तंव राही रखुमाई सत्यभामा सती । विस्तारोनी आणिती विविध बोणीं ८ भोवतीं भक्तमंडळी मध्यें वनमाळी । शोभे नभमंडळीं चंद्र जैसा ९ सकळां मुखीं कवळ देतसे निजकरें । उच्छिष्ट पीतांबरें सांवरितो १० त्या सुखाचा पारू देखोनि वैकुठीं । होती ललुमिठी सुरवरांसी ११ ऐसें तें भोजन झालें खेळेंमेळें । ब्रम्हरसें धाले सकळ भक्त १२ तंव विमानें आकाशीं दाटलीं सकळ । करिती कल्लोळ पुष्पवृष्टि १३

हा प्रकार पाहून ब्राह्मण अगदीं आश्चर्यचकित होत्साते आपापसांत बोलूं लागले, " अहो, हा मनुष्य नसून साक्षात् पंढरिनाथ असला पाहिजे. आम्ही ब्राह्मण्याच्या अभिमानानें आजपर्यंत आपलें आयुष्य व्यर्थ घालविलें आणि या संतांनीं केवळ भक्तिप्रेमाच्या बळानें या भगवंताला आकळिलें. ज्याला आपपर नाहीं, जातिकुल नाहीं, पापपुण्य नाहीं, त्याला आपण प्रायश्चित्त कसचें देणार ?

कृपेचा कोंवळा सोयरा दीनाचा । उदार मनाचा लोभापर ॥ अनुसरे त्याचें मायाजाळ तोडी । बैसणें तो मोडी संसाराचें ॥ या नामयाची माता आम्हां तुम्हां देखतां । शिणली वेवादतां नानापरी ॥ नेदी तिच्या हातीं घातला पाठीसी । धरिला जीवेंसी माझा म्हणुनी ॥ देहाचा विसरू याच्या रूपाच्या दर्शनें । चरणाचेनि स्मरणें चित्त निवे ॥ सुखगोष्टी यासी केलिया निवांत । तेणें पुरतसे अंत जन्ममरणा ॥

ब्राह्मणांचें हें भाषण ऐकून पांडुरंगानें आपल्या सत्य स्वरूपानें त्यांना दर्शन दिलें. त्या स्वरूपाचें वर्णन मूळ चरित्रकारानें फार बहारीचें केलें आहे:—

तंव दिव्य रत्नमणि मस्तकीं किरीटी । मळवट ललाटीं कस्तूरीचा १ माथां मोरपिसावेंठी कुंडलें गोमटीं । पाहात कृपादृष्टी सकळ भक्तां २ तो पुंडलिकाचा ठेवा पूर्व पुण्यराशी । वैकुंठनिवासी देवरावो ३ वदन निर्मळ भाळ सुस्मित वेल्हाळ । दर्शनीं रत्नकीळ तेज फांके ४

त्या सुखाचे अधिकारी भक्त सप्रेमळ । हृदयीं सर्वकाळ हरिचें ध्यान ५ कौस्तुभ वैजयंती पदक हृदयावरी । शोभत साजिरी तुळसीमाळा ६ श्रीवत्सलांछन प्रीतीचें भूषण । चर्चिला चंदन श्यामतनू ७ शंख चक्र करीं ते कर कटावरी । पीतांबरधारी जलदनील ८ समचरण स्वयंभ उभा विटेवरी । रुळती तोडरीं दानवदैत्य ९ तेणें दिव्य तेजें ब्रह्मांड धवळलें । प्रकाशें लोपलें दिग्मंडळ १० सकळ संत द्विज देखती चतुर्भुज । शंखचक्रांबुजगदापाणि ११ कीटक पक्षी पशु पाषाण तरुवर । देखती द्विजवर विठ्ठलरूप १२ परमानंदबोधें निवाले आनंदें । भेदाभेदद्वंद्वें विसरोनि गेलीं १३ एकाविण दुजें तेथें न दिसे पैं आन । नाहीं आठवण देहभावा १४ सबाह्य कोंदली अवघी विठ्ठलमूर्ति । सुखाची विश्रांति योगियांच्या १५ प्रेमें वोसंडत सकळ भक्तजन । देती आलिंगन एकमेकां १६ हर्षे निर्भर चित्तीं आनंदें गर्जती । पावले विश्रांति सकळ द्विज १७ ऐसा ब्रह्मानंद सोहळा भोगवी सकळां । आपुल्या प्रेमळां निजदासां १८ करोनी सावध वैकुंठींचा राणा । नामा घाली चरणांवरी त्यांच्या १९

अशा रीतीनें आपल्या साकार स्वरूपांत प्रगट होऊन पंढरिनाथ ब्राह्मणांस म्हणाला, “मला सर्वभावेंकरून शरण आलेले हे माझे सखे भक्त पहा. यांच्या उपकारांनीं मी इतका बद्ध झालों आहें कीं त्यामुळें ह्यांच्या सांगण्याबाहेर मला वागतां येत नाहीं. हे निवृत्ति, ज्ञानेश्वर आणि सोपान, सर्व संतांचे मुकुटमणि होत. हा जनमित्र नागा माझा सखासोयरा असून यानें सगळा संसार मजवरून ओंवाळून टाकला आहे. मला माझ्या प्राणापेक्षांही प्रिय असा हा सांवता माळी पहा. यानें आपल्या हातानें आपलें हृदय विदारण करून मला लपावयास जागा करून दिली. हा वत्सला नांवाचा भक्त; हा बारा दिवसांचा असतांना याच्या आईनें वेणुनादीं याचा त्याग केला. त्या दिवसापासून लोक त्याला माझा म्हणत आहेत, आणि त्यालाही माझ्यावांचून दुसरें कांहीं ठाऊक नाहीं. त्याचप्रमाणें हा विसोबा खेचर, हा नरहरि सोनार आणि हा गोरा कुंभार, हे माझे

परमभक्त नेहमीं समाधिसुखाचा उपभोग घेत असतात. हा आसंद सुदामा तर मला अगदीं मनापासून आवडतो. माझ्यासाठीं यानें घरादारावर पाणी सोडलें आणि मायाजाळ तोडून टाकलें. चोखामेळा आणि वंका हे तर माझे परमप्रिय भक्त आहेत. आणि या सर्व संतांच्या चरणरजाचा रेणु हा नामदेव. याला मी माझें सर्व भक्ति-प्रेम अर्पण केलेलें आहे." हें भगवद्भाषण ऐकून ब्राह्मण म्हणाले, "देवा, सासरीं असलेल्या मुलीला जसें माहेर दिसावें, तद्वत् तूं आज आमच्या दृष्टीस पडलास. आतां आम्हास आपल्या चरणाचा वियोग होऊं देऊं नकोस. आग लागो त्या प्रपंचाला! आम्हाला आतां धनसंपत्ति नको आणि मोक्षही नको. आम्ही आजदिवस-पर्यंत वेदशास्त्राचें पठन आणि यज्ञयागादि कर्में केवळ बहिर्मुखपणानें केलीं. धिक्कार असो त्या आमच्या ज्ञातेपणाला आणि मानसन्मानाला! तुझ्या प्रेमाची खूण आम्हांस सांपडली नाहीं. देहाभिमानाला भुलून, कुलाच्या अभिमानानें तुला अंतरलों. आणि, हे पंढरिराया, हा सगळा तुझ्याच मायेचा खेळ आहे. आमचें आयुष्य बहुतेक फुकट गेल्यासारखें झालें होतें आणि आमच्या हातून असंख्य अपराध घडले; इतकेंच नव्हे तर तुझ्याशीं देखील आम्ही विरोध केला. तरी पण शेवटीं, तूं आज आम्हास आपलें प्रत्यक्ष दर्शन देऊन आम्हां पतितांचा उद्धार करून, पतितपावन हें आपलें ब्रीद खरें केलेंस. पूर्वजन्मीं आम्ही काय पुण्य केलें होतें, तें तुझ्या कृपादृष्टीनें आज फळास येऊन, या संतांचें दर्शन आम्हांस घडलें." अशा रीतीनें ब्राह्मणांनीं भगवंतांची आणि संतांची स्तुति केली ती ऐकून तो दीनदयाळू पांडुरंग फार सतुष्ट झाला. मग त्याच्या आज्ञेनें, श्रीज्ञानदेवांनीं ब्राह्मणांस परमार्थाचा अत्यंत सुगम मार्ग विशद करून सांगितला, ते अभंग येणेंप्रमाणें:—

**कृपेच्या सागरें भक्तजनकरुणाकरें। देऊन आलिंगन करें निवविलें तयांतें १ सर्व ज्ञान्यांचा रावो आत्मा ज्ञानदेवो। सांगेल अनुभवो तुम्हाप्रती २ ते खूण अंतरीं धरा सर्व भावें। दृढ धरोनी जीवें जतन करा ३ न लगे तीर्थाटन कायाक्लेश जाण। न लगे अनुष्ठान करणें बहु ४ न लगती सायास करणें उपवास। धरावा विश्वास संतसंगें ५ न लगे वज्रासनीं बैसावें नेहटीं। न लगे गिरिकपाटीं करणें वास ६ न लगे उग्रतप नाना मंत्र जप। भेणें जाय पाप संतसंगें ७ न लगे भस्म**

उधळणें वाहणें जटाभार । न घालावा पसार लोकाचारीं ८ सर्व भूतीं करुणा जिव्हे नामस्मृति । मन येईल निवृत्ती आपेंआप ९ क्रियाकर्म धर्म प्रेमेंविण खटपटा । करितां आला वांटा दीर्घ दोषांचा १० साधनावांचुनी मार्ग सोपा जाण । करावें कीर्तन रामकृष्ण ११ सर्व काळ कथा संतांची संगती । वाचे नामकीर्ति सर्व काळ १२ तो हा राजमार्ग सर्वांहोनि चांग । सदा संतसंग वाचे नाम १३ संकल्प विकल्प न धरावे मानसीं । मनोभावें संतांसी शरण जावें १४ ज्ञानदेव म्हणे पुढती ऐका एक । सांगेन प्रत्यक्ष अनुभवसिद्ध १५

परमामृतसागरू मथुनियां पुरता । काढिला तत्त्वतां ज्ञानबोधु १ या सुखाचा पारू जाणते विरळे । घेताती गळाळे संतजन २ प्रेमाचिये तारीं वोगरू सुखामृत । हें सुख त्वरित सेवा आधीं ३ हें सुख सेवितां परमानंद धणी । कृपा संतजनीं केली पूर्ण ४ ज्ञानाचें अंजन लेइले संतजन । जनीं जनार्दन देखती सदां ५ नाहीं भिन्न भेद सर्व ब्रम्ह एक । ब्रम्हांडनायक अनंतकोटि ६ दीपांचा दीपक हृदयीं आत्मज्योति । विश्वीं विठ्ठलमूर्ति देखती सदां ७ हें सुख दिधलें भक्तांसी विश्रांति । नामाची हे ख्याति परमानंद ८ पढतां नाममंत्र ब्रह्मचि आघवें । पाहतां अनुभवें वेदमतें ९ तें हें विठ्ठलनाम वेदाचें गव्हार । जाणती साचार संतजन १० युगें अठ्ठावीस विठ्ठलनामें जपतु । हा पुंडलिक भक्तु महामुनि ११ उघडली मांदूस भक्तिभाव तारूं । विठ्ठल उदारू कलियुगीं १२ न लगती सायास करणें उपवास । विठ्ठलनामें पाश तुटती जाणा १३ आदि ब्रम्ह जुनाट जपती सिद्धमुनी । तें दिलें मंथोनि पुंडलिकें १४ केशवनाम मंत्र नामयासी सांगितलें । विस्तोरोनि केलें मथन ऐसें १५

या दोन अभंगांत, फार थोड्या शब्दांनीं, भक्तिमार्गाचें जसें सुंदर, यथार्थ आणि परिणामकारक विवेचन केलेलें आहे तसें इतरत्र केलेलें क्वचितच सांपडेल. तीर्थावळीचे हे एकंदर ५८ अभंग आहेत आणि ते सगळेच लक्ष्यपूर्वक वाचल्याशिवाय मूळ ग्रंथकाराचें हृद्गत आकलन होणें शक्य नाहीं. सुंदर काव्य या दृष्टीनेंदेखील हे अभंग फार वाचनीय आहेत. असो.

याप्रमाणें पांडुरंगानें नामदेवांस व तत्कालीन इतर संतांस, त्यांच्या जातींकडे न पाहतां, स्वतःच्या पंक्तीस बसवून आपलें भक्तप्रेम कसें व्यक्त केलें आणि शुद्ध भक्तीपुढें नुसता कर्मठपणा कसा पंगु आणि निरुपयोगी आहे ही गोष्ट पंढरींतील ब्रह्मवृंदाच्या निदर्शनास कशी आणून दिली, हें लक्ष्यांत घेतल्यास, तत्कालीन संतमंडळांत नामदेवांचें माहात्म्य फार मोठें होतें, हें ध्यानांत आल्याशिवाय रहात नाहीं. ज्या सहभोजनाचा उल्लेख वरील अभंगांत आला आहे तें सहभोजन काल्पनिक नसून, खरोखरच झालें होतें याला दुसरा स्वतंत्र पुरावा निवृत्तिनाथांच्या अभंगांत सांपडतो व त्याचा उल्लेख पूर्वीं उपोद्घातांत केलाच आहे.



## प्रकरण सहावें.

रा. मुळेकृत जुन्या नामदेवचरित्रांत पुढील दोन चमत्कार वर्णिले आहेत:—"एकदां एकादशीच्या दिवशीं मध्यरात्रीं एका वैष्णवास फार तृषा लागून तो अत्यंत व्याकुळ झाला. हें पाहून नामदेव तसल्या रात्रीं पाणी आणण्याकरितां विहीरीवर गेले, तों तेथें एक महाभयंकर, विक्राळ शरीराचा ब्रह्मराक्षस प्रगट होऊन नामदेवांस भिवविण्यासाठीं मोठमोठ्यानें गर्जना करूं लागला. त्या समयीं, नामदेवांची वृत्ति पांडुरंगमय झालेली असल्यामुळें, त्यांनीं न डगमगतां, निर्भयपणें पुढील पद तेथल्या तेथें रचून त्या ब्रह्मराक्षसाची प्रार्थना केली:—

**भले बिराजे लंबकनाथ ॥ ध्रु० ॥ धरणीं पाय स्वर्गलों माथा । योजनभरके हात ॥ १ ॥ शिवसनकादिक पार न पावे । अगनग सखा बिराजत साथ ॥ २ ॥ नामदेवके आपहि स्वामी । कीजे मोहिं सनाथ ॥ ३ ॥**

सत्पुरुषाची ही अमृतवाणी त्या ब्रह्मराक्षसाच्या कानांत पडतांच तो तत्काळ दिव्यरूप होत्साता सद्गतीस गेला."

नामदेवांसारख्या हरिभक्तास भिवविण्याचा प्रयत्न एखादा ब्रह्मराक्षस करील आणि त्याच्या तडाक्यांतून सुटण्यासाठीं "तूं शिवसनकादिकांहून श्रेष्ठ आहेस," अशी त्याची अवास्तव स्तुति नामदेवांच्या तोंडून बाहेर पडेल, या दोन्ही गोष्टी अशक्य असल्यामुळें, वरील चमत्काराची कथा निव्वळ खोटी असली पाहिजे, असें म्हणणें भाग आहे.

"पंढरपुर येथें एक सावकार रहात असे. तो आपल्या शरीराची तुला करून तें द्रव्य ब्राह्मणांस व इतर याचकांस देत असतां, त्याच्या मनांत असा विचार आला कीं नामदेव हा भगवद्भक्त असून, दरिद्री व कुटुंबवत्सल असल्यामुळें, त्यासही यांतील कांहीं द्रव्य द्यावें. मग, त्याप्रमाणें त्यानें नामदेवांस बोलावून, आपला हेतु त्यांस कळविला. तेव्हां नामदेव त्यास म्हणाले, शेटजी, आपणाजवळ पुष्कळ द्रव्य आहे म्हणून आपण हें तुलादान करीत आहांत व मजसारख्या निर्धन मनुष्याचें आपण स्मरण केलें हेंही आपल्या थोरपणास उचित आहे. परंतु मी भिक्षुक नसल्यामुळें मला या तुलादानाचा भाग घेण्याची इच्छा नाहीं. शिवाय श्रीविठ्ठलकृपेनें आम्हाजवळ असें कांहीं अलौकिक द्रव्य आहे कीं

त्याच्यापुढें आपली ही संपत्ति कांहींच नाहीं. हें ऐकून सावकार म्हणाला, असें कसें होईल ? नामदेव म्हणाले, चला, आपण तुमच्या आणि आमच्या संपत्तीची तुलना करूं. बरें आहे असें म्हणून सावकारानें आपली कांहीं संपत्ति एका पारड्यांत घातली व दुसऱ्या पारड्यांत नामदेवांची काय संपत्ति असेल ती घालण्यास त्यांस सांगितलें. त्या वेळीं नामदेवानीं एका तुलसीपत्रावर रामनामाचें पहिलें अक्षर ‘ रा ’ हें लिहून तें तुलसीपत्र दुसऱ्या पारड्यांत ठेविलें. तेव्हां तुलसीपत्राचें पारडें खालीं जाऊन, सावकाराच्या संपत्तीचें पारडें वर गेलें. तेव्हां सावकारानें होतें नव्हतें तेवढें सगळें द्रव्य आणून पारड्यांत घातलें, परंतु तुलसीदलाचें पारडें अणुमात्रही वर उचललें नाहीं. शेवटीं सावकारानें आपल्या दानधर्माचें, तीर्थयात्रेचें वगैरे सगळें पुण्य त्या पारड्यांत घातलें. तरी पारडें खालीं येईना. तेव्हां तो सावकार अत्यंत चकित होत्साता नामदेवांस शरण गेला आणि त्यांच्या कृपेनें व समागमानें कृतकृत्य होऊन शेवटीं सद्गति पावला. ”

( नाभाजीकृत भक्तमाल, छप्पई ४३ ).

ज्या तत्कालीन अनेक संतांच्या समागमाचा लाभ नामदेवांस नित्य होत होता, त्यांपैकीं निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं चार भावंडें व त्यांचे शिष्य चांगदेव यांच्या समाधींचे काल आतां जवळ येत चालले होते. या पांचही व्यक्तींच्या समाधींचा महिमा नामदेवी गाथ्यांतील २२५ अभंगांत वर्णिलेला असून, त्या सर्व अभंगांच्या शेवटीं ‘ नामा म्हणे ’ या शब्दांनीं नामदेवांचा उल्लेख केलेला आहे. अर्थात् हे सर्व अभंग खुद्द नामदेवकृतच असले पाहिजेत हें उघड आहे. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई आणि चांगदेव यांच्या समाधीची माहिती या नामदेवचरित्रांत दिली तर सकृद्दर्शनीं ती अस्थानीं वाटण्याचा संभव आहे, परंतु या पांचही व्यक्तींशीं नामदेवांचा जिव्हाळ्याचा संबंध असून, त्यांच्या समाधिकालीं ते स्वतः हजर होते, यामुळें ती माहिती संक्षेपरूपानें तरी येथें देणें अवश्य आहे.

एके दिवशीं ज्ञानेश्वरमहाराज विठोबापुढें हात जोडून उभे राहिले आणि म्हणाले, देवा, ज्या कार्यासाठीं मी जन्म घेतला, तें कार्य आतां पुरें झालेलें आहे. म्हणून मला आतां समाधि घेण्याची परवानगी असावी. यावर पांडुरंग म्हणाला, ज्ञानोबा, तुला नेहमींच समाधि आहे. परंतु बाह्य समाधि घेण्यासाठीं तूं आतां प्रस्थान ठेव. त्याप्रमाणें ज्ञानदेवांनीं दशमीस प्रस्थान ठेवून, एकादशीचे दिवशीं जागर व द्वादशीस खिरापतीचा महोत्सव केला. त्रयोदशी दिवशीं विठ्ठलानें त्यांस सांगितलें, ज्ञानोबा, तुझी समाधि अलंकापुरीं ( आळंदीस ) व्हावयाची आहे, तरी तिकडे जाण्याची तयारी कर. ज्ञानदेव

समाधि घेणार हें वर्तमान ऐकतांच सर्व संतांस मोठा खेद झाला; व ते ज्ञानदेवांबरोबर आळंदीस जाण्यास निघाले. पंढरिनाथानें ज्ञानोबांस सांगितलें, पुण्यभूमी आळंदी येथें तुझी समाधि स्थिर राहील व प्रत्येक कृष्णपक्षांत मी तुला भेट देत जाईन. कार्तिक शुद्ध एकादशीस पंढरीची यात्रा झाल्यावर वद्य एकादशीस आळंदी येथें तुझ्या समाधीपाशीं यात्रा भरत जाईल. हें ऐकून सर्व संतांनीं जयजयकार केला.

सर्व मंडळी आळंदीस आल्यावर भगवदाज्ञेनें ज्ञानेश्वर महाराज अजानवृक्षाजवळ समाधीस बसले.

**कृपा आली विठ्ठलासी। म्हणे ज्ञानदेवा परियेसीं। तीर्थ भागीरथी अहर्निशीं। तुज नित्य स्नानासी दिधली॥ इंद्रायणी दक्षिणवाहिनी। भागीरथी मणिकर्णिका दोन्ही। इया मिळालिया त्रिसंगमीं। पुण्यभूमी तूझिये॥ येथें जरी नित्य स्नान घडे। तरी नित्य वैकुंठवास जोडे। तुज नाहीं नाहीं कुवाडें। मी कोडें उभा असें॥ येथें हरिकथा नाम वाचे। जो उच्चारील विठ्ठलाचें। तयासि पेणें वैकुठींचें। दिधलें साचें अक्षयी॥ आणिक ऐकें रे ज्ञानराजा। जो या सिद्धेश्वरीं करी पूजा। तो अंतरंग पैं माझा। मुक्ति सहजा जाहली त्यासी॥**

मग पांडुरंगानें आपल्या कोमल करांनीं ज्ञानेश्वरमहाराजांस कुरवाळलें व कूर्मदृष्टीनें अवलोकन केलें. तेव्हां ज्ञानदेवांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. नंतर ज्ञानदेवांनीं स्नान करून नाममंत्राच्या आवृत्त्या केल्या, व प्रत्यक्ष विठ्ठलमूर्तीचें पूजन केलें. मग देवासह सर्व संतमंडळी इंद्रायणीच्या कांठीं बसली. तेव्हां नामदेवांचा पुत्र नारा हा पुढें येऊन नामदेवांस म्हणाला, " बाबा, हें क्षेत्र कोणतें आणि याचा महिमा काय हें पांडुरंगास तुम्ही विचारावें. " मग नामदेवांच्या विनंतीवरून पांडुरंगानें आळंदी क्षेत्रमहिमा सर्व संतांस सांगितला. ज्ञानदेवांसारखा ज्ञाननिधि आतां आपणास कायमचा सोडून जाणार या विचारानें नामदेवादि सर्व संतांस मोठी हुरहुर लागून राहिली होती. विशेषतः नामदेव तर फारच शोकाकुल झाले, तेव्हां त्यांस चार उपदेशाच्या गोष्टी सांगून पांडुरंगानें त्यांचें समाधान केलें. नंतर टाळमृदंगाच्या व हरिनामाच्या गजरांत, प्रत्यक्ष पंढरिनाथादेखत ज्ञानदेवमहाराजांनीं इंद्रायणीतीरीं समाधि घेतली. यांच्या वियोगानें सर्व संतमंडळीस तर काय पण खुद्द पांडुरंगासही मोठें दुःख झालें:—

क्षणक्षणा पंढरिनाथ । नामयाचा धरूनि हात ।
ज्ञानदेवासी आठवीत । कंठ सद्गदित होऊनि ॥
उद्धवासी ह्मणे पांडुरंग । या सज्जनाचा न व्हावा
वियोग । हें हृदय होतसे दोन भाग । सखे अंतरंग
तुम्ही माझे ॥ मज याहूनि गोड न वाटे । ऐसा जिवलग न
भेटे । समूळ जीवाचें दुःख आटे । संतोष वाटे मानसीं ॥

ज्ञानदेवमहाराजांच्या समाधिकालीं त्यांच्या भांवडांच्या मनाची स्थिति कशी करुणास्पद झाली होती, याचें अत्यंत हृदयद्रावक चित्र नामदेवांनीं पुढील अभंगांत रेखाटलें आहेः—

निवृत्ति सोपान मुक्ताई धाकुटी । धरियेलीं कंठीं पांडु-
रंगें ॥ कळवळिलीं मनीं करिती दीर्घ ध्वनी । आठविती
मनीं ज्ञानदेव ॥ विकळ झालें चित्त संत हे दुश्चित ।
नामा विकळ तेथ होत असे ॥ फार आठवतें निवृत्तीचे
चित्तीं । सोपान स्फुंदती मुक्ताबाई ॥ आम्हा माता
पिता नित्य ज्ञानेश्वर ॥ नाहीं आतां थार विश्रांतीसी ॥
छळिलें ब्राह्मणीं प्रतिष्ठानीं जातां । रेड्यामुखीं वेदांता
बोलविलें ॥ आला चांगदेव व्याघ्र वाहन घेउन ।
नेला अभिमान ज्ञानदेवें ॥ नाना प्रकारचे आठविती
शब्द । नामा म्हणे बोध भाविकाला ॥

या समाधीच्या वेळीं नामदेवांचे चारी मुलगे आपल्या बापाबरोबर आळंदीस आले होते व समाधीची जागा सारविणें वगैरे कामावर त्यांची योजना करण्यांत आली होतीः—

नारा विठा गोंदा महादा पाठविला । झाडविली जागा
समाधीची ॥ हरिदिनीं जागर केला निशिदीनीं । उद-
यिक पारणीं द्वादशीचीं ॥ गंगा गिरजा राही रुकमाबाई
भामा । उठिल्या रांधण्या पारण्याच्या ॥ नाना प्रका-
रचे पाक ते अपार । मुनि ऋषीश्वर बोलाविले ॥
वैष्णव देव आणि आले सुरगण । करोनियां स्नान
इंद्रायणीं ॥ पिंपळाचे पारीं बैसाविल्या पंक्ति । पात्रें तीं
श्रीपति वाढूं लागे ॥ नामा म्हणे देवा करणें साहि-
त्यासी । येतो कासाविसी प्राण माझा ॥

असो. या प्रसंगीं निवृत्ति, सोपान, मुक्ताबाई, नामदेव, नारा, महादा, गोंदा, विठा, विसोबा खेचर, चांगदेव, सांवता माळी, गोरा कुंभार इत्यादि संत हजर होते. ज्ञानदेव समाधिस्थ झाल्यावर, नामदेवांच्या मनास अशी तळमळ लागून राहिली कीं त्यांस रात्रंदिवस बिलकुल चैन पडेना. ' ज्ञानदेवांची व माझी भेट करून दे ' असा पांडुरंगापाशीं त्यानीं हट्ट घेतला व शेवटीं, तो त्यांचा हट्ट पंढरिनाथास पुरवावा लागला:—

**नामा म्हणे देवा ज्ञानदेव सृष्टी । पडेल कां दृष्टी पुनः आतां ॥ ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग । भेटीचा प्रयोग करा देवा ॥ ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं । जीव तळमळी त्याच्यावीण ॥ संत अंतरला सखा झाला दूर । आतां पंढरपुर कैसें करूं ॥ तुमचें दर्शन ज्ञानकृपादान । पंढरीस येणें याचसाठीं ॥**

**ज्ञानदेव पहावा डोळां । ऐसें वाटतें विठ्ठला ॥ जगजेठी जगत्पाळ । माझी पुरवावी आळ ॥ तुम्हा काय अवघड । लीळें झेला गिरीगड ॥ कल्पतरू तळीं वास । त्या घडे कां उपवास ॥ माझ्या कृपाळुवा देवा हांकेसरसा घेसी धांवा ॥**

**ज्ञानदेव माझें सौख्यसरोवर । त्यांत जलचर स्वस्थ होतों ॥ दुर्दैवतापानें आटलें तें नीर । वर्षी रघुवीर कृपामेघ ॥ ज्ञानदेवावीण व्याकुळ हे प्राण । तूं जगज्जीवन देवा होसी ॥ विठाबाई तूं ग जाणसीना जाण । रक्षी मज कोण दुजें येथें ॥**

**नामा हें वदतां डोळयां आलें पाणी । पडिला धरणी देवापुढें ॥ नामदेवस्थिति पाहून श्रीपति । विस्मित ते चित्तीं स्तब्ध झाले ॥ कैशा रीतीं नाम्या संबोखूं मी आतां । कठीण अवस्था देव म्हणे ॥ प्रेम उंचबळे ऐकतां ही आळ । बुझावी गोपाळ नाम्यालागीं ॥**

**देव म्हणे नाम्या पाहें । ज्ञानदेव मीच आहे ॥**
**तो आणि मी नाहीं दुजा । ज्ञानदेव आत्मा माझा ॥**
**माझ्या ठायीं ठेवीं हेत । सोड खंत खंडीं द्वैत ॥**
**नाम्या उमज मानसीं । ऐसें म्हणे हृषीकेशी ॥**

या अभंगांवरून ज्ञानदेव आणि नामदेव यांचा प्रेमसंबंध किती जिव्हाळ्याचा होता व तत्कालीन सर्व संतांचे मुकुटमणि ज्ञानदेव महाराज हे समाधिस्थ झाल्यावर सगळ्या महाराष्ट्रावर उदासीनतेची छाया कशी पसरली होती, याचें स्पष्ट दिग्दर्शन होत आहे. असो. यानंतर क्रमानें, सोपानदेवानीं सासवड येथें, चांगदेवानीं पुणतांबें येथें, मुक्ताबाईनें तापीतीरीं व निवृत्तिनाथानीं त्र्यंबकेश्वरीं समाधि घेतली व त्या सर्व प्रसंगीं नामदेव हे इतर सर्व संतांसह त्या त्या स्थळीं हजर होते असें या समाधींच्या अभंगांवरून दिसतें. वरील चार भांवडांविषयीं नामदेव म्हणतातः—

**गेले दिगंबर ईश्वरविभूति । राहिल्या त्या कीर्ति जगामाजी ॥ वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं । आतां ऐसें कोणी होणें नाहीं ॥ सांगतील ज्ञान म्हणतील खूण । नयेचि साधन निवृत्तीचें ॥ परब्रम्ह डोळां दावूं ऐसें म्हणती । कोणा नये युक्ति ज्ञानोबाची ॥ करितील अर्थ सांगतील परमार्थ । नये पां एकांत सोपानाचा ॥ नामा म्हणे देवा सांगूनियां कांहीं । नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥**

नामदेवकृत समाधींचे हे सर्वच अभंग फार सुंदर आहेत. ज्ञानदेवांसारख्या ज्ञानी पुरुषांच्या समाधीचें नामदेवांसारख्या प्रेमळ भक्तानें केलेलें हें वर्णन म्हणजे जुन्या मराठी वाङ्मयोदधींतील एक अमूल्य रत्न आहे. हे सर्व अभंग भक्ति, प्रेम आणि करुण या रसांनीं पूर्णपणें ओथंबलेले आहेत. म्हणून श्रद्धाशील भाविक रसिकांनीं नामदेवी गाथ्यांतले हे सर्व अभंग एकदां तरी लक्ष्यपूर्वक वाचावे अशी माझी आग्रहाची विनंति आहे.

नामदेवांचा समाधिकाल जुन्या ग्रंथांतून शके १२७२ आषाढ वद्य त्रयोदशी हा दिलेला आहे; म्हणजे शके १२१८ त झालेल्या ज्ञानदेवांच्या समाधीनंतर नामदेव हे ५४ वर्षें हयात होते. इतक्या दीर्घकालांतील त्यांच्या चरित्राची म्हणण्यासारखी मह-

त्वाची माहिती मुळींच उपलब्ध नाहीं. मागें वर्णिलेल्या त्यांच्या कांहीं गोष्टी कदाचित् याच कालांत घडल्या असतील. नामदेवांचा हा ५४ वर्षांचा काल भागवतधर्माचा प्रसार आणि काव्यरचना यांत गेला असला पाहिजे. त्यांच्या आयुष्याच्या अखेरीस दक्षिणेंत मुसलमानाचा प्रवेश झाला होता. नामदेव व त्यांच्या कुटुंबांतील मंडळी यांच्या निर्याणाविषयीं नामदेवी गाथ्यांत, नामदेवांची सून लाडाई हिच्या नांवावर पुढील अभंग सांपडतोः—

**पूर्वसंबंधें मज दिधलें बापानें। शेखीं काय जाणें कैसें झालें ॥ १ ॥ प्रसूतीलागीं मज आणिलें कल्याणा। अंतरला राणा पंढरीचा ॥ २ ॥ मुकुंदें मजसी थोर केला गोंवा। लोटियलें भवानदीमाजी ॥ ३ ॥ ऐकिला वृत्तांत सर्व झाले गुप्त। माझेंचि संचित खोटें कैसें ॥ ४ ॥ द्वादश बाहात्तरीं कृष्ण त्रयोदशी। आषाढ हे मासीं देवद्वारीं ॥ ५ ॥ सर्वांनीं हा देह अर्पिला विठ्ठलीं। मज कां ठेविलें पापिणीसी ॥ ६ ॥ लाडाई म्हणे देह अर्पीन विठ्ठला। म्हणोनि आदरिला प्राणायाम ॥ ७ ॥**

हा अभंग क्षेपक नसून लाडाईचाच आहे असें मानिल्यास, नामदेवांच्या अंतकालीं त्यांचे आईबाप हयात होते असें म्हणणें भाग आहे. परंतु मला ही गोष्ट शक्य वाटत नाहीं. नामदेवचरित्रविषयक अभंगांत पुढें पुढें दामशेटी व गोणाई यांचा उल्लेख कोठेंही आढळत नाहीं, यावरून तीं दोघेंही नामदेवांच्या मृत्यूपूर्वी कांहीं वर्षे अगोदरच मरण पावलीं असावींत असें मला वाटतें. लाडाईशिवाय, नामदेवांच्या कुटुंबांतील सर्व मंडळीनें, शके १२७२ आषाढ वद्य १३ रोजीं पंढरपूर येथें महाद्वारीं एकदम समाधि घेतली ही आख्यायिका विश्वसनीय मानण्यास कोणताही पुरावा उपलब्ध नाहीं; आणि कदाचित् आपल्या इच्छाशक्तीच्या जोरावर किंवा प्रायोपवेशन करून त्या सर्वांनीं एकसमयावच्छेदेंकरून देह ठेवले असें जरी मानिलें तरी या ब्राह्मणेतर मंडळीस त्या वेळच्या कर्मठ ब्राह्मण बडव्यांनीं पांडुरंगाच्या देवालयाजवळ असला प्रकार करूं दिला असेल किंवा नामदेवांस तेथें समाधि घेऊं दिली असेल, ही जवळ जवळ अशक्य कोटींतील गोष्ट आहे. आज या सुधारलेल्या विसाव्या शतकांत देखील पंढरपुरचे जे बडवे, कोणत्याही ब्राह्मणेतरास महाद्वारीं समाधि घेऊं देणार नाहींत, त्या बडव्यांच्या सहाशें वर्षांपूर्वींच्या धर्मवेड्या पूर्वजांनीं, समाधि घेण्याचा अधिकार नसलेल्या

ब्राह्मणेतर नामदेवांस तेथें समाधि घेऊं दिली, ही गोष्ट खरी कशी मानतां येईल ? शिवाय, नामदेवांच्या कुटुंबांतील सर्व माणसें एकाच सालीं, एकाच दिवशीं, एकाच वेळीं मृत्यु पावलीं नाहींत हें सिद्ध करण्यास, नामदेवांचे पुत्र नारा, म्हादा, गोंदा व विठा यांच्या अभंगांत भरपूर पुरावा मिळण्यासारखा आहे. **विठाचे** पुढील अभंग पहाः—

**पूर्व जन्मीं आराधितां । तुझें वर्म आलें आमुच्या हाता ।**
**नामदेवें सांगितलें जातां । तें सर्वथा देइजे ॥ १ ॥**
**आमुचे वडिलीं गा जोडिलें । तें तुझे पायीं गा ठेविलें ।**
**गौप्य करितां नोहे गा भलें । दे उगलें गा दातारा ॥२॥**
**आमुचें आम्हांसि गा देतां । कां बा नये तुझ्या चित्ता ।**
**गाऱ्हाणें देईन संतां । चौघां देखतां घेईन ॥ ३ ॥**
**तुझा दारवंटा राखेन हरी । तुज रिघों नेदीं बाहेरी ।**
**मोकलिसी अधांतरीं । तरी हे लाज कवणातें ॥ ४ ॥**
**आणिक कांहीं न मागें तूतें । सेवावृत्ति द्यावी मातें ।**
**मज निरवावें संतातें । आपुला दास म्हणेन ॥ ५ ॥**
**नामयाचा विठा म्हणे । यांत कांहीं करिसी उणें । तरी**
**आमुच्या वडिलांचे निरूपणें । बांधलासी गा विठ्ठला॥६॥**

**आमुचा नामा तुज गेला निरवुनी । मी तुजवांचोनी नेणें कवणा ॥ १ ॥ काया वाचा मनें जोडिलें जें बापें । तें दिधलें तुजपें ठेवावया ॥ २ ॥ तें दे गा आमुचें नको करूं विचारू । नामा तुझा डिंगरू त्याचे आम्ही ॥ ३ ॥ जुनें नाणें आमुच्या वडिलांचें ठेवणें । बहुतां कष्टीं तेणें जोडियेलें ॥ ४ ॥ तें आम्हांलागोनी ठेविलें तुझ्या पायीं । आमुचें आम्हा देई केशीराजा ॥ ५ ॥ तूं अनाथा कोंवसा दीनाचा कृपाळू । तरी आमुचा सांभाळू करिं कां वेगें ॥६॥ आमुचे संचितार्थ आह्मांसी देऊनि । यश घे त्रिभुवनीं म्हणे विठा ॥ ७ ॥**

वरील अभंगांतील, “ **नामदेवें जातां सांगितलें** ” ( अंतकाळीं नामदेवांनीं सांगितलें ) व “ **नामा तुज गेला निरवुनी** ” ( निरोप घेऊन नामदेव गेले )

या वाक्यांवरून, नामदेवांच्या मृत्यूनंतर विठा वगैरे त्यांचे पुत्र पुष्कळ वर्षें हयात होते हें उघड सिद्ध होत आहे. असो.

याप्रमाणें आपलें अवतारकृत्य ८० वर्षांच्या हयातींत पूर्ण करून, नामदेव महाराजांनीं शके १२७२ आषाढ वद्य १३ या दिवशीं देह ठेविला. या संबंधानें, नामदेवांचे शिष्य **परिसा भागवत** यांच्या नांवावर पुढील अभंग प्रसिद्ध आहे:—

**आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठ्ठलासी ।**
**आज्ञा द्यावी हो मजसी । समाधि विश्रांतीलागीं ॥१॥**
**आयुष्य कळसासी आलें । अभंग त्वां सिद्धी नेले ।**
**ज्ञानेश्वरसंगतीं घडले । तीर्थमिषें जगदुद्धार ॥ २ ॥**
**जन्मा आलियाचें कृत्य । जन लावावे सुपंथें । विठ्ठल**
**मंत्र त्रिभुवनांत । जग जाणत महिमा हे ॥ ३ ॥ सर्व**
**सिद्ध मनोरथ । तुझे कृपेनें समस्त । ह्मणे परिसा**
**भागवत । नामा नाम जपतसे ॥ ४ ॥**

नामदेवमहाराजांचें आयुष्य संपल्यावर, नैसर्गिक रीतीनें त्यांचें निर्याण झालें असावें व त्यांच्या शवाचें दहन केल्यावर त्यांच्या अस्थी, त्यांच्या इच्छेप्रमाणें, महाद्वारीं आणून पुरण्यांत आल्या असाव्या. व त्यांजवर एक पायरी बांधण्यांत आली असावी. पंढरपुर येथें नामदेवांची ही पायरी प्रसिद्धच आहे. संतांचे चरणरज आपल्या मस्तकीं पडावे या उदात्त हेतूनें ही योजना नामदेवानीं करून ठेवली, परंतु त्यांचा हा हेतु मात्र सफल झाला नाहीं! कारण, त्यांच्यासारख्या परमवंद्य सत्पुरुषाच्या पायरीस पदस्पर्श करण्याचा कोणाचा अधिकार आहे?[1]

नामदेवांच्या अस्थी महाद्वारीं पुरून त्यांजवर पायरी बांधण्यांत आली असावा हा केवळ माझा तर्क आहे. परंतु, प्रचलित दंतकथेप्रमाणें, त्या पायरीखालींच नामदेवांनीं समाधि घेतली, ही गोष्ट भरपूर पुराव्यानें जर उद्यां कोणी सिद्ध करून दाखविली तर ती मोठ्या आनंदानें मान्य करीन. नामदेवांनीं महाद्वारीं समाधि घेतली व त्या समाधीवर पायरी बांधण्यांत आली या गोष्टीचा उल्लेख पुढील अभंगांत सांपडतो:—

---

१ या स्थानाच्या मालकीहक्काविषयीं, नामदेवज्ञातीचे लोक व पंढरपुरचे बडवे यांच्या दरम्यान हल्लीं वाद सुरू असून तो कोर्टांत गेला आहे!

महाद्वारीं सुख असे या सुखाचें। लागती संतांचे चरणरज ॥ १ ॥ म्हणोनियां स्थळ पाहिलें निवांत। झालें तेथें चित्त समाधान ॥ २ ॥ वैष्णवांसहित बोळवण करा। तुम्ही हो दातारा मजलागीं ॥ ३ ॥ देव म्हणे नाम्या राहीं क्षणभरी। पुरतील अंतरीं कोड तुझे ॥ ४ ॥

वैकुंठासी आम्हा नको धाडूं हरी। वास दे पंढरीं सर्व काळ ॥१॥ वैकुंठ खोपट जुनाट झोंपडी। नको आडा-आडी घालूं आम्हा ॥ २ ॥ वैकुंठीं जाऊनि काय बा करावें। उगेंचि बैसावें मौनरूपी ॥ ३ ॥ नामा म्हणे मज येथोंचि हो ठेवीं। वास सदा देईं चरणांजवळी ॥४॥

देह आहे तोंवरी करा रे धांवणी। शरण चक्रपाणी रिघा वेगीं ॥ १ ॥ लटिके इष्टमित्र बंधु आणि सखे। जाणावे पारखे अवघे चोर ॥ २ ॥ लावूनियां मोह संसारीं गोंविती। अंतकाळीं होती पाठिमोरे ॥ ३ ॥ ऐसियांचा जरी मानाल भरंवसा। कोण यमफांसा चुकवील ॥ ४ ॥ मरोनि जन्मावें पंढरीचे पारीं। व्हावें महाद्वारीं कृमि कीटक ॥ ५ ॥ संतचरणरज लागे येतां जातां। नामा म्हणे आतां हेंचि व्हावें ॥ ६ ॥

वतन आमुचें मिरास पंढरी। विठोबाचे घरीं नांदणूक ॥ १ ॥ सेवा करूं तेथें नित्य महाद्वारीं। नामाची उजरी जागवून ॥ २ ॥ साधुसंतां शरण जाऊं जीवें भावें। प्रसाद स्वभावें देती घेती ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे। संत पाय हिरे वरी देती ॥ ४ ॥

वैष्णवांचा थाट पताकांचे भार। करिती जयजयकार महाघोष ॥१॥ पुष्पांचा वर्षाव सुमनाची दाटी। नामघोष

**सृष्टीं न समाये ॥ २ ॥ ऋषिगण गंधर्व इंद्र प्रजापति । धन्य धन्य म्हणती नामयासी ॥ ३ ॥ तूं देव वश केला सेवाऋणें । अनन्य अनन्य भक्ति तुझी ॥ ४ ॥ अलकापुरीं ज्ञानिया इंद्रनीळ सोपान । निवृत्तीसी जाण त्र्यंबकेश्वरीं ॥ ५ ॥ नामा महाद्वारीं श्रेष्ठ हे पंढरी । प्रत्यक्ष भूमीवरी वैकुंठ हें ॥ ६ ॥ देवें नामयासी ओटीसी धरिलें । नेत्रोदकें क्षाळिलें सर्व अंग ॥ ७ ॥ जन्मोनी सार्थक तुवां बरें केलें । वनीं मोकलिलें मजलागीं ॥८॥ राही रखुमाई सत्यभामा प्रभृति । नामा आलिंगिती प्रीतिकरुनी ॥९॥ धन्य दिन सुखाचा वेदघोष विप्रांचा । वैष्णवीं नामाचा घोष केला ॥ १० ॥ तेथें पुनस्कार परशियानें केली । हृदयीं धरिलीं चरणकमळें ॥ ११ ॥**

या शेवटच्या **परिसा भागवत** यांच्या अभंगांत महाद्वारींच्या एकट्या नामदेवांच्याच समाधीचा उल्लेख आहे, त्यांच्या कुटुंबांतील मंडळीच्या समाधींचा उल्लेख नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे.

'नामदेवचरित्र' कर्ते रा. मुळे यांनीं हें नामदेवांच्या समाधीचें प्रकरण आपल्या ग्रंथांत फार विस्तारानें दिलें आहे, त्यांतला मुद्द्याचा भाग येथें देऊन हें प्रकरण पुरें करूं. "याप्रमाणें देवाची व संतांची प्रार्थना करून श्रीनामदेव महाराज समाधिस्थ होण्याकरितां पायरीखालीं शिरूं लागतात, इतक्यांत त्यांचे वडील दामशेटी, मातुश्री गोणाबाई, भार्या राजाबाई, नारोबा आदिकरून पुत्र व त्यांच्या बायका, बहीण आऊबाई, व दासी जनाबाई हे सर्व येऊन त्यांनीं एकाएकीं मोठा हंबरडा फोडला आणि रडत रडत ते सर्वजण म्हणाले कीं, नामदेवा, आमच्या अगोदर तूंच कसा समाधि घेतोस ? आधीं आमची व्यवस्था कर, नंतर तूं समाधि घे. त्यांत दामशेटी आणि गोणाबाई यांनीं तर फारच आकांत केला. तीं म्हणालीं, नामदेवा, तूं लहानपणीं देवाची व आमची भेट करून दिलीस व जेव्हां जेव्हां कांहीं संकट येत होतें तेव्हां तेव्हां तुझ्या प्रेमामुळें देव आम्हाला संकटांतून मुक्त करीत होते. आतां तूं समाधिस्थ झाल्यावर आमची दाद देव घेणार नाहींत आणि लौकिक दृष्टीनें पाहिलें असतां आईबापानीं मरावें व पुत्रांनीं मागें रहावें हेंच योग्य आहे. तर आमची व्यवस्था करून मग काय करणें तें कर. नंतर राजाई म्हणाली,

महाराज, दारिद्र्याच्या संबंधानें मी आपणास कांहीं वाईट शब्द बोललें त्यामुळें आपण मनांत राग धरून मला सोडून जातां काय ? तर असें न करितां आपल्या हातानें माझी व्यवस्था करून मग आपण काय करणें तें करावें. कारण स्त्रियांला पतीवांचून दुसरी गतीच नाहीं. याप्रमाणेंच दुसऱ्या मंडळीनींही आमची व्यवस्था अगोदर करून काय करणें तें करावें असा आग्रह केला. मग नामदेवांस मोठें संकट पडून त्यांनी देवाचे मुखाकडे पाहिलें आणि ते म्हणाले कीं, देवा, या विघ्नास आतां काय करावें ? हीं माणसें कांहीं माझें ऐकणार नाहींत, याकरितां यांची कांहीं व्यवस्था करा. मग देवानीं सांगितलें कीं या सर्वांस तुजबरोबरच समाधि देतों, भिऊं नकोस. मग भगवंतानीं त्या सर्वांस अशी आज्ञा केली कीं, तुम्ही सर्व जण जेथें नामदेव समाधिस्थ होतो आहे त्याच ठिकाणीं त्याचे सभोंवतीं समाधिस्थ व्हा. असें देवाचें भाषण ऐकून दामशेटी आदिकरून सर्वांस मोठा आनंद झाला व ते सर्वजण आणि श्रीनामदेव महाराज संतांस व श्रीविठ्ठलास साष्टांग नमस्कार करून मुखानें ‘ श्रीविठ्ठल श्रीविठ्ठल ’ असा नामाचा गजर करीत महाद्वाराच्या पायरीखालीं गमन करिते झाले. तेथें अगोदरच विश्वकर्म्यानें श्रीपांडुरंग यांचे आज्ञेवरून कांहीं दर्भाचीं, कांहीं कंबलाचीं व कांहीं कृष्णाजिनाचीं आसनें घालून ठेविलीं होतीं. व त्याचप्रमाणें तेथें अखंड प्रकाश असावा म्हणून पांच रत्नदीपही लावले होते. मध्यभागचे आसनावर श्रीनामदेव हे बसले होते व बाकीची मंडळी सभोंवतीं बसली. सर्वांनीं केलेल्या अभंगांच्या वह्या* श्रीनामदेव यांच्या अग्रभागीं होत्या. श्रीपांडुरंग हे एकटेच आंत गेले होते. तेथें श्रीनामदेवादि समस्त मंडळीनीं श्रीपांडुरंग यांची पूजा करून पायांवर डोकें ठेविलें. तेव्हां देवानीं, “ तुम्ही नासाग्रीं दृष्टि ठेवून माझे स्वरूपीं लक्ष ठेवा व तुमचा जयजयकार असो.” असा आशीर्वाद देऊन ते बाहेर आले. नंतर बाहेर येऊन पायरीच्या तोंडीं मोठा चिरा स्वहस्तांनीं बसवून रस्ता बंद केला. ”

वरील वृत्तांत घडल्यावर, नामदेवांची सून **लाडाई** हिनेंहि आपला लहान मुलगा ‘ **मुकुंद** ’ यास पांडुरंगाचे हवालीं करून, देहत्याग केला !

याप्रमाणें नामदेव महाराजांनीं शिंप्याच्या कुळीं जन्म घेऊन, निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान, मुक्ताबाई, गोरा कुंभार, जनी, विसोबा खेचर, परिसा भागवत, चांगदेव

---

* यांपैकीं कांहीं अभंगांच्या वह्या श्रीक्षेत्र **पंढरपुर** येथील **केशवराज**-मंदिराचे तळघरांत आहेत. ( **मुळे** ).

वगैरे संतांच्या सहकारितेनें पंढरपुरांत व महाराष्ट्रांत भागवत धर्माचा प्रसार केला; पंतांनीं म्हटल्याप्रमाणें, पांडुरंगाचें 'विठ्ठल' हें नांव प्रसिद्ध केलें व हजारों प्रेमळ अभंग लिहून सामान्य जनतेंत पारमार्थिक जागृति करून, आपलें नांव अजरामर करून ठेविलें. महाराष्ट्रांत आज सहाशें वर्षें त्यांच्या पवित्र नामाचा घोष सारखा होत आला आहे व पुढेंही अनंत कालपर्यंत तो होत राहील. सर्वसामान्य जनतेंत भक्तिमार्गाचा प्रसार करणारे पहिले संत नामदेव महाराजच होत. या भागवत धर्म-मंदिराचा पाया* महाराष्ट्र जनतेच्या मनोभूमिकेवर ज्ञानदेवांनींच घातला याविषयीं जरी मतभेद नाहीं तरी त्यांच्या सुसंस्कृत आणि उपमालंकारप्रचुर प्रौढ कवितेपेक्षां नामदेवांची साधी व सुलभ कवितांच भागवत धर्माचीं तत्त्वें सामान्य जनतेच्या मनावर ठसविण्यास व पंढरपुर आणि पांडुरंग यांचें माहात्म्य वाढविण्यास अधिक कारणीभूत झाली असली पाहिजे यांत संशय नाहीं. "धर्मस्थापनेचें नर । ते ईश्वराचे अवतार । मागें झाले पुढें होणार । देणें ईश्वराचें" हे उद्गार श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं ज्या पुरुषांविषयीं काढले आहेत त्यांत नामदेव महाराजांची गणना प्रमुखत्वानें केली पाहिजे. महाराष्ट्रीयांच्या सुदैवानें असले अनेक अवतारी पुरुष महाराष्ट्रांत आजपर्यंत होऊन गेलेले आहेत व पुढेंही होणार आहेत. हिंदूंची परंपराच अशी आहे कीं, ते आपल्यांतल्या राज्यकर्त्या पुरुषांस आणि वीरांस एक वेळ विसरतील, परंतु संतांस कधींही विसरणार नाहींत; आणि ह्या त्यांच्या प्रवृत्तीमुळेंच, त्यांनीं जरी आपलीं राज्यें घालविलीं, तरी हा कालपावेतों आपला धर्म कसा बसा राखून ठेवला आहे. प्रेमळ वाचक हो, नामदेवांच्या अमर आत्म्यास एकदां प्रेमानें नमस्कार करून, **निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई एकनाथ नामदेव तुकाराम** या पवित्र नामांचा घोष करा आणि बोला **पुंडलीक वरदे हरि विठ्ठल** !

नामदेव महाराजांच्या घराण्याची सुमारें १००० वर्षांची विस्तृत वंशावळ रा. माधवराव तेलकर यांनीं १९११ सालीं बेळगांव येथील 'रामतत्त्वप्रकाश' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केली आहे; परंतु ती असावी तितकी विश्वसनीय नाहीं असें शिंपी ज्ञातीच्या कांहीं प्रमुख गृहस्थांचें म्हणणें पडलें; शिवाय 'नामदेवांची आदि' या जुनाट ग्रंथाच्या आधारानें नामदेवांच्या पूर्वजांचीं जीं नांवें प्रस्तुत ग्रंथांत पूर्वी दिलीं आहेत तींही या वंशावळींत सांपडत नाहींत. म्हणून या वंशावळीचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत मी करीत नाहीं. कै. तुकाराम तात्या यांनीं १८९४ सालीं प्रसिद्ध केलेल्या नामदेवी गाथ्यांत नामदेवांची वंशावळ दिली आहे ती येणेंप्रमाणें:—

* "ज्ञानदेवें रचिला पाया." **तुकाराम.**

- दामाशेटी—गोणाई
  - नामदेव—राजाई
    - नारा—लाडाई
      - मुकुंद
        - केशव
          - सिद्धेश्वर
            - संतूबावा
              - विठोजी
                - महादजी
                  - चिमणाजी
                  - हरी
                    - तुकाराम
            - गोपाळबावा
              - तुकोजी
                - सुभानजी
                  - ज्ञानदेव
                  - बाळाजी
                    - कुसाजी
                      - भिकाजी
                        - त्र्यंबकोजी
                          - योगीराज
                            - महाळू
                          - धनापा
                      - सखाराम
                        - लिंबाजी
                          - दामोदर
                            - नामदेव
                          - विठोबा
                            - नामदेव
                            - सांवळा
                      - केदारजी
                        - उमाजी
                        - शेटीबा
                          - केदारजी
                          - रामा
                      - लक्ष्मण
                        - आबा
          - पांडुरंग
            - गोदूबाई
            - नारायण
    - महादा—गोणाई
    - गोंदा—येसाई
    - विठा—साकराई
    - निंबाबाई
  - आऊबाई

# श्रीनामदेवचरित्र.



## उत्तरार्ध.

प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वार्धांत नामदेव महाराजांच्या जन्मापासून त्यांच्या समाधि-कालापर्यंतचें चरित्र, अनेक प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांच्या आधारानें दिलें. आतां या उत्तरार्धांत त्यांच्या कवितेचें थोडेसें निरीक्षण करून, त्यांच्या व त्यांच्या कुटुंबांतील इतर मंडळीच्या उपलब्ध अभंगांपैकीं कांहीं निवडक अभंग देण्याचा विचार आहे.

नामदेवांनीं चंद्रभागेच्या तीरीं, वाल्मीकि मुनींनीं शतकोटि रामायण रचल्याची कथा ऐकली व त्या वेळीं त्यांनीं शतकोटि अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली, अशी एक दंतकथा आज अनेक वर्षें महाराष्ट्रांत प्रचलित असून, त्यासंबंधाचे कांहीं अभंगही प्रसिद्ध आहेत. पुढील अभंग पहाः——

**“ चंद्रभागेतीरीं आयकिली गोष्टी । वाल्मीकें शतकोटी ग्रंथ केला ॥ १ ॥ माझिया चित्तासी फार झाले क्लेश । वृथा म्या आयुष्य गमाविलें । ॥ २ ॥ जाऊनि राऊळा विठोसी विनविलें । वाल्मीकानें केलें रामायण ॥ ३ ॥ असेन मी खरा तुझा भक्त देवा । सिद्धीस हा न्यावा पण माझा ॥ ४ ॥ शतकोटी तुझे करीन मी अभंग । म्हणे पांडुरंग ऐक नाम्या ॥ ४ ॥ तये वेळीं होती आयुष्याची वृद्धि । आतांची अवधी थोडी असे ॥ ६ ॥ नामा म्हणे जरी न होतां संपूर्ण । जिव्हा उतरीन तुजपुढें ॥ ७ ॥**

**निश्चय पाहूनी उपजली दया । स्वामी देवराया पांडु-रंगा ॥ १ ॥ सारजेसी सांगे भीमातीरीं हरि । बैस जिव्हेवरी नामयाच्या ॥ २ ॥ लाडकें लडिवाळ नामा माझें तान्हें । तयाला मजवीण कोण आहे ॥ ३ ॥ मज-वरी त्याचें फार असे ऋण । होईन उत्तीर्ण येवढ्यानें ॥४॥**

**नामा म्हणे हातीं बांधोनियां वह्या । बैसे लिहावया पांडुरंग ॥ ५ ॥**

आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं हे दोन्ही अभंग खुद्द नामदेवांच्या तोंडून वदविलेले आहेत ! परंतु शतकोटी अभंगांची ही आख्यायिका कशी खोटी असली पाहिजे याचा थोडासा विचार आरंभीं उपोद्घातांत मी केलाच आहे. नामदेवांनीं आपल्या कुटुंबांतील मंडळीच्या साहाय्यानें शेवटीं सुमारें ९६ कोटी अभंग लिहून पुरे केले, ही कथा जर शक्य कोटींतली मानली, तर, हल्लीं उपलब्ध असलेले दोन अडीच हजार अभंग वजा जातां बाकीच्या ९५९९९७५०० अभंगांचें काय झालें ? 'क्राऊन सोळा पेजी' आकाराच्या एका पृष्ठावर १० याप्रमाणें जर ९६ कोटी अभंग छापून काढले तर ५०० पृष्ठांचा एक भाग, या हिशोबानें ९६००००००० पृष्ठांचे १९२००० भाग होतील ! आणि वर्षांतून चार भाग या हिशोबानें हे एक लक्ष ब्याण्णव हजार भाग छापण्यास ४८००० वर्षें लागतील ! ! अशा स्थितींत, नामदेवांनीं शतकोटि अभंग लिहिण्याची प्रतिज्ञा करून त्यांतले ९६ कोटी अभंग आपल्या हयातींत पुरे केले व बाकी उरलेले ४ कोटी अभंग तुकारामबुवांनीं पुरे केले, या दंतकथा म्हणजे मूर्ख लोकांनीं उठविलेल्या निव्वळ गप्पा होत. नामदेवांच्या कुटुंबांतील कोणत्या मनुष्यानें किती अभंग लिहिले याचादेखील हिशोब या गप्पीदासांनीं लिहून ठेवला आहे:—

**सांगावी हे वाणी वेगळाली करुनी । जेणें पुरे धणी आवडीची ॥ १ ॥ प्रथम ही कवि आत्मा अनुभवी । ब्रह्मरस ठेवी उतू आली ॥ २ ॥ पिता दामशेटी अभंग दोन कोटी । भक्तिभावें ताटीं निवेदी देवा ॥ ३ ॥ तीन कोटी अभंग गोणाईचा वाद । स्वात्मसुखबोध सुखाचा तो ॥ ३ ॥ तीन कोटी अभंग नारोबाची कविता । उगवी आत्महिता दिवसरजनीं ॥ ४ ॥ तीन कोटी अभंग विठोबाचा झगडा । प्रेमरसगोडा प्रेमाचा तो ॥५॥ महादा आणि गोंदा अडीच अडीच कोटी । प्रेमरस पोटीं प्रेमळ तो ॥ ६ ॥ एक कोटी अभंग लक्ष वरती सोळा । प्रेमरस जिव्हाळा आऊबाईचा ॥ ७ ॥ चौऱ्याण्णव लक्ष रंगाईची करुणा । प्रेमें नारायणा आळ-**

विलें ॥ ८ ॥ दोन कोटी अभंग राजाईची वाणी । प्रेमें चक्रपाणी आळविलें ॥ ९ ॥ लाडाई गोडाई येसाई साखराई । कवित्व हें पाहीं दीड दीड कोटी ॥ १० ॥ एक कोटी देव पन्नास लक्ष रुक्मिणी । कोटी दासी जनी साडे बारा ॥ ११ ॥ एकुणहत्तर लक्ष चौपन्न कोटी । कविता गोमटी नामयाची ॥ १३ ॥ तुका म्हणे येथें कोणी फुटूं नका । पूर्वींचा हा डंका वाजिन्नला ॥१४॥

या गप्पेच्या खरेपणाविषयीं कोणी शंका घेऊं नये म्हणून अभंगाचे शेवटीं बिचाऱ्या तुकारामबुवांची साक्ष घालून ठेवली आहे ! परंतु इतकी खबरदारी घेऊनही ९६ कोटींचा हिशोब जमत नाहीं तो नाहींच ! कारण वरील अभंगांतील सर्व संख्यांची बेरीज फक्त ८२ कोटी २९ लक्ष येते ! असो. ही अतिशयोक्तिपूर्ण आख्यायिका बाजूस ठेवून, नामदेवांची जी कविता हल्लीं उपलब्ध आहे तिचा आतां विचार करूं. नामदेवांनीं एकंदर कविता किती लिहिली हें समजण्यास जरी कांहीं मार्ग नाहीं तरी हल्लीं जी त्यांची कविता उपलब्ध आहे तितकीच त्यांची कविता गेल्या ६०० वर्षांत नष्ट झाली असली पाहिजे असें धरून चालण्यास हरकत नाहीं. रा. आवटे यांनीं छापलेल्या नामदेवी गाथ्यांत नामदेवांच्या नांवावर एकंदर २३७३ अभंग दिलेले आहेत. आणि हे सगळे अभंग महाराष्ट्रांत होऊन गेलेल्या सगळ्या नामदेवांचे आहेत. हा गाथा तयार करण्याचें काम अगदींच निष्काळजीपणानें झालेलें दिसतें. ज्ञानदेवसमकालीन नामदेवानंतर शेंकडों वर्षांनीं होऊन गेलेल्या भानुदास, संताजी पवार, बोधले बावा, नरसी मेहता वगैरे संतांचीं चरित्रें दुसऱ्या एका नामदेवानें अभंगवृत्तांत लिहिलीं आहेत, ते सगळे अभंग आद्य नामदेवांचे म्हणून या गाथ्यांत, बिलकुल विचार न करितां, खुशाल दडपून दिले आहेत. ‘ इंद्रायणिचे तटीं धरिला रहिवास ’ ही मुक्तेश्वरकृत ज्ञानदेवांची आरती नामदेवांच्या नांवावर बेलाशक दडपली आहे ! अर्थात् या सगळ्या भारूडांतून मूळ नामदेवांचे अस्सल अभंग बिनचूक शोधून काढण्याचें आणि अशा रीतीनें शोधून काढलेले अभंग खात्रीपूर्वक आद्य नामदेवांचेच आहेत अशी ग्वाही देण्याचें काम किती बिकट आहे, याचा विचार वाचकानींच करावा. भाषेच्या जुनेपणाची किंवा दुसरी कसली तरी कसोटी लावतां येण्यासारखी असती, तर हें कार्य पुष्कळच सुकर झालें असतें; परंतु एखादा खडबडीत दगड पाण्याच्या नित्यप्रवाहामुळें कालांतरानें जसा गुळगुळीत होतो, त्याप्रमाणें नाम-

देवांचे अभंग गेल्या सहाशें वर्षांच्या कालौघानें इतके सोपे झालेले आहेत कीं, तत्कालीन ज्ञानेश्वरींतल्या जुन्या शब्दांतले एक शतांशही शब्द या अभंगांत सांपडत नाहींत. अशा स्थितींत, जुनी कविता पुष्कळ वर्षें लक्ष्यपूर्वक वाचल्यामुळें, अमुक कविता अमुक कवीचीच असली पाहिजे असें ठांसून सांगण्याचा जो एक प्रकारचा अधिकार वाचकास प्राप्त होत असतो त्याचाच येथें उपयोग करणें भाग आहे. आद्य नामदेवांची जी कविता हल्लीं उपलब्ध आहे ती अगदीं सोपी व साधी पण अत्यंत प्रेमळ आणि औत्सुक्यपूर्ण अशी आहे. देवाविषयीं नामदेवांचा जो प्रेमभाव त्यांच्या चरित्रांत प्रतीत होतो त्याचेंच प्रतिबिंब त्यांच्या कवितेंत सर्वत्र उमटलेलें आहे. भाषेचा नीटनेटकेपणा, विद्वत्ता किंवा उच्च दर्ज्याचें कवित्व यांच्या अभावींदेखील, एका प्रेमळतेमुळें त्यांचें काव्य आज सहाशें वर्षें महाराष्ट्रांत लोकप्रिय होऊन राहिलें आहे व सहाशें वर्षांपूर्वीं ज्ञानेश्वरीनें वरच्या वर्गांत जें परमार्थकार्य केलें तेंच नामदेवांच्या या पवित्र अभंगवाणीनें खालच्या वर्गांत केलें. नामदेवांच्या कवितेची याहून अधिक चर्चा करण्याचा माझा अधिकार नाहीं. नामदेवांचे पुत्र नारा, म्हादा, गोंदा व विठा यांचेही कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत, व त्यांचीही रचना नामदेवांसारख्या थोर सत्पुरुषाच्या पुत्रांस सर्वथैव साजेल अशीच आहे. विशेषतः विठाचे अभंग तर फारच बहारीचे आहेत. आतां या पितापुत्रांचे कांहीं निवडक अभंग येथें देतों.

---

# नामदेवांचे अभंग.



(१)

विटेवरी उभा दीनांचा कैवारी । भेटाया उभारी दोन्ही बाह्या ॥ १ ॥
गुण दोष त्याचे न पाहेचि डोळां । भेटे वेळोवेळां केशिराज ॥ २ ॥
ऐसा दयावंत घेत समाचार । लहान आणि थोर सांभाळितो ॥ ३ ॥
सर्वांलागीं देतो समान दरुशन । उभा तो आपण समपायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे तया संतांची आवडी । भेटावया कडाडी उभाचि असे ॥५॥

( २ )

विटेवरी समचरण सुंदर । बाळक सकुमार येशोदेचें ॥१॥
वाळे वाकी गर्जती तोरड चरणीं । नाद झणझणी वाजताती ॥२॥
कासे कसियेला दिव्य पीतांबर । लोपे दिनकर तेणें प्रभा ॥३॥
नामा म्हणे नाहीं तुझ्या रूपा पार । तेथें मी किंकर काय पाड ॥४॥

( ३ )

पंढरीचें प्रेम आहे ज्यांचे जीवीं । त्यांची नित्य नवी करिन आशा ॥१॥
ते माझे सोइरे सुखाचे सद्गुरु । भवसिंधूचा पारु उतरिती ॥२॥
माझ्या विठोबाच्या नामीं ज्यां विश्वास । होईन त्यांचा दास आवडीचा ३
माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव । दारवंटा पाय धरीन त्यांचे॥४॥
माझ्या विठोबाचें ध्यान ज्यांचे मनीं । सांडोबा अंगणीं होइन त्यांचे ॥५॥
ऐसे सर्व भावें माझ्या विठोबा शरण । त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे॥६॥

( ४ )

पंढरीच्या सुखा अंतर पार नाहीं लेखा । शेषा सहस्रमुखा नवर्णवेचि ॥१॥
पंढरीच्या सुखा तोचि अधिकारी । जन्मोजन्मीं वारी घडली जया ॥२॥
पंढरीस जातां प्रेम उचंबळत । आनंदें गर्जत नाम-घोष ॥३॥
विश्वमूर्ति विठो विश्वंभर देखे । विसरला दुःखें देहभाव ॥४॥
नामा म्हणे त्याचा होइन चरणरज । नुपेक्षील मज पांडुरंग ॥५॥

( ५ )

धन्य तोचि जगीं जाणा राजयोगी । जेणें पांडुरंगीं ठेविला भाव ॥ १ ॥
संकल्प विकल्प शून्य करोनि मन । हृदयीं धरिले चरण विठोबाचे ॥२॥
कोटी कुळें एका क्षणेंचि पावन । जेणें केलें स्नान चंद्रभागे ॥३॥

महा पापराशी त्याच्या झाल्या होळी । वाजविली टाळी विठ्ठलनामें ॥४॥
नामा म्हणे धन्य धन्य ते संसारीं । चालविती वारी पंढरीची ॥ ५ ॥

( ६ )

संपदा सोहळा नावडे मनाला । छंद हा लागला पंढरीचा ॥१॥
जावें पंढरीसी आवडे मनासी । कधीं एकादशी आषाढी हे ॥२॥
आषाढी कार्तिकी कधीं ये म्हणोनी । ज्ञातियालागोनि पुसतसे ॥३॥
नामा म्हणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥४॥

( ७ )

नित्य हे दिवाळी असे पंढरपुरीं । ओंवाळिती नारी विठ्ठलासी ॥१॥
पांवा वाजे वेणू बरविया नादें । विठ्ठल आनंदें नाचतसे ॥२॥
नामा म्हणे आम्हीं पंढरीये जावें । कवतुकें पहावें विठ्ठलासी ॥३॥

( ८ )

अवघी हे पंढरी सुखाची मांदुस । माझा स्वप्रकाश रत्न हरी ॥१॥
धन्य संतजन तेथींचे पारखी । ज्यां झाली ओळखी विठ्ठलनामीं ॥ २ ॥
अनुभवुनी चित्तीं पाहिलें विवेकें । धरिलें पुंडलीकें हृदयकमळीं ॥३॥
त्रिभुवन खेळण प्रेमाचें कोंदण । करोनि भूषण भोगितसे ॥४॥
युगें गेलीं परी पालटची नाहीं । नित्य शुद्ध पाहीं तेजःपुंज ॥५॥
पाहतां नित्य नवें ध्यातां चित्त निवे । म्हणोनि नामा जिवें विसंबेना ॥६॥

( ९ )

पंढरीची वारी जयाचिये कुळीं । त्याची पायधुळी लागो मज ॥१॥
तेणें त्रिभुवनीं होइन सरता । नलगे पुरुषार्था मुक्ति चारी ॥२॥
नामाची आवडी प्रेमाचा जिव्हाळा । क्षण जिवावेगळा न करीं त्यासी ॥३॥
नामा म्हणे माझा सोयरा जिवलग । सदा पांडुरंग तयाजवळी ॥४॥

( १० )

विठोबाच्या गांवा जाईन धांवोनि । घालीन लोळणी चरणावरी ॥१॥
शिणभाग माझा हिरोनी नेईल । जीवींचे पुसेल जडभारी ॥२॥
हरुषें लोळत जाईन महाद्वारा । भेटाया सामोरा येइल मज ॥३॥
उचलोनी सीस पुसील आदरें । मुख पीतांबरें पुसिल माझें ॥४॥
धरोनि हनुवटी उठवील हस्तकीं । ठेवील मस्तकीं अभयकर ॥५॥
राई रखुमाई माता सत्यभामा । कडे घेउनी नामा स्तनीं लावी ॥६॥

( ११ )

देव मज सांगे पंढरीसी या रे । प्रेमें चित्तीं ध्या रे नाम माझें ॥१॥
काया वाचा मन दृढ धरा जीवीं । सर्व मी चालवीं भार त्याचा ॥ २ ॥
भवसिंधु तारीन ध्या रे माझी भाक । साक्ष पुंडलीक करुनी बोले ॥ ३ ॥
लटकें जरी असे नामयासी पुसा । आहे त्या भरंवसा नामीं माझ्या ॥४॥

( १२ )

देहुडा चरणीं वाजवितो वेणु । गोपिकारमणु स्वामी माझा ॥ १ ॥
देखिला गे माय यमुनेचे तीरीं । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥२॥
गुंजावर्ण डोळे शिरीं बाबरझोंटी । मयूरपिच्छ वेष्टी शोभतसे ॥३॥
सगुण मेघःश्याम लावण्यसुंदर । नामया दातार केशवराज ॥४॥

( १३ )

बरवेपणें बरवा बाप मदनाचा । तो स्वामी अमुचा पंढरिराव ॥१॥
उदारपणें उदार दाता त्रैलोक्याचा । तो स्वामि० ॥ ध्रु० ॥
झुंझार आणि शूर अरी त्या दैत्यांचा । तो स्वामी आमुचा पंढरिराव ॥ २ ॥
चतुरपणें चतुर बाप ब्रम्हयाचा । तो स्वामी आमुचा पंढरिराव ॥३॥
पवित्रपणें पवित्र उद्धार तीर्थांचा । तो स्वामी आमुचा पंढरिराव ॥४॥
नामा म्हणे आधार सकळां जीवांचा । तो स्वामी आमुचा पंढरिराव ॥५॥

( १४ )

विठ्ठल मावली कृपेची सावली । आठवितां घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळी व्यापक न विसंबे ॥ २ ॥
माया मोह कैसा करावा सर्वथा । अंतरींची व्यथा तोचि जाणे ॥ ३ ॥
सुखशांति रूपें लेववीली अंगीं । लागों नेदी धगी संसाराची ॥ ४ ॥
देऊनी अभय करें कुरवाळी । करित सावली पीतांबरें ॥ ५ ॥
मुखीं नाममाळा कीर्तन श्रवणीं । लेववीलीं लेणीं नवविध ॥ ६ ॥
नयनीं अंजन सूदलें सांवळें । समाधान झालें सर्व अंग ॥ ७ ॥
अच्युत अनंत सुवर्णाची पेटी । घातलीसे कंठीं निर्विकार ॥ ८ ॥
चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणी । प्रभा त्रिभुवनीं विराजित ॥ ९ ॥
मुक्तलग शुद्ध बिंदुलीं गोजिरीं । पद्महस्त शिरीं स्थापितसे ॥ १० ॥
संतपायरज कपाळीं टिळका । नाहीं भय शंका कळिकाळा ॥ ११ ॥
सगुण साजिरा कटीं कडदोरा । अवर्ण दुर्भरा दृढबोधू ॥ १२ ॥
कामक्रोधादिक करुनि पुतळे । पाय जे घातले पायवाट ॥ १३ ॥
वासनेची दृष्टि लागेल त्या झणी । उभा चक्रपाणि मागें पुढें ॥ १४ ॥
संतपायीं नामा शृंगारमंडितु । अखंड क्रीडतु महाद्वारीं ॥ १५ ॥

( १५ )

वाळवंटीं उभा करें कुरवाळील । जीवींचें पुसेल जडभारी ॥ १ ॥
हरुषें लोळणी घालूं महाद्वारीं । येईल समोरी केशीराज ॥ २ ॥
शोभतसे पायीं भक्त ब्रीदावळी । जीवासी सांभाळी दीनानाथ ॥ ३ ॥
माझा अभिमान धरून मानसीं । नामा म्हणे होसी भक्तां साह्य ॥ ४ ॥

( १६ )

पंढरीचा देव बहुत कोंवळा । सगुण सांवळा सारथि हा ॥ १ ॥
सारथि सर्वांचा साक्षीभूत असे । संकटीं सायासें गजेंद्रासी ॥ २ ॥

गजेंद्रासी रक्षी गणिका उद्धरी । भिल्लीणीचे करीं फळें भक्षी ॥ ३ ॥
भक्षी सुदाम्याचे पोहे मुष्टिभरी । नामा म्हणे हरि गोड मानी ॥ ४ ॥

( १७ )

तुझिया सत्तेनें वेदांसी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया बळें ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणुनी शरण आलों ॥ २ ॥
मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें । वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥
नामा म्हणे कांहीं न हाले साचार । प्रभु तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

( १८ )

सत्यसंकल्पाचा कर्ता जो विश्वाचा । अनाथ जीवांचा मायबाप ॥ १ ॥
पुंडलीकें तया आणिलें रंगणीं । कटावरी पाणि ठेवूनियां ॥ २ ॥
अणुरेणुमाजीव्यापूनि राहिला । नानात्व जाहला एकलाचि ॥ ३ ॥
नामा म्हणे वेद ज्यालागीं बोभाय । जोडोनियां पाय उभा ठाके ॥४॥

( १९ )

गगनीं ध्रुव तुवां अढळ पैं केला । तो बाळ धाकुला न म्हणसी ॥ १ ॥
अजामेळाचें तुवां चुकविलें संकट । ब्राह्मण तो नष्ट न म्हणसी ॥ २ ॥
प्रऱ्हादाचा तुवां केला कइवारू । वैऱ्याचा कुमरु न म्हणसी ॥ ३ ॥
गजेंद्र पशू सोडविला पानडियें । मृगखोडी ऐसीये न म्हणसी ॥ ४ ॥
रुक्मांगदाची तुवां उद्धरिली नगरी । विषयी मुरारी न म्हणसी तया ॥५॥
ऐसे अपराधी न म्हणसी देवा । नामा तो केशवा विनवीतसे ॥ ६ ॥

( २० )

नामाचा गजर गर्जे भीमातीर । महिमा साजे थोर तुज एका ॥ १ ॥
रिद्धि सिद्धि दासी अंगण झाडिती । उच्छिष्टें काढिती मुक्ति चारी ॥२॥
चारी वेद भाट होउनी गर्जती । सनकादिक गाती कीर्ति तुझी ॥ ३ ॥

सुरवरांचे भार अंगणीं लोळती । चरणरज क्षिति शिव वंदी ॥ ४ ॥
नामा म्हणे देव ऐसा हो कृपाळु । करितो सांभाळु अनाथांचा ॥ ५ ॥

( २१ )

काय वाणूं आतां पायाचा महिमा । जेथें झाली सीमा बोलायाची ॥ १ ॥
विठोबाचे पाय आठवितां मनीं । गेलें हरपोनी भवभय ॥ २ ॥
पाय नारदानें हृदयीं धरितां । ब्रह्मांडीं मान्यता झाली त्याची ॥ ४ ॥
सनकादिकांलागीं पाय वज्र कवच । ब्रह्मादि देवांस पद जेणें ॥ ४ ॥
लागतांचि पाय शिळा दिव्य झाली । पाषाण तारिले उदकावरी ॥ ५ ॥
पाय ते रमेचें सौभाग्य साजिरें । योगी ऋषीश्वर थोर जेणें ॥ ६ ॥
नामा म्हणे मनीं पाय सर्वकाळ । म्हणोनि सुकाळ आनंदाचा ॥ ७ ॥

( २२ )

पाला खाऊनियां धाला बहिणी घरीं । भक्तिलागीं हरी वेडा झाला ॥ १ ॥
सुदाम्याचे पोहे कोरडेचि खाय । मटमटा पाहे चहूंकडे ॥ २ ॥
विदुराच्या कण्या खाय धणीवरी । झाला बळिचे द्वारीं द्वारपाळ ॥ ३ ॥
नामा ह्मणे हरीचे न कळती पोवाडे । नेणों भक्तांपुढें वेडा झाला ॥ ४ ॥

( २३ )

नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ १ ॥
सर्व सांडुनी माझाई । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥
परेहुन परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ३ ॥
सर्वांचें जें अधिष्ठान । तेंचि माझें रूप पूर्ण ॥ ४ ॥
अवघी सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ॥ ५ ॥

( २४ )

सद्गुरूचे पाय जीवें न विसंबावे । मन वळवावें वृत्तीसहित ॥ १ ॥
डोळीयाचे डोळे उघडिले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥ २ ॥

जन्ममरणाचें फेडिलें सांकडें । कैवल्यचि पुढें दाखविलें ॥ ३ ॥
मोहरले तरु पुष्पफळभारें । तेचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी खेचर माउली । कृपेचि साऊली केली मज ॥ ५ ॥

( २५ )

संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निंबलोण उतरावें ॥ १ ॥
तेथें तूं निश्चळ राहें माझ्या मना । मग तुज यातना नव्हती कांहीं ॥ २ ॥
संतांच्या द्वारींचा होईं द्वारपाळ । नुरे मायाजाळ मोहपाश ॥ ३ ॥
संतांचे प्रसाद सेविसी उरले । आयुष्य सरलें दुणावेल ॥ ४ ॥
नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देति भक्तिबोधु प्रेमसुख ॥ ५ ॥

( २६ )

संतचरणरज सेवितां सहज । वासनेचें बीज जळुनी जाय ॥ १ ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडीं वाढों लागे ॥ २ ॥
भेद भ्रम आटे आशापाश तुटे । विश्रांति हे भेटे संतसंगें ॥ ३ ॥
प्रेमें कंठ दाटे आनंदें पूर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ४ ॥
नामा म्हणे सोपें साधन गोमटें । साधे ज्या उत्कृष्ट पूर्वपुण्यें ॥ ५ ॥

( २७ )

वैष्णवां घरीं सर्वकाळ । सदा झणझणिती टाळ ॥ १ ॥
कण्या भाकरीचें खाणें । गांठीं रामनाम नाणें ॥ २ ॥
बैसावयासी कांबळा । द्वारीं तुळसी रंगमाळा ॥ ३ ॥
घरीं दुभे कामधेनु । तुपावरी तुळसीपानु ॥ ४ ॥
फराळासी मीठ लाह्या । घडी घडी पडती पायां ॥ ५ ॥
नामा म्हणे नेणती कांहीं । चित्त अखंड विठ्ठलपायीं ॥ ६ ॥

( २८ )

जैसा वृक्ष नेणें मान अपमान । तैसे ते सज्जन वर्ततातीं ॥ १ ॥
येऊनियां पूजा प्राणि जे करिती । त्याचें सुख चित्तीं तया नाहीं ॥ २ ॥
अथवा कोणी प्राणी येऊनि तोडिती । तया न म्हणती छेदूं नका ॥ ३ ॥
निंदा स्तुति सम मानिती जे संत । पूर्ण धैर्यवंत साधु ऐसे ॥ ४ ॥
नामा म्हणे त्यांची जरी होय भेटी । तरी जीवा शीवा गांठी पडुनि जाय ॥५॥

( २९ )

सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव । पुसोनियां ठाव अहंतेचा ॥ १ ॥
तोचि संतसाधु ओळखावा निका । येर ते आइका मायाबद्ध ॥ २ ॥
देखिलिया धन मृत्तिकेसमान । नवविधा रत्नें जैसे धोंडे ॥ ३ ॥
कामक्रोध दोघे घातले बाहेरी । शांति क्षमा घरीं राबवींत ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे । विसंबेना त्याचे क्षणमात्र ॥ ५ ॥

( ३० )

क्रिया कर्म धर्म तिहीं केलें सांग । जिहीं पांडुरंग देखियेला ॥ १ ॥
ओळखोनि मनें धरिला मानसीं । उभा अहर्निशीं हृदयकमळीं ॥ २ ॥
निजानंद बोधें नामाचेनि छंदें । डोलती आनंदें वोसंडत ॥ ३ ॥
नाहीं देहस्मृति निमाली वासना । मावळली कल्पना भावाभाव ॥ ४ ॥
अखंड विदेही रजतमा वेगळे । भोगिती सोहळे प्रेमसुख ॥ ५ ॥
त्याचिये द्वारींचा झालोंसे सांडोबा । म्हणोनि केशवा पढिये नामा ॥६॥

( ३१ )

पाहूं द्या रे मज विठोबाचें मुख । लागलीसे भूक डोळां माझ्या ॥ १ ॥
कस्तूरी कुंकुम भरोनियां ताटीं । आंगीं बरवी उटी गोपाळाच्या ॥ २ ॥
जाई जुई पुष्पें गुंफोनियां माळा । घालूं घननीळा आवडीनें ॥ ३ ॥
नामा म्हणे विठो पंढरीचा राणा । डोळियां पारणा होत असे ॥ ४ ॥

( ३२ )

नको का मोकलूं दीन पंढरिनाथा । तुजवीण अतां कोण धांवे ॥ १ ॥
अपराधाच्या कोटी पाहूं नको कांहीं । ये गे विठाबाई झडकरी ॥ २ ॥
माझ्या दोषासाठीं पाठमोरा होसी । पावन श्रीदासी लागे बोल ॥ ३ ॥
नामा म्हणे जननी तूंचि चराचर । तारिले अपार जड जीव ॥ ४ ॥

( ३३ )

येईं गे विठ्ठले अनाथाचे नाथे । माझे कुळदैवते पंढरीचे ॥ १ ॥
पंचही प्राणाचा उजळोनी दीप । सुंदर श्रीमुख ओवाळीन ॥ २ ॥
मनाचा प्रसाद तुजलागीं केला । रंग भोग आपुला घेउनि राहें ॥ ३ ॥
आनंदाचा भोग घालीन आसनीं । वैकुंठवासिनी तुझ्या नांवें ॥ ४ ॥
आपुलें म्हणावें सनाथ करावें । भावें संचरावें हृदयघटीं ॥ ५ ॥
नामा म्हणे माझे पुरवीं मनोरथ । देईं सदोदित प्रेमकळा ॥ ६ ॥

( ३४ )

विठ्ठल विसावा सुखाची साउली । प्रेमपान्हा घाली भक्तांवरी ॥ १ ॥
दाखवीं चरण दाखवीं चरण । दाखवीं चरण नारायणा ॥ २ ॥
विठ्ठल आचार विठ्ठल आचार । दावीं निरंतर पाय आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे नित्य बुडालों संसारीं । धांवोनियां धरीं हातीं मज ॥ ४ ॥

( ३५ )

अवघाचि संसार सुखाचा करीन । अवघ्या भावें धरिन विठ्ठल एक ॥ १ ॥
अवघा शीणभाग हिरोनि घेईल । अवघेचि तोडील मायापाश ॥ २ ॥
अवघा जीवलग हाचि पैं होईल । अवघा हा घेईल भार माथां ॥ ३ ॥
अवघा त्रिविध ताप क्षणें मालवील । अवघा चालवील योगक्षेम ॥ ४ ॥
अवघ्या संसाराचें वसणें मोडील । अवघेंचि तोडील मायाजाळ ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघी सोडा मिथ्या भ्रांति । विठ्ठलेंवीण विश्रांति नाहीं कोठें ॥ ६ ॥

( ३६ )

पत्रावळी काढी वैकुंठनायक । धांवूनियां शुक आला तेथें ॥ १ ॥
दाटी पाहुनि द्वारीं मानसीं विचारी । जावया भितरीं काय काज ॥ २ ॥
वाहे हा प्रसाद स्वहस्तें अनंत । वेंचोनियां शीत घाली मुखीं ॥ ३ ॥
घंटानाद वाजे लक्षद्विज पंक्ति । अक्षयी वाजती वेळोवेळां ॥ ४ ॥
ऐकोनी विस्मित ऋषिसमुदाव । पुसे धर्मराव देवाजीसी ॥ ५ ॥
सांगतसे खूण वैकुंठनायक । ब्रह्मनिष्ठ एक आला येथें ॥ ६ ॥
तेथूनि उठले धर्म नारायण । बाहेर येऊन पाहताती ॥ ७ ॥
शुकाचिये मिषें व्यासाचा नंदन । सांगतसे खूण जगदीश ॥ ८ ॥
धरूनिया करीं नेला तो भीतरीं । नामा म्हणे करी पूजा त्याची ॥ ९ ॥

( ३७ )

ज्ञानराज माझी योग्यांची माऊली । जेणें निगमवल्ली प्रगट केली ॥१॥
गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी प्रगट केली ॥ २ ॥
अध्यात्म विद्येचें दाविलेंसे रूप । चैतन्याचा दीप उजळिला ॥ ३ ॥
छपन्न भाषांचा केलासे गौरव । भवार्णवीं नाव उभारिली ॥ ४ ॥
श्रवणाचे मिषें बैसावें येऊनी । सामराज्य भुवनीं सुखी नांदे ॥ ५ ॥
नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओंवी अनुभवावी ॥ ६ ॥

३८

अवघी चित्तवृत्ति एकवटून जेणें । अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सुख एक तयासी फावलें । अवघें सफळ झालें जन्म त्याचें ॥२॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें । ज्याचें विठ्ठलीं ध्यान मन जडलें ॥३॥
नित्य विठ्ठलनाम गर्जती सप्रेम । अवघे नित्यनेम झाले त्यांचे ॥ ४ ॥
अवघा इष्टमित्र बंधू माता पिता । केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय । मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

( ३९ )

मुक्ताफळ नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी ।
पीतांबरें अंग झांकी । कृष्णम्मा माझी ॥ १ ॥
खांद्यावरी कांबळी । पायघोळ लांबली ।
पांघरली घाबळी । कृष्णम्मा माझी ॥ २ ॥
गाईपाठीं लागली । पळतां नाहीं भागली ।
माय बहीण चांगली । कृष्णम्मा माझी ॥ ३ ॥
देहुडा पावली । उभी माझी माउली ।
विश्रांतीची साउली । कृष्णम्मा माझी ॥ ४ ॥
उभी नीट विटेवरी । शोभे भिंवरेचे तीरीं ।
नामयाची कैवारी । कृष्णम्मा माझी ॥ ५ ॥

( ४० )

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझिया सकळां हरिच्या दासां ॥१॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हे संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसां । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥३॥
नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

( ४१ )

विठ्ठल माउली कृपेची कोंवळी । आठवितां घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें ॥२॥
तुजवीण जिवलग दुजें कोण होईल । तें माझें साहील जडभारी ॥ ३ ॥
तूं माझी माऊली मी वो तुझा वत्स । परतों परतों वाट पाहें तुझी ॥४॥
माता मोहें तैसी न विसंबे सर्वथा । अंतरींची व्यथा कोण जाणें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठ्ठले कां गे रुसलीसी । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥६॥

( ४२ )

आरुष साबडें नेणें कांहीं वेडें । जन्मोनि सांकडें केलें तुज ॥ १ ॥
जाणसी तें करीं कृपाळुवा हरी । लाज सर्वांपरी आहे तुज ॥ २ ॥
मी तंव अपराधी आहें लक्षकोटी । परि म्हणवितों जगजेठी दास तुझा ॥ ३ ॥
नाहीं तुझी सेवा केली मनोभावें । लोभ दंभगर्वें भ्रांत सदां ॥ ४ ॥
बहुतां मुखीं तुझी ऐकिली बा कीर्ति । दीनानाथ म्हणती आर्तबंधु ॥ ५ ॥
नामा म्हणे मज मोकलिसी झणीं । अनाथ म्हणवूनी पाळीं देवा ॥ ६ ॥

( ४३ )

अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । भक्तांचा कृपाळ पांडुरंग ॥ १ ॥
येगा तूं विठ्ठला माझिया माहेरा । कृपेच्या सागरा पांडुरंगा ॥ २ ॥
वर्णिती पुराणें न करीं लाजिरवाणें । बोलती वचनें सनकादिक ॥ ३ ॥
कृपेचा सागरु कैवल्य उदारू । रखुमाईचा वरू पांडुरंग ॥ ४ ॥
पुंडलीकाचे भेटी असली वाळवंटीं । हात ठेवूनि कटीं विटेवरी ॥ ५ ॥
भक्तीलागीं कैसा उभा असे तिष्ठत । असे वाट पाहत भीमातीरीं ॥ ६ ॥
येऊनी संसारा पहावी पंढरी । तेणें भवसागरीं तरसील ॥ ७ ॥
नामा म्हणे मज हरीचा विश्वास । झालें असें दास जन्मोजन्मीं ॥ ८ ॥

( ४४ )

हेंचि देवा पैं मागत । चरणसेवा अखंडित ॥ १ ॥
वास द्यावा पंढरीचा । सदा संग हरिदासांचा ॥ २ ॥
जन्म हो कां भलते याती । परि मी न चुकें तुझी भक्ती ॥ ३ ॥
नामा म्हणे कमळापती । हेंचि द्यावें पुढतोपुढती ॥ ४ ॥

( ४५ )

अनाथांचा नाथ भक्तांचा कैवारी । पुराणीं हे थोरी आइकिली ॥ १ ॥
ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारीं दुःखासी केशीराजा ॥ २ ॥

त्रितापें तापलों दुःखें आहाळलों । कासाविस झालों दयासिंधु ॥ ३ ॥
तुजवीण आतां कोणातें मी सांगूं । तोडीं हा उद्वेगु नारायणा ॥ ४ ॥
नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरीं त्वरित पांडुरंगा ॥ ५ ॥

( ४६ )

भेटीलागीं माझा फुटतसे प्राण । काया वाचा मनें जीवेंभावें ॥ १ ॥
जया देखें तया पुसें हेचि मात । कैं मज अनंत बोलावील ॥ २ ॥
संतसमागमें दसरा दिवाळी । ठेवूनि निढळीं वाहे सदा ॥ ३ ॥
सखे पंढरीचे येती वारकरी । आर्त निरंतरीं त्यांचे पायीं ॥ ४ ॥
नामा म्हणे ऐसे करी दंडवत । आमुचे पुनीत मायबापा ॥ ५ ॥

( ४७ )

तूं माय माउली आस केली थोरी । वास निरंतरीं पंढरीये ॥ १ ॥
रूपें तीं दाखवीं एकवेळां मज । धरूं नको लाज केशिराजा ॥ २ ॥
आपणासमान करीं कोणे काळीं । तंव वनमाळी देव म्हणूं ॥ ३ ॥
नामा म्हणे तुज भक्तिचिये पिसें । पुरविसी आस दुर्बळाची ॥ ४ ॥

( ४८ )

काय पांडुरंगा सांग म्यां करावें । शरण कोणा जावें तुम्हावीण ॥ १ ॥
पाहतांना वाट भागले लोचन । कठिणच मन केलें तुवां ॥ २ ॥
ऐकिली म्यां कानीं कीर्ति तुझी देवा । उठलासे हेवा त्याचि गुणें ॥ ३ ॥
अनाथ अन्यायी काय मी करीन । दयावंता खूण सांगसी तूं ॥ ४ ॥
नामा म्हणे आस पूर्ण कीजे देवा । रूपडें दाखवा नेटें पाटें ॥ ५ ॥

( ४९ )

कांसवीचीं पिलीं राहोति निराळीं । दृष्टि पान्हावली सुधामय ॥ १ ॥
तैसा जवळूनि असेन मी दूरी । दृष्टि मजवरी असों द्यावी ॥ २ ॥

तान्हें वत्स घरीं वनीं धेनु चरे । परी ती हुंबरे क्षणोक्षण ॥ ३ ॥
नामा म्हणे सत्ता करिसी निकट । भक्तांसी वैकुंठपद देसी ॥ ४ ॥

( ५० )

काय करूं आतां देवा विश्वंभरा । मजलागीं थारा नाहीं कोठें ॥ १ ॥
उबगती सोयरीं धायरीं समस्त । काय करूं अंत पाहसी माझा ॥ २ ॥
तूंचि माता पिता गुरु बंधु होसी । जाऊं मी कोणासी शरण आतां ॥ १ ॥
पायीं थारा मागे नाम्याची विनंति । चित्त द्या श्रीपती आतां वेगें ॥ २ ॥

५१

प्रेमपिसें भरलें अंगीं । गीतसंगें नाचों रंगीं ॥ १ ॥
कोणे वेळे काय गाणें । हें तों भगवंता मी नेणें ॥ २ ॥
वारा वाजे भलतया । तैसी माझी रंग छाया ॥ ३ ॥
टाळ मृदंग दक्षिणेकडे । आम्ही गातों पश्चिमेकडे ॥ ४ ॥
बोले बाळक बोबडें । तरि तें जननीये आवडे ॥ ५ ॥
नामा म्हणे गा केशवा । जन्मोजन्मीं देईं सेवा ॥ ६ ॥

( ५२ )

अंतकाळीं मी परदेशीं । ऐसें जाणोनी मानसीं ।
म्हणोनियां हृषीकेशी । शरण तुजसी मी आलों ॥ १ ॥
नवमास गर्भवासीं । कष्ट जाहले मातेसी ।
ते निष्ठुर झाली कैसी । अंतीं दूर राहिली ॥ २ ॥
जीवीं बापासि आवड । मुखीं घालोनि करी कोड ।
जेव्हां लागली यमओढ । तेव्हां दूरि टाकिलें ॥ ३ ॥
बहिणी बंधूचा कळवळा । तें तूं जाणसी रे दयाळा ।
जेव्हां लागली यमशृंखला । तेव्हां दूर राहिलीं ॥ ४ ॥

कन्या पुत्रादिक बाळें । हीं तव स्नेहाचीं स्नेहाळें ।
तुझ्या दर्शनाहून व्याकुळ । अंतीं दूर राहिलीं ॥ ५ ॥
देहगृहाची कामिनी । ते तंव राहिली भवनीं ।
मी तंव जळतसें स्मशानीं । अग्निसवें येकला ॥ ६ ॥
मित्र आले गोत्रज आले । तेहि स्मशानीं परतले ।
शेवटीं टाकोनियां गेले । मजलागीं स्मशानीं ॥ ७ ॥
ऐसा जाणोनि निर्धार । मग मज आला गहिंवर ।
तंव दाही दिशा अंधकार । मग मज कांहीं न सुचे ॥ ८ ॥
ऐसें जाणोनि निर्वाण पाहीं । मनुष्यजन्म मागुता नाहीं ।
नामा म्हणे तुझे पायीं । ठाव देई विठोबा ॥ ९ ॥

( ५३ )

रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवीं । अनुदिनीं आठवीं चरण तुझे ॥ १ ॥
ने रे पांडुरंगा आपुलिया गांवा । तूं माझा विसांवा जीवलग ॥ २ ॥
मी एक बापुडें रंकाहूनि रंक । त्रिभुवननायक कीर्ति तुझी ॥ ३ ॥
मी तुझें पोसणें दास पैं दुर्बळ । तूं दीनवत्सल स्वामी माझा ॥ ४ ॥
तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा । सांभाळीं समर्था ब्रीद तुझें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो झालों कासाविस । पुरवीं माझी आस मायबापा ॥६॥

( ५४ )

माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पती ॥ १ ॥
मेघ वर्षे शिळाधारी । तेथें चातक चंचूभरी ॥ २ ॥
महाडोहो गंगाजळ । तृप्त एकादा अंजुळ ॥ ३ ॥
साखरेची साठी । तेथें मुंगीची मुखवटी ॥ ४ ॥
नामा म्हणे मी सेवेसीं । तूं तों उदाराचा राशी ॥ ५ ॥

( ५५ )

मायबापांपरिस लोभ तुझा हरी । आहे मजवरी केशिराजा ॥ १ ॥
आतां जाणसी तें कृपाळुवा करीं । लाज सर्व हरी आहे तुज ॥ २ ॥
माझें जातिकुळ नाहीं त्वां पुसिलें । अन्याय साहिले कोट्यानकोटी ॥३॥
जन्मोजन्मीं मज घातलें पाठीसी । संकटीं रक्षिसी नारायणा ॥ ४ ॥
देउनी प्रेमभातें पाळिलें पैं मातें । साउली तेव्हां ते केली देवा ॥ ५ ॥
जे खूण जाणती तेचि माझे सखे । मी तुझें लाडकें म्हणवीं देवा ॥६॥
नामा म्हणे काई होऊं उतराइ । पुढें जन्म नाहीं ऐसें केलें ॥ ७ ॥

( ५६ )

ऐकें मोक्षाची मी कथा । तेणें भय वाटे चित्ता ॥ १ ॥
देवा कांहीं न मागें न मागें । मौन असें संतसंगें ॥ २ ॥
ऐकें मुक्तीचिया गोष्टी । तेणें होतसें हिंपुटी ॥ २ ॥
ऐकें समाधीची गोडी । मन तुझे पायां ओढी ॥ ३ ॥
ऐकें स्वर्गसुख थोरी । भेणें कांप येतो भारी ॥ ४ ॥
नामा म्हणे अभयदान । देउनि सांगें प्रेमखूण ॥ ५ ॥

( ५७ )

आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा सर्वभावें ॥ १ ॥
तरी त्याचे दास म्हणतां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्ता आधीं ॥२॥
गाऊं नाचों आम्हीं आनंदें कीर्तनीं। भक्ति मुक्ति दोन्ही मागूं देवा ॥३॥
वृत्तिसहित मन बुडे प्रेमडोहीं । नाठवती देहीं देहभाव ॥ ४ ॥
सगुणी निर्गुणीं एकच आवडी । मनें दिली बुडी चिदाकाशीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा ऐसी मज सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥६॥

( ५८ )

पूर्ण कृपा केली देवा । दिधली पादपद्मसेवा ॥ १ ॥
पापें पळालीं पळालीं । नामकीर्तनकल्लोळीं ॥ २ ॥

रंगमाळा जागरणीं । तेथें मुक्ति वाहती पाणी ॥ ३ ॥
जन्म वैष्णवकुळीं द्यावा । घडो संतांची या सेवा ॥ ४ ॥
नामदेवाची आवडी । संत चरणीं देतो बुडी ॥ ५ ॥

( ५९ )

वासनेचा फांसा पडिला माझे कंठीं । हिंडलों जगजेठी नाना देहीं ॥ १ ॥
सोडवीं गा देवा दीनदयानिधि । मी एक अपराधी दास तुझा ॥ २ ॥
शरण आलियाचे न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण तुज साजे ॥ ३ ॥
त्रिभुवनीं समर्थ उदार मनाचा । कृपाळु दीनाचा ब्रीद तुझें ॥ ४ ॥
गजेंद्र गणिकेची राखिली तुवां लाज । उद्धरिला द्विज अजामेळ ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अव्हेरिसी मज । जगीं थोर लाज येइल तुला ॥ ६ ॥

( ६० )

कां हो माझी सांडी केली हृषीकेशी । आम्हीं कोणापाशीं तोंड वासूं ॥ १ ॥
नित्य देवा तुज यावें काकुळती । काय या संचितीं लिहिलें माझ्या ॥ २ ॥
ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं । तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥
समूळ घेतला पृथिवीचा भार । माझाचि जोंजार काय तुज ॥ ४ ॥
नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा हरिपायीं मिठी घाली ॥ ५ ॥

( ६१ )

माझी कोण गति सांगा पंढरिनाथा । तारिसी अनाथा कीं बुडविसी ॥ १ ॥
मनापासोनियां सांग मजप्रति । पुसें काकुळती जीवींचिया ॥ २ ॥
न बोलसी कां रे धरिला अबोला । कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥
कोणासि सांकडें घालावें हें सांगा । नको करूं रागा दीनावरी ॥ ४ ॥
बालकासि जैसी एकलीच माय । तैसे तुझे पाय आम्हालागीं ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । कृपाळुवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

( ६२ )

पाषाण करीं तरीं पायरीच्या मिषें । तुझ्या द्वारीं वसें ऐसें करीं ॥१॥
उदक करीं तरी मार्जनाचे मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ २ ॥
पशु करीं तरी गाईचिया मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ४ ॥
पक्षी करीं तरी चारियाचे मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ४ ॥
नामा म्हणे विठो कीर्तनाच्या मिषें । तुझ्या द्वारीं वसें ऐसें करीं ॥५॥

( ६३ )

अपराधाची कोडी हेचि माझी जोडी । पतितपावन प्रौढी तुझी देवा ॥१॥
माझियानि दैवें ऐसेंच घडलें । तूं तंव आपुलें न संडिसी ॥ २ ॥
सहस्र अपराध घालीं माझे पोटीं । तारीं जगजेठी म्हणे नामा ॥ ३ ॥

( ६४ )

श्रीमुखाची सोय पाहों म्हणे जरी । एवढा अधिकारी कैंचा देवा ॥१॥
चरणाजवळूनि नसावें जी दूरी । जन्मजन्मांतरीं हेंचि देई ॥ २ ॥
तुज देतां सोपें मज तृप्ति अल्प । सर्वज्ञा साक्षेपें सांगतसें ॥ ३ ॥
अनाथाचा नाथ हें तों ब्रीद साच । न करावें उदास नामा म्हणे ॥४॥

( ६५ )

धांवूनि जाईन श्रीमुख पाहीन । इडापीडा घेईन विठोबाची ॥ १ ॥
तया सुखा दृष्टि लागेल वो झणी । मग मी साजणी काय करूं ॥२॥
म्हणोनि माझें चित्त व्यापिलें उद्वेगें। शिणलों मी उबगें जन्मोजन्मीं॥३॥
धरोनियां घालीं जीवाचे अंतरीं । आंतोनि बाहेरी जाऊं नेदीं ॥ ४ ॥
वासना पापिणी करील पायरव । मग हा अनुभव कोठें पाहूं ॥ ५ ॥
वृत्तिसहित करीन मनाचें सांडणें । न विसंबें प्राणें म्हणे नामा ॥ ६ ॥

( ६६ )

पक्षिणी प्रभातीं चारियासी जाये । पिलूं वाट पाहे उपवासी ॥ १ ॥

तैसें माझें मन करि वो तुझी आस । चरण रात्रंदिवस चिंतीतसें ॥ २ ॥
तान्हें वत्स घरीं बांधलेसें दांवा । तया हृदयीं धांवा माउलीचा ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा तूं माझा सोईरा । म्हणी मज न अव्हेरा अनाथनाथा ॥ ४ ॥

( ६७ )

तापत्रय अग्नीची जळतसे शेगडी । आहाळोनि कोरडी झाली काया ॥ १ ॥
केव्हां करुणाघना वोळसी अंबरीं । निववीसी नरहरी कृपादृष्टी ॥ २ ॥
शोक मोहाचिया झळंबलों ज्वाळीं । क्रोधाचे काजळीं पोळतसें ॥ ३ ॥
चिंतेचा वोणवा लागला चहूंकडां । जातों तळा बुडां धांव देवा ॥ ४ ॥
धांव धांव करुणाघना तुजविण । नामा म्हणे प्राण जातो माझा ॥ ५ ॥

( ६८ )

डोळुले शिणले पाहतां वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजी ॥ १ ॥
तूं माझी जननी सरसीये सांगातिणी । विठ्ठले धांवोनी देई क्षेम ॥ २ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । क्षुधें पीडलों मज विसरलीसी ॥ ३ ॥
तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । गुंता भवपाश तोडीं माझा ॥ ४ ॥
तूं माझी माउली मी तुझी तान्हुली । वोरस वो घालीं प्रेमपान्हा ॥ ५ ॥
नामा म्हणे आस पुरवावी माझी । तान्हूलया पाजीं प्रेमपान्हा ॥ ६ ॥

( ६९ )

सगुण निर्गुण श्रुति ज्या बोलती । तो तूं माझे चित्तीं पंढरिराया ॥ १ ॥
आहेसि तितुकें तूंचि सर्वगत । मी काय अनाथ वर्णूं तुज ॥ २ ॥
चरणींची आवडी न संडावी मनें । यापरी पोषणें मायबापा ॥ ३ ॥
साक्ष भीमरथी संत पुंडलीक । नाम्यातें आणीक नलगे कांहीं ॥ ४ ॥

( ७० )

गंगा गेली सिंधूपाशीं । तों तो येऊं नेदी तिसी ॥ १ ॥
तिणें जावें कवण्या ठाया । बोल वेगीं पंढरिराया ॥ २ ॥

जळ कोपलें जलचरा । माय बाळा नेदी थारा ॥ ३ ॥
नामा म्हणे आलों शरण । तरि कां विठो धरिलें मौन ॥ ४ ॥

( ७१ )

देवा हे विनंति माझी । जे म्या सेवा करावी तुझी ।
आस न धरावी दुजी । अभिलाषाकारणें ॥ १ ॥
तुज म्या जीवें अनुसरावें । त्वां मज तैसें आपंगावें ।
आणिकाचें न म्हणावें । जन्मोजन्मीं दातारा ॥ २ ॥
वदनीं तुजचि वर्णावें । श्रवणीं गुणनाम ऐकावें ।
नयनीं चरण न विसंबावे । क्षण एक दातारा ॥ ३ ॥
अगा येऊनी संसारा । न जावें आणिकाच्या द्वारा ।
इष्ट मित्र सज्जन सोयरा । बंधु आदिकरोनी ॥ ४ ॥
जरी तुज न पोसवे दातारा । तरी या आयुष्या घालीं चिरा ।
एका पोटा गा दुस्तरा । साठीं अव्हेरूं नको ॥ ५ ॥
मज म्हणोत सकळ जन । परि तूं नको उदासीन ।
तुझ्या नामावांचून । आणिक नको दातारा ॥ ६ ॥
सेवक न करीं आणिकाचा । जन्मोजन्मीं दास तुमचा ।
आणिक वर्णीन तरी वाचा । उच्छिष्ट करूं नको ॥ ७ ॥
नामविक्रय न करावा । दान प्रतिग्रह न घ्यावा ।
कष्टार्जित मेळवावा । तोचि ग्रास आपुला ॥ ८ ॥
नको दिवटिया छत्र घोडे । जेणें तुजसी अंतर पडे ।
तुझें नामचि आवडे । मज बापुडें म्हणोत कां ॥ ९ ॥
ऐसा अन्यायी अपराधी । तरी मज तारीं कृपानिधि ।
तुझें नाम उच्चारीं आधीं । थोर अट्टाहास्यें करोनियां ॥ १० ॥

विष्णुदास नामा म्हणे । आम्हां उपेक्षिसी झणें ।
जन्मोजन्मींचें पोसणें । केशवा उणें येऊं नेदीं ॥ ११ ॥

( ७२ )

टाळ दिंडी हातीं उभा महाद्वारीं । नामा कीर्तन करी पंढरीये ॥ १ ॥
आवडीचेनि सुखें वोसंडतु प्रेमें । गातो मनोधर्मे हरिचे गुण ॥ २ ॥
सांडोनि अभिमान नाचे धरोनि कान । अंतरीं तें ध्यान विठोबाचें॥ ३ ॥
श्रीहरीचीं उत्तम जन्मकर्मनामें । घेतलीं त्या प्रेमें सुखरूपें ॥ ४ ॥
संतांची विश्रांति ज्ञानियांचें गुज । जें कां मुक्तिबीज मोक्षदानी ॥ ५ ॥
कृष्णा विठ्ठला हरी मुकुंदा मुरारी । अच्युता नरहरी नारायणा ॥ ६ ॥
गोवर्धनधर गोपीमनोहर । भक्तकरुणाकर पांडुरंगा ॥ ७ ॥
सकळ मंगळनिधि पातकभंजना । हरी जगज्जीवना परमानंदा ॥ ८ ॥
तूंचि एक सकळ आदिमध्यअंतीं । नित्य सुखसंपत्ति सज्जनांची ॥ ९ ॥
तूंचि माझा श्रोता तूंचि माझा वक्ता । तूंचि देता घेता प्रेमसुख ॥ १० ॥
विष्णुदास नामा विनवी पुरुषोत्तमा । सोडवीं भवश्रमापासूनियां ॥ ११ ॥

( ७३ )

नेत्र तान्हेले पाजीं पाणी । पंढरपुरचे मायबहिणी ॥ १ ॥
बाळ पालखीं करी सोर । माते आला निद्राभर ॥ २ ॥
जागी न होसी गे माय । प्राण जातो करूं काय ॥ ३ ॥
नामा म्हणे चक्रपाणी । चरणीं घातली लोळणी ॥ ४ ॥

( ७४ )

तुझें नित्य सुख ध्यावें येणें मनें । असावें संधानें चरणाचेनि ॥ १ ॥
वासनेविरहित होउनि एकवट । असावें निकट संतसंगें ॥ २ ॥
ऐशी मज कृपा करीं गा विठ्ठला । म्हणविसी आपुला दास जरी ॥ ३ ॥

श्रवणीं तुझें नाम ऐकावें आवडी । चित्तें देउनि बुडी प्रेमडोहीं ॥ ४ ॥
नयनीं तुझें रूप देखावें सर्वत्र । व्हावे भूतमात्र सखे माझे ॥ ५ ॥
वदनीं तुझें नाम गावें निर्विकल्प । धरोनि तुझें रूप हृदयकमळीं ॥ ६ ॥
काया संतांपायीं जावी लोटांगणीं । तें भाग्य अनुदिनीं देईं बापा ॥ ७ ॥
हेंचि माझें व्रत हेंचि तप तीर्थ । करावें दास्यत्व संतांचें हें ॥ ८ ॥
अनुदिनीं व्हावा संताचा हा संग । असावा अनुराग कीर्तनाचा ॥ ९ ॥
मानाचा मज ओस अपमानीं उल्हास । देईं तुझा ध्यास सर्व काळ ॥ १० ॥
नामा म्हणे विठोबा तरीच शरणागत । नाहीं तरी पतित म्हणती मज ॥ ११ ॥

७५

बाळका स्तनपान माता न करी ते । टाकिलें परतें चरणीं लोळे ॥ १ ॥
हातीं घेउनि शिपटी माय लागे पाठीं । चरणीं घाली मिठी परतें नोहे ॥ २ ॥
तैसें माझें मन तुजलागीं देवा । न विसंबे केशवा क्षणभरी ॥ ३ ॥
चातका न लभे पाणी तृषाक्रांत मनीं । वाटे पाहे गगनीं जीवनाची ॥ ४ ॥
निराळीं पीयूषें वर्षे तयालागीं । आळवितां वेगीं मेघराया ॥ ५ ॥
वाळलें हें तृण न संडी हो क्षीर । तैसें भक्तीं स्थिर मन राहे ॥ ६ ॥
नामा म्हणे या जन्माचियासाठीं । चरणी घालीं मिठी परता नोहें ॥ ७ ॥

७६

देवा माझें मन आणि तुझे चरण । एकत्र करोन दिधली गांठी ॥ १ ॥
होणार तें हो गा सुखें पंढरिनाथा । कासया शिणतां वायांवीण ॥ २ ॥
माझिया अदृष्टीं ऐसेंचि पैं आहे । सेवावे तुझे पाये जन्मोजन्मीं ॥ ३ ॥
असतां निरंतर येणें अनुसंधानें । प्रारब्ध भोगणें गोड वाटे ॥ ४ ॥
हृदयीं तुझें रूप वदनीं तुझें नाम । बुद्धि हे निष्काम धरिली देवा ॥ ५ ॥
नामा म्हणे तुझीं पाउलें चिंतितां । झाली कृतकृत्यता जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

(७७)

गाणीं मी गाइलों भाटीं वाखाणिलों । जन्मोनियां झालों दास तुझा ॥ १ ॥
आतां माझी लाज राखें नारायणा । झालों केंविलवाणा देशोदेशीं ॥ २ ॥
माये दुऱ्हाविलों मोहें मोकलिलों । सोय पैं चुकलों संसाराची ॥ ३ ॥
विषया विटलों गोत्रजां तुटलों । जन्मोनी पैं आलों तुझे पायीं ॥ ४ ॥
षड्वर्गीं सांडिलों प्रवृत्ती दंडिलों । मीपणा मुकलों मायबापा ॥ ५ ॥
नामा म्हणे तुझ्या चरणाची आवडी । लागली न सोडी चित्त माझें ॥ ६ ॥

(७८)

तूं माय माउली म्हणोनि आस केली । विठ्ठले पाहिली वाट तुझी ॥ १ ॥
मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठीण कैसें झालें हृदय तुझें ॥ २ ॥
तुजवीण जिवलग मज कोण होईल । तो माझें जाणेल जडभारी ॥ ३ ॥
आम्ही अपराधी तुझे शरणागत । तुजविण माझें हित कोण करी ॥ ४ ॥
करुणाकल्लोळ वाणी अमृतसंजीवनी । चिंतिल्या निर्वाणीं पाव वेगें ॥ ५ ॥
नामा म्हणे तुजवीण झालों परदेशी । केव्हां सांभाळिसी अनाथनाथा ॥ ६ ॥

(७९)

तुझें रूप माझ्या दाखवीं मनातें । मग तुझ्या चरणांतें न विसंबें ॥ १ ॥
कां मज शिणविसी थोडियाकारणें । काय तुझें उणें होइल देवा ॥ २ ॥
चातकाची तहान पुरवी जळधर । काय त्याचें सरे थोरपण ॥ ३ ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ॥ ४ ॥
कूर्मी अवलोकी आपुलिया बाळा । काय तिच्या डोळां दृष्टी नासे ॥ ५ ॥
नामा म्हणे देवा तुझाचि भरंवसा । अनाथां कोंवसा तूंचि होसी ॥ ६ ॥

(८०)

तुझा विष्णुदास म्हणताती जगीं । नाहीं माझे अंगीं प्रेमभावो ॥ १ ॥
तेणें थोर लाज वाटे पंढरिराया । ये माझ्या हृदया एक वेळां ॥ २ ॥

द्वैताद्वैतभाव आहे माझे ठायीं । अनुभव नाहीं स्वरूपाचा ॥ ३ ॥
देखोवेखीं बैसें संतांचे संगतीं । नाहीं माझे चित्तीं ध्यान तुझें ॥ ४ ॥
नामा म्हणे माझा उजळ करीं माथा । भेटी देउनि संतां निरवीं मज ॥५॥

( ८१ )

जननिये जिवलगे ये वो पांडुरंगे । शिणलों भेटी दे गे एक वेळां ॥ १ ॥
त्राहें त्राहें त्राहें कृपादृष्टी पाहें । येऊनियां राहें हृदयामाजी ॥ २ ॥
वासनेच्या संगें शिणलें माझें चित्त । विषयाचे आघात पडती वरी ॥३॥
नाहीं तुझी सेवा केली मनोधर्में । संसारसंभ्रमें भ्रांत सदा ॥ ४ ॥
नाहीं तुझें नाम गाइलें आवडी । वाळली कुवेंडी त्रिविधतापें ॥ ५ ॥
नामा म्हणे आई धांवें लवलाहीं । बुडतों चिंताडोहीं काढीं मज ॥ ६ ॥

( ८२ )

अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥१॥
सांगें पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासी न ये तुझें ॥२॥
कीर्तनीं बैसतां निद्रे नागविलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥ ३ ॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति । नये माझ्या चित्तीं नामा म्हणे ॥४॥

( ८३ )

न लगे तुझी मुक्ति न लगे तुझी भक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच ॥१॥
माझें मज कळलें माझें मज कळलें । माझें मज कळलें प्रेमसुख ॥ २ ॥
न करीं तुझें ध्यान न लगे ब्रम्हज्ञान । माझी आहे खूण वेगळीच ॥३॥
न करीं तुझी स्तुति न वाखाणीं कीर्ति । धरिलीसे ते युक्ति वेगळीच ॥४॥
न करीं कायाक्लेश इंद्रियां विरोध । माझा आहे बोध वेगळाचि ॥ ५ ॥
नामा म्हणे नाम गाइन निर्विकल्प । येसी आपोआप गिंवसीत ॥ ६ ॥

( ८४ )

तुझे चरण देखोनी हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटे थोर ॥१॥
झणी मज मुक्ति देसी पांडुरंगा । मग मी तवसंगा केवीं मिळें ॥ २ ॥

पंढरीचा आनंद हा सुखसोहळा । कवणाचिया डोळां पाहूं जाऊं ॥ ३ ॥
तुझ्या कथा मज अमृतसंजीवनी । कवणाच्या श्रवणीं ऐकों जावों ॥ ४ ॥
म्हणोनि माझ्या जीवा वाटे जडभारी । उदास मुरारी करिसी क्षणीं ॥५॥
नामा म्हणे मज तुझी चरणसेवा । जन्मोजन्मीं देवा द्यावी मज ॥ ६ ॥

( ८५ )

बाहेरी भीतरी तुजचि मी देखें । चित्त तेणें सुखें वेडावलें ॥ १ ॥
संतसंगें मज पालट हा झाला । पाहतां विठ्ठला रूप तुझें ॥ २ ॥
मीपणासहित आनंदीं बुडालें । न निघे कांहीं केलें चित्त माझें ॥ ३ ॥
नामा म्हणे एक उरलीसे वासना । स्वामीसेवकपणा देईं देवा ॥ ४ ॥

( ८६ )

आधीं मी लटिका वरी लटिकी तुझी माया । भजन ऐसीया पाहसी काय ॥ १ ॥
जाणतां नेणतां नाम तुझें देवा । गाईन केशवा तारीं मज ॥ २ ॥
विषयीं आसक्त भ्रांत माझें मन । कैसें तुझें ध्यान घडेल यासी ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां जाणसी तें करीं । पतितपावन हरी नाम तुझें ॥ ४ ॥

( ८७ )

लटिका मी गाणु लटिका मी नाचणु । संतांसी देखोनु लोचन लावीं ॥ १ ॥
लटिका माझा भाव लटिकी माझी भक्ति । तूं तंव श्रीपति कृपासिंधु ॥ २ ॥
लटिकी माझी क्रिया लटिकें माझें कर्म । परि हें तुझें नाम गातु असें ॥३॥
लटिकें माझें ध्यान लटिकें माझें ज्ञान । तूं तव सहजगुण सत्यरूप ॥ ४ ॥
लटिकी माझी पूजा लटिकें माझें पूजन । लटिकें माझें भजन भावहीन ॥५॥
लटिकें वत्सप्रेत धेनु हे स्वीकारी । तैसें मज करीं म्हणे नामा ॥ ६ ॥

( ८८ )

आम्ही शरणागतीं केलासे सरता । येऱ्हवीं अनंता कोण जाणे ॥ १ ॥

वेदशास्त्रीं पुराणीं उबगोनि सांडिलासी। तो आम्ही धरिलासी हृदयकमळीं २
चतुराशिरोमणि अहो केशीराजा । अंगीकार तुझा केला आम्ही ॥ ३ ॥
सहस्त्रैक नामीं झालासी संपन्न । तरि हेंही भूषण आमुचेंचि ॥ ४ ॥
येऱ्हवीं त्या नामाची कोण जाणे सीमा । पाहें मेघश्यामा विचारोनी ॥५॥
होतासि क्षीरसागरीं अनाथाचे परी । लक्ष्मी तेथें करी करणसेवा ॥ ६ ॥
तेही तंव जाण आमुची जननी। तूं तिये वांचोनि शोभसी कैसा ॥ ७ ॥
तुज नाहीं नाम रूप जाति कुल। अनादीचें मूळ म्हणती तुज ॥ ८ ॥
आम्ही भक्त तरी तूं भक्तवत्सल। ऐसा प्रगट बोल जगामाजी ॥ ९ ॥
ऐसी आमुचेनि भोगिसी थोरिव । आमुचा जीव भाव तुझ्या पायीं ॥१०॥
नामा म्हणे केशवा जरि होसी जाणता। तरि या बोला उचिता प्रेम देईं ११

( ८९ )

विषयीं आसक्त झालें माझें मन । न करीं तुझें ध्यान पंढरिराया ॥ १ ॥
नाथिले संकल्प करी नानाविध । तेणें थोर खेद पावतसें ॥ २ ॥
ऐसा मीं अपराधी दुराचारी देवा । भेटसि केशवा कवणे परी ॥ ३ ॥
आयुष्य सरो परी न सरे कल्पना । भोगवी यातना नानाविध ॥ ४ ॥
जन्ममरण कष्ट भोगितां संकटीं । होतसे हिंपुटी येरझारीं ॥ ५ ॥
मायामोहोरत भ्रांत माझें चित्त । चुकलों निजहित नारायणा ॥ ६ ॥
तूं अनाथकैवारी म्हणोनि धांवा करीं । सोडवीं मुरारी म्हणे नामा ॥ ७ ॥

( ९० )

जीवन्मुक्त केले नामाचे गजरीं । सेवक अधिकारी विठोबाचे ॥ १ ॥
कांहीं उतराई होऊं तुज देवा । उदारा केशवा मायबापा ॥ २ ॥
अंतरीं देऊनि प्रेमाचा जिव्हाळा । मुक्तीचा सोहळा भोगवीसी ॥ ३ ॥
नामा म्हणे आम्हा दीनाचें माहेर । हृदयीं निरंतर ध्यान करूं ॥ ४ ॥

( ९१ )

तुझ्या चरणीं माझ्या मनें दिली बुडी । इंद्रियें बापुडीं वेडावलीं ॥ १ ॥
आतां विषयसुख जाणावें कवणें । जाणोनी भोगणें कवणें स्वामी ॥ २ ॥
देह सहजस्थिती राहिला निष्काम । हृदयीं सदा प्रेम वोसंडत ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करीं तुज ॥ ४ ॥

( ९२ )

झणी दृष्टि लागे तुझ्या सगुणपणा । जेणें माझ्या मना बोध केला ॥ १ ॥
अनंतां जन्मींचें विसरलों दुःख । पाहतां तुझें मुख पांडुरंगा ॥ २ ॥
योगियांच्या ध्यानीं ध्यातां नातुडसी । तो तूं आम्हापाशीं मागें पुढें ॥ ३ ॥
नामा म्हणे जीवें करिन निंबलोण । विटेसहित चरण वोंवाळीन ॥ ४ ॥

( ९३ )

आतां होणार तें हो कां पंढरिनाथा । न सोडीं सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥
हृदयीं तुझें ध्यान मुखीं जपें नाम । हाचि नित्य नेम सर्व माझा ॥ २ ॥
आम्ही तुझी देवा धरियेली कास । न करीं उदास पांडुरंगा ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा भक्तजनवत्सला । क्षण जीवावेगळा न करीं मज ॥ ४ ॥

( ९४ )

होईन संतांचा वोळगणा । दास डिंगर पोषणा ॥ १ ॥
प्रेम द्यावें नारायणा । भूतदया परिपूर्णा ॥ २ ॥
संतचरणींचे रज । हेंचि सर्व तीर्थ मज ॥ ३ ॥
सेविन संत–उच्छावळी । तेणें पवित्र माझी कुळी ॥ ४ ॥
राखेन संतांचें मी द्वार । तें मज वैकुंठाहूनि थोर ॥ ५ ॥
नामा म्हणे पंढरिनाथा । न मागें आन कांहीं सर्वथा ॥ ६ ॥

(९५)

हेंचि देवापें मागत । चरणसेवा अखंडित ॥ १ ॥
जन्म हो कां भलते याती । परी न चुको तुझी भक्ति ॥ २ ॥
वास द्यावा पंढरीचा । सदा संग हरिदासांचा ॥ ३ ॥
नामा विनवी पुढतपुढती । हेंचि देगा कमळापति ॥ ४ ॥

(९६)

कां हो मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें झालें चित्त तुझें ॥१॥
करुणाकल्लोळणी अमृतसंजीवनी । चिंतिल्या निर्वाणीं पावें वेगीं ॥२॥
अपराधी अनाथ जरि झालें अमंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा॥३॥
नामा म्हणे विठ्ठले आलों मी तुजपाशीं । केधवां भेटसी अनाथनाथा ४

(९७)

भुक्ति मुक्ति मागों तुज । माझे हांसती पूर्वज ॥ १ ॥
मज प्रेम पढियें देवा । न मागें आन कांहीं केशवा ॥ २ ॥
चाड धरीन ब्रह्मज्ञानीं । तरि मज व्यर्थ व्याली जननी ॥ ३ ॥
मोक्ष मागूं तुजप्रती । संत छळवादें हांसती ॥ ४ ॥
होऊं सिद्धीचा साधिता । दैवें सांडिलें सर्वथा ॥ ५ ॥
नामा म्हणे तूं जाणसी । माझा भाव हृषीकेशी ॥ ६ ॥

(९८)

मनुष्य करिसी तरी भक्तीचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ १ ॥
श्वान करिसी तरी उच्छिष्टाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥२॥
पक्षी करिसी तरी चारियाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ३ ॥
झाड करिसी तरी तुळसीचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ४ ॥
वृक्ष करिसी तरी मंडपमेखाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥५॥

पाषाण करिसी तरी रंगशिळेचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥६॥
उदक करिसी तरी सडियाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥७॥
नामा म्हणे विठो कीर्तनाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ८ ॥

( ९९ )

अठ्ठावीस युगें उभा विटेवरी । मुद्रा अगोचरी लावूनियां ॥ १ ॥
ध्यान विसर्जन केधवां करिसी । नेणवे कवणासी ब्रह्मादिकां ॥ २ ॥
पाहतां तुजकडे माझें मीपण उडे । भेदाचें सांकडें हारपलें ॥ ३ ॥
तुजपाशीं असतां मुकिजे जीवित्वा । ठकले तत्त्वतां नेणों किती ॥ ४ ॥
नामा म्हणे स्वामी कृपादृष्टी पाहें । मन पायीं राहे ऐसें कीजे ॥ ५ ॥

( १०० )

आम्ही विष्णुदास सांडिली वासना । तुम्ही नारायणा कळों आलां ॥१॥
अज्ञान बाळक ठकविला धुरु । तैसा मी अधीरु नव्हें देवा ॥ २ ॥
उपमन्या बाळका दुधाचा पैं छंद । तैसा मी मतिमंद नोहें देवा ॥ ३ ॥
शरण आला तुज मूर्ख बिभीषण । लंका राज्य तेणें मागितलें ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझें न लगे आम्हां कांहीं । वास सदा देईं चरणाजवळी ॥५॥

( १०१ )

काखे पान अंगणीं उभें उगें । भोजन मागें रामनाम ॥ १ ॥
आणिक नाहीं मज चाड । रामनाम गोड जेवूं घाला ॥ २ ॥
अन्नरस सेवितां मंद पडलें । तुझेंचि नामें रुचीस आलें ॥ ३ ॥
इच्छाभोजनीं तूं एक दाता । नामा विनवी पंढरिनाथा ॥ ४ ॥

( १०२ )

चोरां ओढोनियां नेईजे पैं शूळीं । चालतां पाउलीं मृत्यु जैसा ॥ १ ॥
तैसी परी मज झाली नारायणा । दिवसेंदिवस उणा होत असे ॥ २ ॥

वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी । वेंचे तैसी घडी आयुष्याची ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंही लहरीचें जळ । आटत सकळ भानुतेजें ॥ ४ ॥

( १०३ )

भक्तीची अपेक्षा धरोनि अंतरीं । राहे भीमातीरीं पंढरीये ॥ १ ॥
अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां । निगम सर्वथा नव्हे देखा ॥ २ ॥
कटीं कर उभा शिणलें शरीर । धरोनि निर्धार भक्तिभावो ॥ ३ ॥
नामा म्हणे आतां नको खटपट । आमुचे बोभाट नको पाहूं ॥ ४ ॥

( १०४ )

वाजविली डांक चौक ठेवियला । ठायीं पंढरीचे विठले तुज हाकार केला॥ १॥
रंगा येई वो खेचरे विठाई सुंदरी । तुझीं पाउलें गोजिरीं कैं मी दृष्टी देखेन॥ २॥
पाजळला दीप फिटला अंधकारु । न लावा उशीरु पांडुरंगे माउलिये ॥ ३॥
तमोगुणाचा रज जाळुनि धूप केला । उशीर कां लाविला पांडुरंगे माउलिये॥ ४
तनुमनाची मूद टाकीन तुजवरोनी । वैकुंठवासिनी पांडुरंगे माउलिये ॥ ५॥
अहंकार दैवतें झडपिलें नामयासी । येउनियां रंगासी रंग राखीं आपुले॥ ६॥

( १०५ )

साचपणें ब्रीदा सांडवीन तुझ्या । आतां केशीराजा पण हाचि ॥ १ ॥
लबाड तूं देवा लबाड तूं देवा । लबाड तूं देवा ठावा आम्हा ॥ २ ॥
काय मूर्खपणें सांगशील गोष्टी । थोरपणें मोठीं पुरे आतां ॥ ३ ॥
नामा म्हणे काय खवळिसी आम्हा । लाज नाहीं तुम्हा कोणेविशीं॥ ४॥

( १०६ )

विणा घेऊनियां करीं । उभा राउळामाझारीं ॥ १ ॥
तहान भूक हारपली । छंद लागला विठ्ठलीं ॥ २ ॥

कन्या पुत्र बाप माये । त्यांचा आठव तो नये ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंचि देईं । तुझे पाय माझे डोईं ॥ ४ ॥

( १०७ )

नामयाचें प्रेम केशवची जाणे । केशवासी राहणें नाम्यापाशीं ॥ १ ॥
केशव तोचि नामा नामा तोचि केशव । प्रेमभक्तिभाव मागतसे ॥ २ ॥
विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं । प्रेमाची शिदोरी मागतसे ॥ ३ ॥

( १०८ )

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥
हेंचि घडो मज जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ २ ॥
मुखीं सदा नाम संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे नित्य महाद्वारीं । कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

( १०९ )

किती तुला देवा येऊं काकुळती । काय तें संचितीं लिहिलें असे ॥१॥
केली कां हो सांडी माझी हृषीकेशी । आम्ही कोणापाशीं तोंड वासूं॥२॥
ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं । तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥
समूळ घेतला पृथ्वीचा भार । माझाचि जंजार काय तुला ॥ ४ ॥
नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा विठोपायीं मिठी घाली ॥ ५ ॥

( ११० )

काशिये कनोजा द्वारके गुजरू । कानडा विठ्ठलु पंढरीये ॥ १ ॥
मायबापें माझीं विठ्ठल रुक्मिणी । द्वारका पाटणीं माहियेर ॥ २ ॥
पर्वतशिखरीं बद्रीनारायण । सोयरा सज्जन पंढरीये ॥ ३ ॥
बारसी भगवंत तेरसी तिखया । विठ्ठल सोयरीया पांडुरंगा ॥ ४ ॥

विटेवरी नीट समचरणीं उभा । पुंडलीकाचे लोभा भक्तीलागीं ॥५॥
विष्णुदास नामा चरणीं उतावेळु । करावा सांभाळू अपत्याचा ॥६॥

( १११ )

गरुडावरी हरी बैसोनियां यावें । आम्हासि रक्षावें दीनबंधू ॥ १ ॥
अच्युता केशवा मुकुंदा मुरारी । येई लवकरी नारायणा ॥ २ ॥
ऐकोनिया धांवा धांवला अनंत । उभा गरुडासहित मागें पुढें ॥३॥
वैजयंती माळ किरीट कुंडलें । नामयानें केलें निंबलोण ॥ ४ ॥

( ११२ )

कोठें मी रे तुझा धरूं गेलों संग । लावियलें जग माझे पाठी ॥ १ ॥
सर सर परता अगुणा गोपाळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ २ ॥
रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति । न देखें भोवतीं मी हीं माझीं ॥ ३ ॥
नामा म्हणे तुम्ही जीवींच बैसला । बोलाचिया बोला दावोनियां ॥ ४ ॥

( ११३ )

स्वामी एक व्हावा तुजचिसारखा । करी निज सेवका जगद्वंद्य ॥ १ ॥
देऊनि प्रेमभातें पाळिसी तूं बाळें । न करिसी जीवावेगळें क्षणभरी ॥ २ ॥
बळि भीष्म नारद उद्धव रुक्मांगद । हनुमंत प्रल्हाद अंबऋषि ॥ ३ ॥
नामा म्हणे हेंचि देई जन्मोजन्मीं । मी दास तूं स्वामी केशिराजा ॥ ४ ॥

( ११४ )

बहुत जन्माशेवटीं तुजशीं झाली भेटी । बहु मी हिंपुटी झालों थोर ॥ १ ॥
बहु कीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं । बहुत केले सुखी शरणागत ॥ २ ॥
बहुतां आसक्त बहुतां ओळंगणा । बहुत विटंबना झाली माझी ॥ ३ ॥
बहु फेरे पाहिले बहु दुःख साहिलें । बहु चित्तें वाहिलें दुर्भरचि ॥ ४ ॥

बहुत काळ गेले बहु अन्याय केले । बहु नाहीं जोडिलें नाम तुझें ॥ ५ ॥
ऐसा मी अपराधी पावें कृपानिधी । बहु संतांसन्निधीं ठेवीं नामा ॥ ६ ॥

( ११५ )

पुलक घर्म रोमांच नाहीं जंव उठले । सजळ नाहीं झाले नयन जंव ॥ १ ॥
हरिभक्तीचें सुख कळलें जे म्हणती । लटकें बोलिजेति उभयलोकीं ॥ २ ॥
ऐसा भक्तिप्रेमा देईं जी देवा । सर्व भावें सेवा घडे तुझी ॥ ३ ॥
श्रवणीं ऐकतां नाम वाचे भव बोले । नाहीं सुखावलें मन त्याचें ॥ ४ ॥
श्रीहरीचें नाम म्हणवितां न म्हणे । सहज उच्चारणें कैंचें त्यासी ॥ ५ ॥
दर्दुराचेपरी जिव्हा चटचटी । नाम सांडोनि गोष्टी राज्याची करी ॥ ६ ॥
देवाच्या मूर्ति संत महंत देखोनी । न वचे लोटांगणी भावें त्यांसी ॥ ७ ॥
न लावी त्यांचें रज टकमकां पाहात । बुजवण जैसें सेत राखे तैसें ॥ ८ ॥
ऐसे कैक प्राणी आहेत मूढमती । हित सांगतां चित्तीं दुःख वाटे ॥९॥
नामा म्हणे केशवा मी तुझें दीन । नेणें तुजवांचोन आन दुजा ॥१०॥

( ११६ )

गोक्षीर लाविलें आंधळिया मुखीं । तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥
तैसें देवा तुझें नाम निरंतर । जिव्हेसि पाझर अमृताचे ॥ २ ॥
सोलुनियां केळें साखरें घोळिलें । अंधारीं खादलें तरी गोड ॥ ३ ॥
द्राक्षफळ घड सेवितां चोखड । तयाहूनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥
आळुनियां क्षीर तुपाचिये आळें । कालविलें गुळें गोड जैसें ॥ ५ ॥
जाणोनियां नामा करी विनवणी । अमृताचि खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

( ११७ )

अंतकाळीं मी परदेशी । ऐसें जाणोनी मानसीं ।
म्हणोनियां हृषीकेशी । शरण आलों मी तुज ॥ १ ॥

नवमास गर्भवासीं । कष्ट झाले तया मातेसी ।
तीही निष्ठुर झाली कैसी । अंतीं दूर राहिली ॥ २ ॥
जे जे बापासी आवड । मुखीं घाली करी कोड ।
जेव्हां लागे यमवोढ । तेव्हां दूर राहिला ॥ ३ ॥
बंधुबहिणीचा कळवळा । तो तूं जाणसी दयाळा ।
जेव्हां पडली यमशृंखळा । तेव्हां दुरी राहिलीं ॥ ४ ॥
कन्या पुत्रादिक बाळ । हे तों स्नेहाचे स्नेहाळ ।
तुझे दर्शनाविण व्याकुळ । अंतीं दूरीं राहिलीं ॥ ५ ॥
देह गृहाची कामिनी । ती तों राहिली भुवनीं ।
अंतीं जळतसें स्मशानीं । अग्नीसर्वं एकला ॥ ६ ॥
मित्र आले गोत्रज आले । ते तों स्मशानांतुनी परतले ।
सर्वीं टाकोनियां गेले । एकलाचि स्मशानीं ॥ ७ ॥
ऐसा जाणोनि निर्धार । मग मज आलासे गहिंवर ।
दाही दिशा अंधकार । मग मज कांहीं न सुचे ॥ ८ ॥
ऐसें जाणोनियां पाहीं । मनुष्यजन्म मागुता नाहीं ।
नामा म्हणे तुझे पायीं । ठाव देईं विठ्ठला ॥ ९ ॥

( ११८ )

वायां ताडातोडी केली माझ्या मनें । राहिलों लपोन तुझे पायीं ॥ १ ॥
नको नको मज कल्पनेचा संग । आलासे उद्वेग नारायणा ॥ २ ॥
कामक्रोध लोभ पाठीं लागों येती । झणी त्यांचे हातीं देसी देवा ॥ ३ ॥
नामा म्हणे होसी अनाथांचा कैवारी । ब्रीदें चराचरीं वर्णिताती ॥ ४ ॥

( ११९ )

बा भेटीचें आर्त उत्कंठित चित्त । न राहे निवांत कवणे ठायीं ॥ १ ॥
जया देखें तया पुसें हेचि मात । कैं मज पंढरिनाथ बोलावील ॥ २ ॥

माहेरींची आस दसरा दिवाळी । बाहे ठेवुनि निढळीं वाट पाहे ॥ ३ ॥
कृपेचा सागरु विठो लोभापरु। परि कां माझा विसरू झाला त्यासी ॥४॥
विटेसहित चरण देईन आलिंगनु । तेणें माझी तनु वोल्हावेल ॥ ५ ॥
ऐसा निलाजिरा नामा कंठीं धरूनि प्राण । करितो तुझें ध्यान रात्रंदिवस ॥६॥

(११०)

सदां पैं परिपूर्ण जयाचें रूपडें । तेथेंचि माजीवडें मन करीं ॥ १ ॥
होईल उद्धार सुटेल संसार । सर्व मायापूर दुरी होय ॥ २ ॥
कंटाळा कायेचा दुरावा मायेचा । हेंचि जप वाचा स्मरें राम ॥ ३ ॥
नामा म्हणे करी सर्व हरि हरी । राम हें उत्तरीं वाखाणीं पां ॥ ४ ॥

(१११)

नेत्र माझे रोडले आठवे माहेर । कैं भेटेन निरंतर बाईयांनो ॥ १ ॥
चतुर्भुज विठ्ठल कैं देखेन डोळां । भक्तांचा जिव्हाळा जीव माझा ॥२॥
येणें शोकें रे वाळलों शरीरीं । आठव तो हरी मी काय सांगू ॥३॥
चारी भुजा उचलोनि क्षेम देईल । कैं मज नेईल पंढरपुरा ॥ ४ ॥
कामीं चित्त नलगे आतां कांहीं मज । कैं भेटेल राजा पंढरीचा ॥ ५ ॥
त्यासि आठवितां हृदय वो फुटे । तो कैं मज भेटे बाप माझा ॥ ६ ॥
येणें देह न पवती मग काय येउनि करिती । सांगा काकुळती रखुमाईसी ॥७॥
वामांगीं रुक्मिणी कैं देखेन दोन्ही नयनीं । फेडीन पारणीं डोळीयांचीं ॥ ८ ॥
जंव जंव आठवती तंव तंव उभड येती । कोणी नसांगती विठ्ठलासी ॥ ९ ॥
ऐसें श्रवणींचें सुख कैचेंन वो देखें । येथ येवोनी बहुतेकें काय करिती ॥१०॥
गरुडटके अवघे आकाशीं वोळले । येवोनी सांगितलें विष्णुलोकीं ॥ ११ ॥
मग जावोनियां तया ठाया पाहें पंढरिराया । लागेन मी पायां तयाचिये॥ १२॥

याचि लागोनियां आलों लवडसवडीं । सांडियेली थडी मग रोखिलासी ॥ १३ ॥
गरुडावरी आरूढ बाप माझा झाला । मज न्यावया आला बाईयांनो ॥ १४ ॥
येणें हर्षें संतोष कोठेंच न माये । भेटला विठ्ठल माय रुक्मिणीसहित ॥ १५ ॥
नामा जातसे एकला माहेरा पंढरपुरा । हरि दातारा संसारा वेगळें करीं ॥ १६ ॥

(१२२)

तुझा माझा देवा कां रे वैराकार । दुःखाचे डोंगर दाखविसी ॥ १ ॥
बळें बांधोनियां देशी काळाहातीं । ऐसें काय चित्तीं आलें तुझ्या ॥ २ ॥
आम्ही देवा तुझी केली होती आशा । बरवें हृषीकेशा कळों आलें ॥ ३ ॥
नामा म्हणे देवा करा माझी कींव । नाहीं तरी जीव घ्यावा माझा ॥ ४ ॥

(१२३)

अरे अलगटा माझीया तूं मना । किती रानोराना हिंडविसी ॥ १ ॥
विठोबाचे पायीं दृढ घालीं मिठी । कां होसी हिंपुटी वांयाविण ॥ २ ॥
क्रिया कर्म धर्म तुज काय चाड । जवळी असतां गोड प्रेमसुख ॥ ३ ॥
संकल्प विकल्प सांडीं तूं समूळ । राहें रे निश्चळ क्षणभरी ॥ ४ ॥
आपुलें निजहित जाण तूं त्वरित । वासनारहित होईं वेगीं ॥ ५ ॥
नामा म्हणे तुज ठाईंचें कळतें । सोसणें कां लागते गर्भवास ॥ ६ ॥

(१२४)

प्रेमामृतसरिता पवित्र हरिकथा । त्रिभुवनींच्या तीर्थां मुगुटमणी ॥ १ ॥
तेथें माझ्या मना होईं क्षेत्रवासी । राहें संतांपाशीं सुख घेतां ॥ २ ॥
ऐहिक्य परत्र दोन्हीं समतीरीं । परमानंदलहरी झेंपावत ॥ ३ ॥
मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली । शिणल्या साउली विषयासक्तां ॥ ४ ॥
परमहंसकुळ सनकादिक सकळ । राहिले निश्चळ करोनि चित्त ॥ ५ ॥
नामा म्हणे मना सोईरे हरिजन । तारक त्यांचे चरण दृढ धरीं ॥ ६ ॥

(१२५)

परब्रह्म विश्वाकारें अवतरलें भक्तिकाजा।
मूर्ति सुनीळु सांवळी केशिराजु स्वामी माझा ॥ १ ॥
गोविंदा रे तुझें ध्यान लागो मना।
पाविजे प्रेमपद निर्मळ होत ज्ञान ॥ २ ॥
मन हें वोवरी असे सुमनाचे चित्रशाळीं।
दोन्ही चरण सकुमार वरी अष्टदळकमळीं ॥ ३ ॥
संध्याराग रातले सुनीळ दिशा तळवटीं।
ध्वज वज्रांकुश चिन्हें साजती गोमटीं ॥ ४ ॥
इंदिरा तिथें थोकली तिच्या सुखा नाहीं पारु।
ते चरणीं स्थिर झाली म्हणोनि म्हणती लक्ष्मीवरु ॥ ५ ॥
घवघवीत वांकी चरणीं ब्रीदाचा तोडरु।
नखप्रभा फांकली तिनें लोपला दिनकरु ॥ ६ ॥
सृष्टि घडीत मोडीत उत्पत्ति स्थिति प्रळय अवघें नवें।
तो चतुर्मुख ब्रम्हा चरण पूजितो स्वभावें ॥ ७ ॥
देवाधिदेव शंभु कैलासींचा राणा।
गंगा मस्तकीं धरिली तिचा जन्म अंगुळीं चरणा ॥ ८ ॥
दैत्यकुळीं जन्मला देव पळती ज्याचेनि धाकें।
पावो पाठीसी लागला म्हणवूनि दारवंटा राखे ॥ ९ ॥
शेष वर्णितां श्रमला वेद परतले माघारी।
नामा म्हणे अरे मना याचे चरण धरीं झडकरी ॥ १० ॥

(१२६)

जन्म मरणाचें मज भय दाविसी। तें म्यां हृषीकेशी स्वीकारिलें ॥ १ ॥
आतां माझी चिंता तुज कां पंढरिनाथा। असों दे भलता भलते ठायीं ॥ २ ॥

सुखदुःख भोगणें माझें मीच जाणें । तुज तंव सोसणें नलगे कांहीं॥३॥
नामा म्हणे माझे हेचि मनोरथ । होइन शरणागत जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

( १२७ )

व्यापकापरीस मन म्यां केलें वाड । सांपडलें गोड प्रेमसुख ॥ १ ॥
जिकडे पाहें तिकडे विठोबा अवघा । भीमा चंद्रभागा पुंडलीक ॥ २ ॥
बाहेरी भीतरी सर्व निरंतरीं । हे ब्रम्हांड पंढरी झाली मज ॥ ३ ॥
महुरले तरुवर फळीं पुष्पीं भार । तेचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥
आवडीचा आनंदु तोचि वेणुनादु । अनुभव गोविंदु गोपवेषें ॥ ५ ॥
नामा म्हणे विठो भक्तीचा वालभा । मागें पुढें उभा सांभाळित ॥ ६॥

( १२८ )

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३ ॥
परेहूनि परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ४ ॥
सर्व सत्ता आली हाता । नामयाचा खेचर दाता ॥ ५ ॥

( १२९ )

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा । तुझी आण पंढरिनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालविं माझा ॥ ४ ॥

( १३० )

मीच माझा देव मीच माझा भक्त । मी माझा कृतार्थ सहज असें ॥१॥
बंध आणि मोक्ष मायेची कल्पना । पडली होती मना कैसी भ्रांति॥२॥

विठ्ठलें बिचारें दाखविलें सुख । होतें जें असंख्य हारपलें ॥ ३ ॥
नामा म्हणे सोय सांपडली निकी । झालों एकाएकीं हरिचा दास ॥४॥

( १३१ )

कस्तूरीचा टिळा रेखिला कपाळीं । तेणें ते शोभली मूर्ति बरी ॥ १ ॥
बरवा बरवा विठ्ठल गे बाई । वर्णावया साही शिणताती ॥ २ ॥
श्रीवत्सलांच्छन वैजयंती गळां । नेसला पाटोळा तेजःपुंज ॥ ३ ॥
पाउलें समान विटेवरी नीट । नामा म्हणे भेट ध्यावी त्यांची ॥ ४ ॥

( १३२ )

विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन । विठल स्मरणं प्रेमपान्हा ॥ १ ॥
विठ्ठलचि ध्यावों विठ्ठलचि गावों । विठ्ठलचि पाहों सर्वांभूतीं ॥ २ ॥
विठ्ठलापरतें न दिसे सर्वथा । कल्प येतां जातां गर्भवास ॥ ३ ॥
नामा म्हणे चित्तीं आहे सुखरूप । संकल्प विकल्प मावळती ॥ ४ ॥

( १३३ )

ब्रह्म अविनाश आनंदघन । याहूनि चरण गोड तुझे ॥ १ ॥
तें जीवें न सोडी अगा पंढरिनाथा । जाणसी तत्त्वतां हृदय माझें ॥२॥
परात्पर वस्तु जे कां अपरंपार । तियेचा साक्षात्कार पाय तुझे ॥ ३ ॥
सच्चिदानंदघन जेथें हरपलें मन । त्याहूनि चरण गोड तुझे ॥ ४ ॥
नामा म्हणे तुझीं पाउलें सकुमार । तें माझें माहेर विटेवरी ॥ ५ ॥

( १३४ )

देहाचें ममत्व नाहीं जों तुटलें । विषयीं विटलें मन नाहीं ॥ १ ॥
तंव नित्यसुख कैसेनि आतुडे । नेणती बापुडे प्रेमसुख ॥ २ ॥
मीच एक भक्त मीच एक मुक्त । म्हणवी पतित दुराचारी ॥ ३ ॥
नामा म्हणे तुझे कृपेवीण देवा । केंवि जोडे ठेवा विश्रांतीचा ॥ ४ ॥

( १४० )

एकचि हें तत्व एकाकार देशीं । एक तो नेमेसीं सर्व जगीं ॥ १ ॥
ऐसें ब्रम्ह पाहा आहे सर्व एक । नलगे तो विवेक करणें कांहीं ॥ २ ॥
मिथ्या हें डंबर मायामथितार्थ । हरि हाचि स्वार्थ वेगीं करीं ॥ ३ ॥
नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद । नाहीं भेदाभेद ब्रम्हपणीं ॥ ४ ॥

( १४१ )

दिशा फेरफेरे कष्टशील सैरा । किती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥
विठ्ठलाचे नामीं दृढ धरीं भाव । येर सांडीं वाव मृगजळ ॥ २ ॥
भुक्तिमुक्ति सिद्धि जोडोनियां कर । करिती निरंतर वोळगण ॥ ३ ॥
नामा म्हणे जना मानीं पैं विश्वास । मग तुज गर्भवास नव्हे नव्हे ॥ ४ ॥

( १४२ )

जाइजणा देह जाईल नेणसी । लौकिक मिरविसी लाजसी ना ॥ १ ॥
माझें माझें माझें मानिसी निभ्रांत । करिसी अपघात रात्रंदिवस ॥ २ ॥
सांग तूं कोणाचा आलासि कोठोनि । दृढ बुद्धि मनीं विचारीं पां ॥३॥
धन संपत्तिकरोनि मदें मातलासी । पुढत पुढतो पडसी गर्भवासीं ॥ ४ ॥
पुत्र कलत्र दारा यांचा झालासि म्हणियारा।यांच्या पातकाचा भारा वाहशील५
अंतीं यमपाशीं बांधोनियां नेती । कवतुक पाहती सकळजन ॥ ६ ॥
नानापरी तुज करिती यातना । सांग तेथें कोणा बोभाशील ॥ ७ ॥
धन पुत्र दारा तुज नये कामा । एका मेघःश्यामावांचोनियां ॥ ८ ॥
विषयाचेनि संगें भुलशील झणें । भोगीसी पतन रात्रंदिवस ॥ ९ ॥
नामा म्हणे एक ध्यायीं कमळापति । निजाचा सांगाती केशीराज ॥१०॥

( १४३ )

जें जें पुण्य जोडे हरिनामगजरीं । त्याचे वांटेकरी दोघेजण ॥ १ ॥
सावधान श्रोता आणि प्रेमळ वक्ता । जो भजे अनंता निर्विकल्प ॥ २ ॥

तेणें सुखें सुख चढे नित्य नवें । जाणती अनुभवें संतजन ॥ ३ ॥
हातीं सुदर्शन आनंदें कीर्तनीं । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ ४ ॥
प्रीतीच्या वोरसें अभयदान देत । हृदयीं आलिंगित आपुल्या दासां ॥५॥
धर्म अर्थ काम मोक्ष आणि मुक्ति । टाकोनियां येती विश्रांतीसी ॥ ६॥
नामा म्हणे धन्य ते झाले संसारीं । न संडिती वारी पंढरीची ॥ ७ ॥

( १४४ )

कर्मजड मूढ पतित पामर । भवसिंधुपार न टके जया ॥ १ ॥
यालागीं पंढरी केली मुक्तिपेंठ । भक्तीं भूवैकुंठ वसविलें ॥ २ ॥
हेंचि पुंडलिकें मागितलें निकें । जे सर्वथा परलोकें चाड नाहीं ॥ ३ ॥
भक्ति मुक्ति सिद्धि जें जया आवडे । तें तया पवाडे विठ्ठलनामें ॥४॥
न लगती सायास करणें कायाक्लेश । नामाचा विश्वास दृढ धरा ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे चला पंढरीये । भेटों बाप माये पांडुरंगा ॥ ६ ॥

( १४५ )

अवघे सावधान होऊनि विचारा । सोडवण करा संसाराची ॥ १ ॥
अवघा काळ वाचे म्हणा नारायण । वायां एक क्षण जाऊं नेदीं ॥ २ ॥
अवघें हें आयुष्य सरोनि जाईल । मग कोण होईल साह्य तुम्हां ॥३॥
अवघा प्रपंच जाणोनि लटिका । शरण रिघा एका पंढरिराया ॥ ४ ॥
अवघे मायामोहीं गुंतलेति पहा । अवघे सहज आहां जीवन्मुक्त ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे सुखाचेचि व्हाल । जरी मन ठेवाल विठ्ठलपायीं ॥६॥

( १४६ )

अवघे निरंतर करा हा विचार । भवसिंधु पार तरिजे ऐसा ॥ १ ॥
अवघे जन्म वायां गेले विषयसंगें । भुललेति वाउगे मायामोहा ॥२॥
अवघा वेळ करितां या संसाराचा धंदा । वाचे वसो सदा हरीचें नाम ॥३॥

अवघ्या भावीं एका विठलातें भजा । आतें करा पूजा हरिदासांची ॥४॥
अवघें सुख तुम्हां होईल आपैतें । न याल मागुते गर्भवासा ॥ ५ ॥
नामा म्हणे अवघे अनुभवूनि पाहा । सर्व काळीं रहा संतसंगें ॥ ६ ॥

( १४७ )

अवघी हे पंढरी सुखाची वोवरी । अवघा घरोघरीं ब्रह्मानंद ॥ १ ॥
अवघा हा विठ्ठल सुखाचाचि आहे । अनुसरे तो लाहे सर्व सुख ॥२॥
पहावा अवघा नयनीं ऐकावा श्रवणीं । अवघा ध्यावा ध्यानीं अवघ्या मनें ॥३॥
अवघियें आवडी अवघा गावा गीतीं । अवघा सर्वांभूतीं तोचि आहे ॥४॥
अवघा हा जाणावा अवघा हा मानावा । अवघा वाखाणावा अवघी वाचा॥५॥
अवघा वोळखोनि अवघा गिळिजे मनें । अवघा हाचि होणें म्हणे नामा॥६॥

( १४८ )

अवघें हें पवित्र पांडुरंगक्षेत्र । सुखाचि सर्वत्र भरलें असे ॥ १ ॥
अवघा हा विठ्ठल गीतीं गातां गोड । अवघें पुरवी कोड नामें एकें ॥२॥
अवघें जे सांडोनि अनुसरले यातें । अवघें देतो त्यांतें अपुलें प्रेम ॥३॥
अवघी चित्तवृत्ति ठेविती याच्या पायीं । त्यांतें अवघ्या बाहीं आलिंगितो ॥४॥
अवघें आपुलें मन दिल्हें जिहीं यातें । असे त्या सांगातें मागें पुढें॥५॥
अवघ्यासि अनुसरला अवघेंचि विसरला । अवघा नामा झाला सुखरूप॥६॥

( १४९ )

अवघी चित्तवृत्ति एकवटोनि जेणें । अवघा धरिला मनें पांडुरंग ॥ १ ॥
अवघें सुख एक तयासी फावलें । अवघें सफळ झालें जन्म त्याचें॥२॥
अवघीं व्रतें दानें केलीं पैं तयानें । ज्याचें विठ्ठलीं ध्यान मन जडलें॥३॥
नित्य विठ्ठल नाम गर्जती सप्रेम । अवघे नित्य नेम झाले त्यांचे ॥ ४ ॥
अवघा इष्टमित्र बंधु माता पिता । केला आवडता पांडुरंग ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसे अवघे संप्रदाय । मिळोनि धरा पाय विठोबाचे ॥ ६ ॥

( १५० )

सड्या लावी कासे कुटुंबिया तरी । उतरील पैलतीरीं केशीराज ॥ १ ॥
प्रेमाची ती पेटी बांधोनियां पोटीं । उतरी जगजेठी पांडुरंग ॥ २ ॥
अंगें घाली उडी बुडतिया काढी । ऐसे कल्पकोडी तारियले ॥ ३ ॥
तारीयले सत्य हाचि पैं निर्धार । नामा पैलतीर उतरिला ॥ ४ ॥

( १५१ )

दुर्लभ नरदेह झाला तुम्हां आम्हां । येणें साधूं प्रेमा राघोबाचा ॥ १ ॥
अवघे हातोहातीं तरों भवसिंधु । आवडी गोविंदु गाऊं गीतीं ॥ २ ॥
हिताचिया गोष्टी सांगू एकमेकां । शोक मोह दुःख निरसूं तेणें ॥ ३ ॥
एकमेकां करूं सदा सावधान । नामीं अनुसंधान तुटों नेदूं ॥ ४ ॥
घेऊं सर्व भावें रामनाम दीक्षा । विश्वासें सकळिकां हेंचि सांगों ॥ ५ ॥
नामा म्हणे शरण रिघों पंढरिनाथा । नुपेक्षी सर्वथा दीनबंधु ॥ ६ ॥

( १५२ )

जंव हंस काया नव जाय सांडोनी । तंव घेईं ठाकोनि रामनाम ॥ १ ॥
अंतःकाळवेळीं तुझें नव्हे कोण्ही । मी माझें म्हणवूनि भुललासी ॥ २ ॥
राहें निरंतर राघवाचे द्वारीं । तेणें भवसागरीं तरसी बापा ॥ ३ ॥
नवमास माये वाहिलासि उदरीं । आस केली थोरी होसी म्हणुनी ॥ ४ ॥
स्तनपान देऊनि मोहें प्रतिपाळी । तेहि अंतःकाळीं दूर ठाके ॥ ५ ॥
सर्वस्व स्वामिणी म्हणवितली कांता । तेहि केश देतां रडतसे ॥ ६ ॥
म्हणे म्यां मेल्याचें सुख नाहीं देखिलें । तेणें तंव पाळिलें अर्थे प्राणें ॥ ७ ॥
गाई घोडे म्हैसी आणिक त्या दासी । धन त्वां सायासीं मेळविलें ॥ ८ ॥
तुझिया धनाला नाहीं पार लेखा । एकलाचि मूर्खा जासी अंतीं ॥ ९ ॥
हातींच्या मुद्रिका कानींचे ते नग । करोनि लगबग काढिती वेगीं ॥ १० ॥

अंगींचीं लुगडीं फेडोनियां घेती । तुज बांधोनियां नेती यमदूत ॥ ११ ॥
भूमिभार झाला म्हणती वेग करा । नातळती शरीरा इष्टमित्र ॥ १२ ॥
स्मशाना नेऊनि भडाग्नि देऊनि । येती परतोनी सकळ जन ॥ १३ ॥
एकलेंचि येणें एकलेंचि जाणें । पहा दृढ ज्ञानें विचारोनि ॥ १४ ॥
पाप पुण्य दोन्ही अंतींचीं सांगाती । येरें तीं राहती जेथिंचीं तेथें ॥ १५ ॥
ऐसा हा संसार माया वेष्टियला । म्हणोनि दुऱ्हाविला योगीजनीं ॥ १६ ॥
विष्णुदास नामा विनवितसे तुम्हां । क्षणीं परब्रम्हा विसरूं नका ॥ १७ ॥

( १५३ )

धरूनि माझी वृत्ति पाहें माझें मुख । मी सांगतों ऐक जननीये ॥ १ ॥
काया वाचा मनें जें ममत्व माझे ठायीं । तें तूं ठेवीं पायीं विठोबाच्या ॥ २ ॥
मग हा कृपासिंधु न विसंबे तुज । अनाथांचि लाज हाचि राखी ॥ ३ ॥
पाहें पशु गज जळचरें गांजिला । सकाळिकीं सांडिला जिवलगीं ॥ ४ ॥
पीतांबरासहित घालोनियां उडी । सोडविला पाऱ्हेडी अनाथ म्हणुनी ॥ ५ ॥
पांडवांचें करी काज न मनी लाज । म्हणे हे शरण मज सर्वभावें ॥ ६ ॥
पाडसालागोनि जैसी कुरंगिणी । तैसा रानीं वनीं संभाळीत ॥ ७ ॥
प्रल्हादाकारणें झाला पैं पिसाट । देवें रूप विकट धरीयलें ॥ ८ ॥
विदारिला दैत्य आवेशें बहुत । म्हणे माझा भक्त गांजियेला ॥ ९ ॥
जन्मोनी माझे बहु लळे केले । अडचणीं सांभाळिलें अनाथ म्हणोनि ॥ १० ॥
नामा म्हणे याचे दृढ धरिले चरण । कळिकाळापासोन सोडविलें ॥ ११ ॥

( १५४ )

नामावीण मंत्र नाहीं त्रिभुवनीं । ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं ॥ १ ॥
पहा विचारूनि अनुभव तो मनीं । नका आडरानीं क्षणी भरूं ॥ २ ॥
भक्तीविण कोण तरले म्हणती । ते आधीं बुडती भवाब्धींत ॥ ३ ॥
नामा म्हणे नाम ओंकाराचें मूळ । परब्रह्म तें केवळ रामनाम ॥ ४ ॥

( १५५ )

एके हातीं टाळ एके हातीं दिंडी । म्हणे वाचा उदंडी रामनाम ॥१॥
श्रीहरीसारिखा गोसांवी पैं चांगु । फेडिला पैं पांगु जन्मांतरिंचा ॥ २ ॥
ऐसें नृत्य करीं वेडियें बागडें । वदन वांकुडें करूनियां ॥ ३ ॥
चुकलें पाडस कुरंगिणी गिंवसि । तैसा हृषीकेशी न्याहाळी तूतें ॥ ४ ॥
धेनु पान्हाय हुंबरे वत्सातें । तैसा वोरसे तूतें केशिराज ॥ ५ ॥
नामा म्हणे इतुकें न करवे निर्दैवा । तरी वाचेसि केशवा उच्चारीं पां ॥६॥

( १५६ )

न पढावे वेद नको शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ १ ॥
नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ २ ॥
येर क्रियाकर्म करितां हो कळी—। माजि कोण बळी तरले सांगा ॥४॥
नामा म्हणे गुज सांगितलें संतीं । यापरती विश्रांति आणिक नाहीं॥४॥

( १५७ )

हरि गातां बरवा ऐकतां बरवा । हृदयीं ध्यातां बरवा बाइयांनो ॥ १ ॥
केशव पैं देणें केशव पैं घेणें । केशव करणें धंदा आम्हीं ॥ २ ॥
चंद्रबिंबाची कुरवंडी ओवाळूं श्रीमुखावरी । मदन हा जिव्हारीं लाजिन्नला ३
नामा म्हणे निवविलें सकळ इंद्रियांतें । म्हणोन त्या केशवातें शरण जा रे ४

( १५८ )

केशव पैं मुक्ति केशव पैं भक्ति । केशव विश्रांति पंढरीये ॥ १ ॥
केशव पैं देणें केशव पैं घेणें । केशव करणें धंदा आम्हीं ॥ २ ॥
केशव लौकिकीं केशव व्यवहारीं । केशव निर्धारीं नाम तुझें ॥ ३ ॥
नामा म्हणे अगा केशव बोळला । भावासि भुलला वाटवंटीं ॥ ४ ॥

( १५९ )

आलेनो संसारा उठा वेगें चला । जिवलग विठ्ठला भेटीलागीं ॥ १ ॥
दुर्लभ मनुष्यजन्म न लभे रे मागुता । लाहो घ्या सर्वथा पंढरीचा ॥ २ ॥
भावें लोटांगण घाला महाद्वारीं । होईल बोहरी त्रिविध तापा ॥ ३ ॥
श्रीमुखाची वास पहा धणीवरी । आठवीं अंतरीं घडिये घडिये ॥ ४ ॥
शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळशीमाळा । तनमन ओवाळा चरणावरुनी ॥५॥
नामा म्हणे विठो अनाथां कोवसा । पुढती गर्भवासा येऊं नेदी ॥ ६ ॥

( १६० )

तारुण्याच्या मदें न बोले कोणासी । सदां मुसमुसी रीस जैसा ॥ १ ॥
आटुनि वेंटूनि बांधितो मुंडासा । फिरतसे म्हैसा जगामाजीं ॥ २ ॥
हातीं दिंडपान लावूनियां ताठा । फिरतो करंटा विषयबुद्धि ॥ ३ ॥
श्वानाचिये परी हिंडे दारोदारीं । इच्छी परनारी पापदृष्टि ॥ ४ ॥
भांगिजेल रूप पाहे आरशांत । विचकोनि दांत पाहतसे ॥ ५ ॥
नामा म्हणे ऐसें तारुण्याचे संगें । आलें जाण मग वृद्धपण ॥ ६ ॥

( १६१ )

असत्याचे मळ बैसले ये वाचे । ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥ १ ॥
हरिनामामृत प्रक्षाळी जिव्हेतें । पाणीयें बहुते काय करिती ॥ २ ॥
गंगासागरादि तीर्थें कोडीवरी । हरिनामाची सरी न पवती ॥ ३ ॥
हरिनामगंगे सुस्नात पैं झाला । नाम्याजवळी आला केशीराज ॥ ४ ॥

( १६२ )

विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होइल तुम्हां १
वेदांचें हें सार शास्त्रांचें गव्हार । तें जाणा अक्षर विठ्ठलनाम ॥ ध्रु० ॥
न करावें खंडण अखंड उच्चारण । देश काळ वर्तमान नाहीं येथें ॥२॥
जिवींचें निजगुज मुक्तीचें तें बीज । नामा म्हणे मज सांपडलें ॥ ३ ॥

( १६३ )

भवसिंधूचा पार तरे तो पोहणार। बळिया परम धीर धन्य तोची ॥ १ ॥
नामाची सांगडी लावूनि अभ्यास। हृदयीं प्रेमरस वोसंडती ॥ ध्रु० ॥
सत्वाचा सुभट असंग एकट। वैराग्य उद्भट निर्वासन ॥ २ ॥
कामक्रोध जेणें घातले तोडरीं। निर्दाळिले वैरी लोभदंभ ॥ ३ ॥
रजतमाचे जेणें तोडिले अंकुर। केला अहंकार देशधडी ॥ ४ ॥
नामा म्हणे जया नामीं अनुसंधान। तोची परम धन्य त्रिभुवनीं ॥ ५ ॥

( १६४ )

नामाचा महिमा नेणोंचि पैं ब्रम्हा। म्हणोनियां कर्मा अनुसरला ॥ १ ॥
नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म। केशव हेंचि वर्म सांगितलें ॥ ध्रु० ॥
नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या। नामावीणें विद्या आणिक नाहीं ॥३॥
करितां आचमन केशव नारायण। करिती उच्चारण आधीं हेंचि ॥ ४ ॥
लग्नाचिये काळीं म्हणती सावधान। लक्ष्मीनारायणचिंतन करा ॥ ५ ॥
देहाचिये अंतीं प्रायश्चित्त देती। शेवटीं वदविती रामनाम ॥ ६ ॥
ऐसिया नामापरतें नाहीं सार। गिरिजेसी शंकर उपदेशी ॥ ७ ॥
करिती पितृश्राद्ध कर्म आचरिती। शेवटीं म्हणती एको विष्णु ॥ ८ ॥
नामें होय गती नामें होय मुक्ति। नामयाचे चित्तीं रामनाम ॥ ९ ॥

( १६५ )

भवसिंधुचा पार तरावयालागीं। साधन कलियुगीं आणिक नाहीं ॥
अहर्निशीं नाम जपा श्रीरामाचें। जें सकळ धर्मांचें मुगुटमणी ॥ ध्रु० ॥
न चले वर्णाश्रमधर्म आचरण। नघडे व्रत दान तप कोणा ॥ २ ॥
नव्हे तीर्थाटण पुराणश्रवण। नव्हे ब्रम्हज्ञान शास्त्रबोध ॥ ३ ॥
नव्हे ध्यान स्थिति भावेंवीण ओजा। न घडे देवपूजा एकनिष्ठ ॥ ४ ॥
नामा म्हणे नाम राघोबाचें गातां। ब्रम्हसायोज्यता घर रिघे ॥ ५ ॥

( १६६ )

न लगती कथा व्युत्पत्ति उलथा । वाउग्या चळथा ग्रंथांचिया ॥ १ ॥
हरि हरि भजन जनीं जनार्दन । सर्वत्रीं समान भूतदया ॥ ध्रु० ॥
भावेंचि भजावें हरीतें पुजावें । नित्य हें सेवावें रामनाम ॥ २ ॥
नामा म्हणे गोड नको तें हें वाड । विठ्ठलाचें वेड इतुकें पुरे ॥ ३ ॥

( १६७ )

अभ्यासिले वेद झाला शास्त्रबोध । साधिल्या विविध नाना कळा ॥
प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं। तंव कैसा श्रीहरी करिल कृपा ॥ १ ॥
हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनों ॥ ध्रु० ॥
प्रसंगें पुराणें ऐकिलीं श्रवणीं । त्यांतिल कोण मनीं धरी अर्थ ॥
काय तें सांडिलें काय तें मांडिलें । काय तें दंडिलें प्रवृत्तीसी ॥ २ ॥
अनंत या मूर्ति पाहिल्या लोचनीं। त्यांतिल कोण ध्यानीं प्रतिबिंबली ॥
स्वप्नींचिया परी देखसी आभास । न धरीच विश्वास चित्त तुझें ॥ ३ ॥
वांझेचिये स्तनीं अमृताची धणी । मृगजळ पाणी तान्हावलें ॥
तरी प्रेमेंवीण कळती क्रियाकर्में । हातीं येती वर्में विठोबाचीं ॥ ४ ॥
दृष्टीचें देखणें श्रवणींचें ऐकणें । मनाचें बैसणें एक होय ॥
नामा म्हणे तरी विठो येउनी भेटे । कायाच पालटे कैवल्य होय ॥५॥

( १६८ )

ओंवाळूं गेली मी वो द्वारके । जिकडे पाहें तिकडे चतुर्भुज सारिखें ॥१॥
लाजिलें गे माये आतां कोणा ओवाळूं। जिकडे पहातां तिकडे चतुर्भुज गोपाळू
लाजोनियां आली सखियांमाझारी। जिकडे पहातां तिकडे चतुर्भुज नरनारी
श्रीवत्सलांछन हेचि ओळखण । विष्णुदास नामयानें सांगितली खूण ॥३॥

( १६९ )

श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं । तेथें माझी दृष्टी बैसलीसे ॥ १ ॥
कटावरी कर समचरण साजिरे । देखावया झुरे माझें मन ॥ २ ॥
माहेरींची आस दसरा दिवाळी । बाहे ठेवी निढळीं वाट पाहे ॥ ३ ॥
बंदीजन नामा उभा महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णीतसे ॥ ४ ॥

( १७० )

काळा गे दादुला पाहतां आकळू । तो झाला गोवळू नंदाचा ॥ १ ॥
काळा गे दादुला काळा गे दादुला । पंढरीं पहा चला विठ्ठल गे ॥ध्रु०॥
काळा म्हणोनि पाहों गेलों जवळां । सुनीळू सांवळा दिसतसे ॥ २ ॥
नामा म्हणे सर्व भक्षितो काळू । भक्तांचा कृपाळू श्रीविठ्ठल ॥ ३ ॥

( १७१ )

देहमंदिराभीतरीं । शेजे सुदला श्रीहरी ।
निद्रा उन्मनीचे भरीं । तें म्यां स्वप्न देखिलें ॥ १ ॥
स्वप्नीं भुललें बाई । मागील नाठवेचि कांहीं ।
हा जीव परवस्तुच्या ठायीं । तनुमनें आटला ॥ ध्रु० ॥
स्वप्न सांगूं कोणासी । विवेक करिती तयांसी ।
तें कोडें अज्ञानासी । संतांवांचोनी नुगवे ॥ २ ॥
ध्यानीं पहुडला सांवळा । जवळी नारी बारा सोळा ।
विंजणें वारिती सकळा । सोहं शब्द जागरणीं ॥ ३ ॥
धिं धिं तुरें वाजती । अनुहात ध्वनि गर्जति ।
तेथें निद्रा ना सुषुप्ति । चंद्र सूर्य मावळले ॥ ४ ॥
मना पवना नाहीं भेद । तया ठायीं हा गोविंद ।
तेथें खुंटला अनुवाद । वेद श्रुति आटल्या ॥ ५ ॥

म्हणे विष्णुदास नामा । जन्म मरण नाहीं आम्हां ।
कृपा केली मेघःशामा । संतसंगें तारिलों ॥ ६ ॥

( १७२ )

योगियांचें ब्रम्ह शून्य व्योमाकार । आमुचें साकार विटेवरी ॥ १ ॥
दाटुगें नागर कटीं ठेउनि कर । सर्वस्वें उदार भक्तालागीं ॥ ध्रु० ॥
ज्ञानीया सिद्धांतीं लक्षापरी नये । आमुची वाट पाहे अनाथाची ॥ २ ॥
पुंडलीका भावा बोळलें बोरसें । नेणों काय कैसें प्रेम त्याचें ॥ ३ ॥
जाप्यकाचें जाप्य नाम मंत्रमय । आमुचें भक्तिप्रिय संसारिकां ॥ ४ ॥
नामा म्हणे जीवें करीन ओंवाळणी । झणीं चक्रपाणी दिठावसी ॥ ५ ॥

( १७३ )

ध्यानीं ध्यातां मनीं ह्याचि येउनि बैसे । गीती गातां वसे हृदयकमळीं १
बाहेरी भीतरीं वेधिलें बो येणें । रुक्मिणीरमणें पांडुरंगें ॥ ध्रु० ॥
यावीण दुसरें मज कांहींच नाठवे । लागलीसे सवे गोपाळाची ॥ २ ॥
भाग्यें जात जीवा कांहींच नावडे । वांचोनी पवाडे गोपाळाचे ॥ ३ ॥
निद्रां आणि जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं । देखे कृष्णमूर्ति सर्वगत ४
ऐसा अखंड विदेही लौकिकाविरहीत । नामा जीवन्मुक्त होउनि ठेला ॥ ५ ॥

( १७४ )

पढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । विठ्ठला भेटावें जीवलगा ॥ १ ॥
कायावाचामन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥
बाहेरीं भीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलवे ब्रम्हानंदू ॥ ४ ॥
चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ५ ॥

( १७५ )

चाल सखिये वेगू करीं वहिला । दिन सरला काळ थोडा उरला ॥ १ ॥
आवडी घेऊं गे निजसुख धणीचें । आर्त पुरोनी जें उरलेंसे मनींचें ॥ २ ॥
कृष्णमुख पाहें दृष्टी भरोनी । चित्त सांडीं कुरवंडी करोनी ॥ ३ ॥
झणी विसरसी हे खूण निरुती । मग अंतरलें सर्व पुढती ॥ ४ ॥
हाचि निर्धार करुनियां मानसीं । आंत बाहेरी हरिरूप देखसी ॥ ५ ॥
नामया स्वामी राजीवलोचनु । रमारमण तो जीवींचा जीवनू ॥ ६ ॥

( १७६ )

कृष्ण डोलतु रांगतु रंगणीं । इडापीडा धांवोनी घेती गौळणी ॥ १ ॥
जीवापरसि हें वाल्हें बालक । शिणलीया विसांवा त्याचें आहे श्रीमुख ॥
सर्व सुख याचेनि मनोहरें । तेंची खेळवितां धणी मन न पुरे ॥ ३ ॥
देह गेह नाठवे सर्वथा । सुत पतीची मावळली वार्ता ॥ ४ ॥
सुख न सांगवे वैखरी कोंदली । रूपीं रमतां मनें बुडी दिधली ॥ ५ ॥
नाम्याचा स्वामी सुखाचा सागरू।कृष्ण खेळवितां सुफळ हा संसारू॥ ६

( १७७ )

घावरिया छंद चरण घवघवी । अरुणा दाखवी चरणतळीं ॥ १ ॥
आरुता येईं कान्हा देईं आलिंगन । उतरी निंबलोण मुखावरुनी ॥ २ ॥
वाघनखें कडदोरा कंठीं घालुनि सरी । झणी तुज मुरारी दृष्टी लागे ॥ ३ ॥
अंबुलें लोळिया कंठीं रिठे गांठी । छंदें जगजेठी हालवी मान ॥ ४ ॥
भाळीं चंदन वरी मसीचा टिकला । झणीं तुज गोपाळा दृष्टी लागे ॥ ५ ॥
नामयाचा स्वामी हरि माझें चिंतणें। छंदें गीत गाऊं नाचूं मी सदां जाणें ॥ ६ ॥

( १७८ )

चिदानंद दोंदिल बाळ सांवळें । कृष्ण पाहतां नयनीं मन मावळे ॥ १ ॥
तें सुख कवणें वाचे बोलिजे । चित्त चैतन्य समरसें भोगिजे ॥ २ ॥

परा परतली पश्यंति तन्मया । मध्यमा वैखरी पावली हो लया ॥ ३ ॥
आलिंगनालागुनी बाह्या स्फुरती । देह न दिसे पहातां कृष्णमूर्ती ॥ ४ ॥
तेथें आर्तीचा आनंदू गोठला । तो हा कृष्णरूपें अंकुर उठिला ॥ ५ ॥
नामया स्वामी सबाह्य अभ्यंतरीं । गेले रसरंग गोकुळाभीतरीं ॥ ६ ॥

( १७९ )

रात्र काळी घागर काळी । यमुनाजळें हीं काळीं वो माय ॥ १ ॥
बुंथ काळी बिलवर काळी । गळां मोतीं एकावळीं काळी वो माय ॥ २ ॥
मी काळी कांचोळी काळी । कांस कांसली ते काळी वो माय ॥ ३ ॥
एकली पाणीया नव जाय साजणी । सवें पाठवा मूर्ति सांवळी वो माय ॥ ४ ॥
विष्णुदास नाम्याची स्वामिणी काळी । कृष्णमूर्ती बहु काळी वो माय ॥ ५ ॥

( १८० )

मल्हार महुडें गगनीं दाटलें । विजुखळें गर्जिन्नलें गे माय ॥ १ ॥
गोविंद पहाया लौकरी । कैसें वर्षताहे मधुधारीं गे माय ॥ २ ॥
आनंदें मयूरें नाचती औपसें । प्रेमें नीळकंठ झाले ते कैसे ॥ ३ ॥
नामया स्वामी दृष्टि सोज्वळ । जीवा लागला गोपाळ गे माय ॥ ४ ॥

( १८१ )

सांवळी श्रीमूर्ति हृदयीं बिंबली । तरी पालटली देहबुद्धि ॥ १ ॥
धन्य माझा जन्म धन्य माझा भाव । ध्यानीं केशीराव नांदतसे ॥ २ ॥
आशा तृष्णा कैशा मावळल्या देहीं । बुडोनीयां पायीं ठेलें चित्त ॥ ३ ॥
नामा म्हणे ऐशी विश्रांति पैं झाली । हृदयीं न्याहाळीं केशीराज ॥ ४ ॥

( १८२ )

रूपें शामसुंदर निलोत्पल गाभा । सखिये स्वप्नीं शोभा देखीयेला ॥
नेत्र विशाळ भाळ दंत हिरया ज्योती । बाईये मदनमूर्ति देखीयेला ॥ध्रु०॥

शंखचक्र गदा शोभती चहूं करीं । सखीये गरुडावरी देखियेला ॥ २ ॥
शयन शेषपृष्ठीं नाभीं परमेष्ठी । गंगा वामांगुष्ठीं देखियेला ॥ ३ ॥
पीतांबर कटींतटीं दिव्य चंदन उटी । सखीये जगजेठी देखियेला ॥ ४ ॥
विचारितां मानसीं नये जो व्यक्तीसी । नामा केशवेंसी लुब्धोनि ठेला ॥५॥

( १८३ )

आलीयां पुसें जातीयां घाडीं निरोप । पंढरपुरीं आहे माझा मायबाप ॥१॥
येईं विठाबाई आई माउलीये । निढळावरी कर ठेउनी पालवीये ॥ २ ॥
पिंवळा पीतांबर गगनीं झळकला । गरुडावरी बैसोनि माझा कैवारी आला ३
डोळ्यांतील बाहुली माझी विठाई झाली । घनानंद मूर्ति माझ्या ध्यानासीं आली
विठोबाचें राज्य आम्हा नित्य दिपवाळी । विष्णुदास नामा जीवेंभावें ओंवाळी ॥ ५ ॥

( १८४ )

त्रिभुवनींचें सुख आलें भक्तीमुसें । तें हें विठ्ठलवेषें अवतरलें ॥ १ ॥
बरव्याचें बरवें पाहतां नित्यनवें । हृदयीं धरितां निवे त्रिविधताप ॥
चोवीसां वेगळें सहस्रा आगळें । निगुण निराळें शुद्ध बुद्ध ॥ २ ॥
वेदां मौन्य पडे श्रुतीसी सांकडें । वर्णितां कुवाडें पुराणासी ॥ ३ ॥
भावाचें आळुकें भुललें भक्तिसुखें । दिधलें पुंडलीकें साधुनियां ॥ ४ ॥
नामा म्हणे आम्हां अनाथांलागुनी । निडारला नयनीं वाट पाहे ॥५॥

( १८५ )

सत्य नित्य युक्त शुद्ध बुद्ध मुक्त । कारणरहित निरंजन ॥ १ ॥
तें आम्हीं देखिलें चर्मचक्षु दृष्टीं । उभा वाळवंटीं पंढरीये ॥ २ ॥
वेदां अगोचर तया सहस्रमुखा । तें झालें पुंडलीका लोभापर ॥ ३ ॥
परतल्या श्रुती म्हणती नेती नेती । आम्हां गातां गीतीं सांपडलें ॥ ४ ॥

स्वरूपाचा निर्धार बोलती पुराणें। शिणलीं दरुशनें वेवादती ॥ ५ ॥
नामा म्हणे यासी भावची कारण। पावावया चरण केशवाचे ॥ ६ ॥

( १८६ )

माझा भाव तुझे चरणीं। तुझें रूप माझे ध्यानीं ॥ १ ॥
सांपडलों एकमेकां। जन्में नव्हे रे सुटिका ॥ २ ॥
त्वां मज केलें रे विदेही। म्यां तुज धरिलें हृदयीं ॥ ३ ॥
त्वां तोडिली माझी माया। मीं जडलों तुझ्या पायां ॥ ४ ॥
नामा म्हणे गा सुजाणा। सांग ठकिलें कोणें कोणा ॥ ५ ॥

( १८७ )

अठ्ठावीस युगें उभा चंद्रभागे। परी पालटची नेघे पांडुरंग ॥ १ ॥
उभा उगेपणें पुंडलिकाचेनि सुखें। आहे तेथें लक्षें जेसा तैसा ॥ २ ॥
प्रेमरसरंगें प्रीतीचेनि पांगें। सदां संतसगें खेळ करी ॥ ३ ॥
जो न लभे योगें आणि देहत्यागें। तो सांपडला संवीगें हृदयीं धरा॥४॥
धुंडाळितां श्रुतिस्मृति जो नुमगे। तो भक्तां साहे मागें सांभाळीत॥५॥
योगीयांच्या ध्यानीं क्षण एक न रंगे। तो सुखें गोष्टी सांगे नामयासी॥६॥

( १८८ )

वारीं वो दशवंती आपुला तूं बाळ। विकटू हा खेळ खेळतसे ॥ १ ॥
धाकुटिया मुला घेतो हा चिमोरे। काय करूं धुरे भीत असों ॥ २ ॥
घरींचा म्हतारा हाणितला येणें। काय सांगूं उणें तुजपाशीं ॥ ४ ॥
मी वो लटकी तरी नामयासी पुसा। तुझा बाळू कैसा आसंदत ॥ ५ ॥

( १८९ )

वेणुनादीं चरे पाणी पी भिंवरे। ते धेनु हुंबरे भक्तांलागीं ॥ १ ॥
वाणें ते सांवळी नामें ते श्रीधरा। चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ ४ ॥

केशव नामें गाय माधव नामें गाय । विठ्ठल नामें गाय कामधेनु ॥ ३ ॥
प्रेमें ते पान्हावे भक्तांघरीं जाये । भुकेलिया खाये पातकासी ॥ ४ ॥
नामा म्हणे गाय भाग्यवंता घरीं । पाप्या जन्मवरी पाठी लागे ॥ ५ ॥

( १९० )

गेलिया वृंदावना तेथें देखिला कान्हा । संवगडियांमाजी उभा ध्यान लागलें मना ॥ १ ॥ हरिनाम गोड झालें काय सांगों गे माये । गोपाळ वाहती पांवे मन कोठें न राहे ॥ २ ॥ त्याचें मुख साजिरें वो कुंडलें चित्तचोरें । सांडुनी अमृतधणी लुब्धलीं चकोरें ॥ ३ ॥ सांडुनी ध्रुवमंडळ आली नक्षत्रमाळा । कौस्तुभातळवटीं वैजयंती शोभे गळां ॥ ४ ॥ सांडुनी मेघराजु कटिसूत्रीं तळपे विजू । भुलला चतुराननु तया नव्हे उमजू ॥ ५ ॥ सांडुनी लक्ष्मी निज गोपाळासी बोले गुज । अचोज हा चोजवेना ब्रह्मादिकां सहज ॥ ६ ॥ वांजट धीट मोठी ऐसी कवण असे खिळू । भेदली हरिचरणीं पायीं मुरडीव वांकी सोज्वळू ॥७॥ त्याचे पायींचीं नेपुरें वाजती वो गंभीरें । लुब्धलिया पक्षी याती धेनु पाचारी स्वरें ॥ ८ ॥ आणिक एक नवल कैसें स्वर्गीं देव जाले पिसे । ब्रम्हादिक उच्छिष्टालागीं देखा जळीं जाले मासे ॥ ९ ॥ आणिक एक नवल परी करीं घेऊनि शिदोरी । संवगड्यां वांटितसे नामयाचा स्वामी हरि ॥ १० ॥

( १९१ ) ( भुपाळी. )

गौळण दसवंती पैं सांगे । आली या कृष्णचेनि मार्गें ।
येणें येणें वो श्रीरंगें । नवनीत भक्षिलें माझें ॥ ध्रु० ॥
तळवा तळहात टेंकितो । डाव्या गुडघ्यानें रांगतो ।
रंगणिं रंगनाथ खेळतो । आजि म्यां देखिला सये ॥ १ ॥

एके हातीं लोण्याचा कवळू । मुख माखलेंसे अळुमाळू ।
चुंबन देतां अतिपरिमळू । नवनीताचा सये ॥ २ ॥
येणें माझें कवाड गे उघडिलें । येणें माझें शिंकें गे तोडिलें ।
दह्या दुधाचें भक्षिलें । उलंडिलें ताकाचें ॥ ३ ॥
ऐसें जरी मी जाणतें । यमुना पाण्या नव जातें ।
धरुनि उखळासी बांधितें । शिक्षा लावितें गोविंदा ॥ ४ ॥
ऐसा पुराणप्रसिद्ध चोर । केशव नाम्याचा दातार ।
पंढरपुरिं धरिला अवतार । भक्त पुंडलिकासाठीं ॥ ५ ॥

( १९१ ) ( आरती. )

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा । पुंडलिकाचे भेटी परब्रम्ह आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥ जयदेव जय देव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा राहीच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ ध्रु० ॥ तुळसीमाळा गळां कर ठेवून कटीं । कासे पीतांबर कस्तुरी ल्लाटीं । देव सुरवर नित्य येति भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥ धन्य वेणुनाद अनुक्षेत्रपाळा । सुवर्णाचीं कमळें पद्माळे तळां । राई रखुमाबाई राणिया सकळा । ओंवाळिती राजा विठ्ठल सांवळा ॥ ३ ॥ ओवाळूं आरत्या कुरवंड्या येती । चंद्रभागेमाजी सोडुनियां देती । दिंडी पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णूं मी किती ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्र भागेमाजी स्नानें जे करिती । दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ॥ ५ ॥

(१९३)

आजिचा दिवस आम्हा सोनियाचा । गोवळू भेटला कान्हो नंदाचा ॥ १ ॥ कान्होबा पेंडारी येईल यमुने । तयावीण मज घडी न गमे ॥ २ ॥ सोळा सहस्त्र गोपी म्हणती अगा जगज्जीवना । एके वेळीं भेटी देई नंदनंदना ॥ ३ ॥ उजळुनी आरती करूं कुरवंडिया । शेंस भरूं नाम्या स्वामी वनमाळिया ॥ ४ ॥

(१९४)

अज्ञान बाळक तुझा प्रऱ्हाद धांवा करितां । आणि त्रिभुवनदेवता नाभि नाभि रे आतां । माझा प्रऱ्हादु असे वो केउता । तो कवणें पां गांजिला ॥ वदन पसरुनी विक्राळ । झरझरीत झरे लाळ । नेत्र जैसे वडवानळ । शोषूं पाहे जलनिधि ॥ २ ॥ संहार झालें नागकुळ । भ्याले अष्ट लोकपाळ । स्वर्गीं सुटली खळबळ । अमरावतीं इंद्रासी ॥ ३ ॥ मग दैत्यातें पाचारितु । लोह खणखणां वाजतु । धाकें अंबर गर्जतु । तेणें कांपे मेदिनी ॥ ४ ॥ वेटाळुनी चहूं हातीं । विदारिला चपेट घातीं । जैसा रुद्र प्रळयांतीं । तैसा हरि दिसतसे ॥ ५ ॥ दैत्य न मरे कवणे परी । मग तो धरिला जानूंवरी । नखें उदर फाडुनी सत्वरीं । अस्थि चूर्ण केलिया ॥ ६ ॥ भोजें नाचत देवता । मुक्ति झाली दैत्यनाथा । नामया स्वामी वरदहस्ता । अभयदाता भक्तांसी ॥ ७ ॥

(१९५) (पद.)

कुत्ना थमाल ले थमाल आपुल्या गाई । आम्ही आपुलाल्या घलासि जातों भाई । येथें ल्हायाचा आमता इलाद नाहीं । तुजी थंगत ले थंगत कलली भाई कलली भाई ॥ कुत्ना० ॥ ध्रु० ॥ तुम्ही थोलल्या पात-

ळाचे लेंक । तुम्हामधीं ले मी लहान आहें एक । मदला म्हनतां ले जाईं गाई लाख । किति मी धावूं ले कांता लागला पायिं लागला पायीं ॥ कुत्ना० ॥ १ ॥ काली पिवली ले गाय आहे तानेली । या या गवल्याची धवली गाय पलाली । मदला बघून ले गवली तो माला माली । काली कामली हिलुन घेतली थालि घेतली थाली ॥ कुत्ना० ॥ २ ॥ कालचा खलवंस ले बलाचि गोल केला । तुम्ही अवघ्यांनीं फाल फाल घेतला । मी एक निपजत ले म्हनूनि थोलका दिला । तूं म्हनशिल ले याला कलतचि नाहीं काहीं नाहीं काहीं ॥ कुत्ना० ॥ ३ ॥ यमुना-तीलीं ले नित कालितां आंघोली । मदला म्हनतां ले जा आन शिदोली । कैंची आनूं ले वलन आनि भाकली । माजा लवला ले काम ऐकतो माइ ऐकतो भाई ॥ कुत्ना० ॥ ४ ॥ कृष्ण म्हणे रे ऐकें बा बोबड्या । तुझ्या गाई रे मी वळीन सौंगड्या । नाहिंतर धाडिन रे गोपाळांच्या जोड्या । नामा म्हणे रे गोष्ट रोकडी पाहिं रोकडी पाहीं ॥ कुत्ना० ॥ ५ ॥

नामदेवांच्या गाथ्यांत सगळ्या नामदेवांचे मिळून जे सुमारें २५०० अभंग दिले आहेत त्यांतले हे १९५ निवडक अभंग प्रस्तुत चरित्रनायक आद्य नामदेवांचे म्हणून मी येथें उतरून घेतले आहेत. हे सर्वच अभंग ज्ञानदेवसमकालीन आद्य नामदेवांचे आहेत अशी ग्वाही जरी मी देऊं शकत नाहीं तरी त्यांचे बरेच अभंग या १९५ अभंगांत समाविष्ट झालेले आहेत येवढें खात्रीपूर्वक सांगण्यास हरकत नाहीं.

---

## नामदेवाचा पुत्र नारा याचे अभंग

( १ )

कोटियज्ञांचीं हीं फळें । त्यांहुनि हरिनाम आगळें ॥ १ ॥
तें फळ वेगळें सांगावया । नाहीं उपमा द्यावया ॥ २ ॥

महापातकांचिया राशी । नामें पावती मोक्षासी ॥ ३ ॥
दोन अक्षरांसाठीं । गणिका धातली वैकुंठीं ॥ ४ ॥
हरिनामाचा संग्रह करा । म्हणे विष्णुदास नारा ॥ ५ ॥

( २ )

काळा अलोट अभंग । हरिचे दास अंतरंग ॥ १ ॥
हाकारिती वेळोवेळां । कृष्णा गोविंदा गोपाळा ॥ २ ॥
कंठीं तुळसीच्या माळा । नेत्रीं अश्रूंचिया किळा ॥ ३ ॥
गुढिया झळकती रोमांकुरीं । कंप न धरेचि शरीरीं ॥ ४ ॥
आंतु बाहेरी निरंतरीं । मागां पुढां अवघा हरि ॥ ५ ॥
संतचरणींचा रजःकण । नारा नामयाचा जाण ॥ ६ ॥

( ३ )

तुज भांडवल मोक्ष एक गांठी । तो केला....तुझ्या नामें ॥ १ ॥ आतां गौप्य काय आहे तुजपाशीं । जें तूं मज देसी पांडुरंगा ॥ २ ॥ चतुर्विध मुक्ति दृष्टी ओळंगती । ध्यातां तुझे चित्तीं चरणकमळ ॥ ३ ॥ आणिका ऋद्धि सिद्धि दाखविती आस । या दासींचा अभिलाष कोण करी ॥ ४ ॥ भूतळींचें वैभंव निज कर्मभोग । तैं तुज उद्वेग करणें बहु ॥ ५ ॥ नारा म्हणे नामयानें सांगितलें बीज । तोंचि मजसी गुज बोल कांहीं ॥ ६ ॥

( ४ )

तुझे चरणीं चित्त रंगलें अनुरागें । बहु जन्म वियोगें शिणलों होतों॥१॥
उठवितां येथुनी मुरकुंडी घालीं । कृपेची साउली देखुनि तुझी ॥ २ ॥
आहाळले पोळले तापत्रयें विराले । तृष्णा विभांडिले नानापरी ॥ ३ ॥
काम क्रोध मोह मत्सरु अहंकार । देह निरंतर जाजावलें ॥ ४ ॥

बुडतिया जरी अवचितां सांगडी । तें जीवें न सोडी तैसें जालें ॥ ५ ॥
विनवि नामयाचा विष्णुदास नारा । वंशपरंपरा दास तूझा ॥ ६ ॥

(५)

माझ्या विठोबाचें श्रीमुख साजिरें । झळकती कुंडलें मनोहर ॥ १ ॥
मना तें तूं आठवीं आसनीं शयनीं । भोगसी उन्मनी सहजसुख ॥ २ ॥
गगनीं असो पैं न ये तो मार्तंडु । तैसें तूं अखंडू ध्यान करीं ॥ ३ ॥
कमळीके जैसा भ्रमर आसक्त । तैसा तूं निश्चित राहें चरणीं ॥ ४ ॥
जैसा कां समंधु जीवन जळचरें । येणेंचि निर्धारें दृढ धरीं ॥ ५ ॥
नारा म्हणे माझ्या बापाचें साधन । सांपडली खूण अंतरींची ॥ ६ ॥

(६)

कैंचें आम्हां जाति कुळ । कैंचे आम्हीं धर्मशीळ ॥ १ ॥
तुझ्या नामीं अनुसरलों । तिहीं लोकीं सरते झालों ॥ २ ॥
नारा विनवी विष्णुदास । आमुचे वंशीं हा विश्वास ॥ ३ ॥

(७)

तापत्रयें तापलें देह असे पीडिलें । वासना विभांडीलें मन माझें ॥ १ ॥
विठोबावेगळें न देखें मीं सुख । पाहेन तुझें मुख एक वेळ ॥ २ ॥
सुखाची साउली पाहिन दृष्टीभरी । जाईन महाद्वारीं लोटांगणीं ॥ ३ ॥
हरला शीणभाग जन्मजन्मांतरींचा । नारा नामयाचा शरणागत ॥ ४ ॥

(८)

आम्हां व्रत एकादशी । देव केशव तीर्थ तुळशी ॥ १ ॥
आणिक नेणों बा साधन । आमचा विषय हरिकीर्तन ॥ २ ॥
संत सांगती निरंतर । प्रेमधन हें भांडार ॥ ३ ॥
विनवि विष्णुदास नारा । आमची ऐसी परंपरा ॥ ४ ॥

( ९ )

सुख दुःखा भेटों गेलें । चित्त चैतन्या मिळालें ॥ १ ॥
आला अनुभव नामाचा । ठेवा लाधला प्रेमाचा ॥ २ ॥
जन्ममरणाची काजळी । तुटोनी गेली तये वेळीं ॥ ३ ॥
सरले संकल्प विकल्प । हृदयीं देखिलें विठ्ठलरूप ॥ ४ ॥
शुन्य झाले भावाभाव । अवघा आतुडला केशव ॥ ५ ॥
नारा म्हणे नामयाचा । मज विश्वास नामाचा ॥ ६ ॥

## महादाचा अभंग

( १ )

यादवांचे कुळीं झोंड जें जन्मलें । नाहीं ऐसें केलें मागें पुढें ॥ १ ॥
देईं गा विठोबा आमुचें ठेवणें । लोकांचें तूं ऋण नेदों पाहसी ॥ २ ॥
आमुचे साधुसंत आहेत सज्जन । तुमचा जमान कोठें देवा ॥ ३ ॥
नामयाचा महादा बळकट झाला । विठोबा आणिला चौबारांत ॥ ४ ॥

## गोंदाचा अभंग

( १ )

भावें भक्तिवादें करावें कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥
निष्कामें करावें देवाचें कीर्तन । भय हें सांडून शरीराचें ॥ २ ॥
रणामधें कैसा भिडतो रणशूर । होवोनी उदार जीवावरी ॥ ३ ॥
तैसा पांडुरंगीं धरा हो निर्धार । उतरा हा पार भवसिंधू ॥ ४ ॥
सिंधू उतरोनी लावा जग ढाल । पाहा तें नवल विठ्ठलाचें ॥ ५ ॥
देव जोडियेला तया काय उणें । गोंदा म्हणे मन धीट करा ॥ ६ ॥

## विठा याचे अभंग

(१)

साधुसंत जनां करितों प्रार्थना । भेटवा देवराणा द्वारकेचा ॥ १ ॥
तन मन धन वेधलें त्याचे पायीं । येऊनीयां राही हृदयकमळीं ॥ २ ॥
गोपाळांचे मेळीं खेळे वनमाळी । यमुनेपाबळीं वेणू वाहे ॥ ३ ॥
शंखचक्र करीं मोरपिच्छ शिरीं । कानीं मकराकारीं मुक्ताफळें ॥ ४ ॥
गळां वनमाळा कासे सोनसळा । देखुनि व्रजबाळा तन्मय झाल्या ॥५॥
नंदाचे नंदनें मोहियलें मन । लागलेंसे ध्यान गोविंदाचें ॥ ६ ॥
विठा नामयाचा चरणींचा रज । भेटवा यादवराज द्वारकेचा ॥ ७ ॥

(२)

पूर्व जन्मीं आराधितां । तुझें वर्म आलें आमुच्या हाता ।
नामदेवें सांगितलें जातां । तें सर्वथा देइजे ॥ १ ॥
आमुचे वडिलीं गा जोडिलें । तें तुझे पायीं गा ठेविलें ।
गौप्य करितां नव्हे गा भलें । दे उगलें गा दातारा ॥ २ ॥
आमुचें आम्हांसी गा देतां । कां बा नये तुझ्या चित्ता ।
गाऱ्हाणें देईन संतां । चौघां देखतां घेईन ॥ ३ ॥
तुझा दारवंटा राखिन हरी । तुज रिघों नेदीं बाहेरीं ।
मोकलिसी अधांतरीं । तरी हे लाज कवणातें ॥ ४ ॥
आणिक कांहीं न मागें तूतें । सेवावृत्ति द्यावी मातें ।
मज निरवावें संतांतें । आपुला दास म्हणोन ॥ ५ ॥
नामयाचा विठा म्हणे । यांत कांहीं करिसी उणें ।
तरी आमुच्या वडिलांचे निरुपणें । बांधलासी गा विठ्ठला ॥ ६ ॥

( ३ )

विठा नामयाचा आला पंढरपुरा । भेटला सोयरा विटेवरी ॥ १ ॥
सुख दुःख अवघें सांगितलें श्रीहरी । धरणें तुझे द्वारीं घेइन देवा ॥ २ ॥
नामयासारिखा आणिक कोणी आहे । सृष्टीमाजी पाहें विचारुनी ॥ ३ ॥
नामा माझा सखा जिवाचा तो जीव । त्याचा आहे भाव माझे ठायीं ॥४॥
मजवांचूनि नामा दुजें नेणें कांहीं । मीं त्याचे हृदयीं सदा असें ॥ ५ ॥
नामयानें नाम जोडिलें निधान । ठेविलें सर्व धन तुझ्या पायीं ॥ ६ ॥
समर्थासी कांहीं बोलूं नये आतां । ठेवणें कृपानाथा देईं वेगीं ॥ ७ ॥
चहुं यूगीं नामा सांगातेंचि आहे । वेगळा कांहीं नोहे क्षणभरी॥ ८ ॥
माझीया बापाची तुजजवळी ठेवी । विठा म्हणे द्यावी केशीराजा ॥९॥

( ४ )

आमुचा नामा तुज गेला निरवूनी । मीं तुजवांचोनी नेणें कवणा ॥ १ ॥
कायावाचामनें जोडिलें जें बापें । तें दिधलें तुजपें ठेवावया ॥ २ ॥
तें दे गा आमुचें नको करूं विचारू । नामा तुझा डिंगरू त्याचे आम्हीं ३
जुनें नाणें आमुच्या वडिलांचें ठेवणें । बहुतां कष्टीं त्यानें जोडियेलें ४
तें आम्हांलागोनी ठेविलें तुझे पायीं । आमुचें आम्हां देईं केशीराजा ५
तूं अनाथा कोवसा दीनाचा कृपाळू । तरि आमुचा सांभाळू करिं कां वेगें ६
आमुचे संचितार्थ आम्हांसी देऊनी । यश घे त्रिभुवनीं म्हणे विठा ॥७॥

( ५ )

हरिनामाचा ध्वनी ऐकोनी श्रवणीं । जाइन लोटांगणी तेथवरी ॥ १ ॥
माझे सखे अवघे वैष्णवजन । त्यांचें मज दर्शन कैं होईल ॥ २ ॥
एक उभे गाती एक बैसुनि ऐकती । हृदयीं आलिंगिती गोपीनाथु ॥३॥
ऐशीयांचे संगतीं आहे बाप माझा । विनवितो विठा सहज नामयाचा ४

(६)

आमुचा बाप अग्रज तुझा । तूं बा आम्हां होसी आजा ॥ १ ॥
कैसें आम्हां धरिलें दुरी । सांग कृपाळुवा हरी ॥ २ ॥
तूं आमुचा मूळपुरुष । आम्ही अवघे तुझे वंश ॥ ३ ॥
आम्ही तुझी तिसरी पिढी । संत जाणताती प्रौढी ॥ ४ ॥
अरे कायशीं शतें लोटलीं । कैशी लाघावळी तुटली ॥ ५ ॥
हांसोनी बोले केशवराज । विठ्या अवघें घेई मज ॥ ६ ॥

(७)

मायबापें काय नसती आमुचीं । लेंकरें आमचीं त्याचे हातीं ॥ १ ॥
माझें देई माझ्या हातीं लवलाहीं । होई उतराई केशीराजा ॥ २ ॥
तुझ्या पायीं माझा बांधीन गळा । न भियें कळिकाळा सत्य जाण ३
जितुकें देणें तितुकें घेईन आतां । नामयानें जातां सांगितलें ॥ ४ ॥
रगट्या पाठोळ्यासी पडियेली मिठी । आतां जगजेठी तुज मज ॥ ५ ॥
बोरी कांटे कां हो केळी आहो फाटे । नामयाचें विठें खवळलें ॥ ६ ॥

(८)

तुज काय देवा न पुरतें आलें । विश्वासें ठेविलें अभिलाषिसी ॥ १ ॥
लाजिरवाणें देवा नको करूं आतां । देईं गा कृपावंता नामप्रेम ॥ २ ॥
शरणागता वज्रपंजर म्हणविसी । तरि कां तूं न देसी आम्हां आमुचें ३
माझ्या नामयानें जन्मोनी जोडिलें । तें दे गा वहिलें म्हणे विठा ॥ ४ ॥

(९)

उदार चक्रवर्ती लक्ष्मीचा पती । तरि कां काकुळती चित्तीं वहासी ॥ १ ॥
आम्हा दुर्बळांचें ठेवणें कां ठेविलें । दिवाळें निघालें काय तुझें ॥ २ ॥
ज्याचें घेसी त्याचें ऐसेंचि करिसी । तें न चले मजपाशीं केशीराजा ॥ ३ ॥

चौघाचारीं तुज वेढीन आतां । मग बैसेल माथां अपकीर्ती ॥ ४ ॥
अठराही बोलती साही सत्यवाचा । उदार ठायींचा कां न होसी ॥ ५ ॥
देणें घेणें तुज न सुटे सर्वथा । विचारुनि आतां पाहें मनीं ॥ ६ ॥
नामयाचें ठेवणें तुजजवळी आहे । न सोडीं तुझे पाय म्हणे विठा ॥ ७ ॥

( १० )

माझीया बापाची मिराशी गा देवा । तुझी चरणसेवा पांडुरंगा ॥ १ ॥
उपास पारणें राखें द्वारवंटा । केला भोगवटा आम्हांलागीं ॥ २ ॥
तुजपरतें दुजें नेणें आणिक कांहीं । देखें सर्वांठायीं रूप तझें ॥ ३ ॥
तुझ्या सुखें धाला तुजमाजी निवाला । आपुल्या विसरला देहभावा ॥४॥
आम्हांसी घातलें तुझीया आभारीं । विठा म्हणे अंगिकारीं नारायणा ॥५॥

( ११ )

माझिया बापासीं तुझाचि विश्वास । म्हणवी तुझा दास अंतरंग ॥ १ ॥
वृत्तिसहित मन ठेवुनि तुझ्या पायीं । तुजपरतें कांहीं जाणेचि ना ॥ २ ॥
तो तूं आम्हांलागीं शब्दें न पुससी । विसरोनी गेलासी दीननाथा ॥ ३ ॥
जागे ठाणांतरीं पंढरी चोहोटा । राखे द्वारवंटा रात्रंदिवस ॥ ४ ॥
छत्र चवर धरूं हडपी डोळे करूं । जाणवी अवसरू सेवाविधी ॥ ५ ॥
शरीर प्राणाचा देउनियां बळी । धरिले हृदयकमळीं चरण तुझे ॥ ६ ॥
विठा म्हणे तुज नाहीं आठवण । सहज तूं निर्गुण पंढरिराया ॥ ७ ॥

( १२ )

भूतळींचीं तीर्थें नामा जंव करी । गांजियेलें पोरीं नामयाच्या ॥ १ ॥
तुमचें ठेवणें खेचराचे पायीं । आणिकाचे वाहीं पडों नका ॥ २ ॥
वायां मृगजळ दाविसील आम्हां । सर्वथा पुरुषोत्तमा न सोडीं मी ॥३॥
झोंडाचें ठेवणें ठेवावें कवणें । झोंडापरीस होणें झोंड जेणें ॥ ४ ॥
नामयाचा विठा झोंड पैं झाला । विठो उभा केला भक्तिसुखें ॥ ५ ॥

( १३ )

तुजसारिखा पंढरिनाथा । स्वामी शिरावरी असतां ॥ १ ॥
तरि मी आणिकांचा मागता । लाज कोणासी समर्था ॥ २ ॥
असोनी क्षीरसिंधु जवळी । क्षुधाक्रांत तळमळी ॥ ३ ॥
कामधेनुतें ओळंगतां । न पुरे कामना सर्वथा ॥ ४ ॥
विठा म्हणे नारायणा । आतां शरण जाऊं कोणा ॥ ५ ॥

( १४ )

हिंडतां श्रमलों बहु श्रम झाला । अजुनि माझी तुला करुणा नये ॥१॥
मज काय देतां होइल तुझें उणें । किती होसी कृपण पांडुरंगा ॥ २ ॥
घेउनी धरणें बैसलों महाद्वारीं । झालों पैं भिकारी पंढरीचा ॥ ३ ॥
विठा म्हणे देवा माझें मज देया । लौकिक कां वायां करितोसी ॥ ४ ॥

( १५ )

आमुचा बाप आम्हां सांगे । भाक दिधली पांडुरंगें ॥ १ ॥
तुम्हां न विसंबें सर्वथा । तुमचा भार माझे माथां ॥ २ ॥
करिन तळहात साउली । तुमची अवघी वंशावळी ॥ ३ ॥
विठा म्हणे विसरलासी । आम्हां शब्दें न पुससी ॥ ४ ॥

( १६ )

पितृभजन जरी पुंडलीक न करता । तरी कां हा झोंड येता पंढरीसी ॥१॥
वेव्हार करितां आम्हांसी जिंकिलें । जन्ममरण केलें देशधडी ॥ २ ॥
विठा म्हणे यानें बुडविले अपार । पुढति हा चोर कबुल नाहीं ॥ ३ ॥

( १७ )

पायीं घातला तोडरु । देखुनि पळाला संसारू ॥ १ ॥
आले हरिदास नेटके । भेणें पळालीं पातकें ॥ २ ॥

पताका झळकती अंबरीं । वैष्णव नाचती गजरीं ॥ ५ ॥
विठा केशवाचा नटू । बोले कळिकाळासी धटू ॥ ६ ॥

( १८ )

जावोनी वेव्हार सांगेन पंढरी । जेथें पुंडलीकें द्वारीं उभा केला ॥ १ ॥
देवोनी जाय कां घेवोनी जाय । आतां न सोडीं पाय केशवाचे ॥ २ ॥
एक अंगेसी एक जांगेसी । तरी जीवें हृषीकेषी न सोडीं तुज ॥ ३ ॥
वेव्हारा सन्निधि पुंडलीक लोभा । विठा म्हणे उभा तेणें केला ॥ ४ ॥

( १९ )

विश्वंभरा तुझें नाम गा दुर्लभ । परि केलें सुलभ नामदेवें ॥ १ ॥
नामाची सांगडी लावुनीयां कांसे । नामदेवें कैसें उतरिलें ॥ २ ॥
नाम मज देईं आणिक न मागों काई । प्रेम तुझे पायीं असों द्यावें ॥ ३ ॥
पतितपावन देवकीनंदना । हरि नारायणा पद्मनाभा ॥ ४ ॥
मुखीं तुझें नाम आवडी प्रेमाची । मग वैकुंठींची चाड नाहीं ॥ ५ ॥
सुखाच्या सागरा केशवा उदारा । तूं आम्हां सोयरा जिवलगू ॥ ६ ॥
द्यावा प्रेमसौरसू नामामृतरसू । विठा विष्णुदासू विनवितसे ॥ ७ ॥

( २० )

माय वेल्हाळी वेल्हाळी । ब्रम्हरस पान्हावली ॥ १ ॥
दोहणार चौघे जण । धार सुटेना अजून ॥ २ ॥
सहा लागले कासेसी । अठरा करिती निदिध्यासी ॥ ३ ॥
न कळे ब्रम्हादिकां वाटा । म्हणे नामयाचा विठा ॥ ४ ॥

( २१ )

धरोनी हनुवटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ १ ॥
म्हणे मी ऐसाची पाहीन । चरण धरोनी राहीन ॥ २ ॥
जेंवी कमळणी दिनकरा । चातका वरुषे जळधारा ॥ ३ ॥
बालक जननीये भावी । चकोर चंद्रातें आळवी ॥ ४ ॥
कृपणाचें ठेविलें धन । तेथुनि त्याचें न निघे मन ॥ ५ ॥
विठा विनवी अनुसंधानें । तुज असतां मज काय उणें ॥ ६ ॥

( २२ )

नामयाचे वंशीं मैंद जन्मला । मार्ग हा पाडिला वैकुंठींचा ॥ १ ॥
सतरावीचे पाश घेउनियां हातीं । वाट दिवसरातीं पाडीतसे ॥ २ ॥
मैंदाच्या हाता आला सावकार । भांडारी कुबेर घरीं ज्याचे ॥ ३ ॥
नामयाचा विठा सत्य हा मैंद । भुलवुनी गोविंद म्हणवी तुझें ॥ ४ ॥

( २३ )

नामयाचे वंशीं जन्मलें लबाड । साधिलें घबाड विटेवरी ॥ १ ॥
प्रपंचासी आम्हीं सोडिलें उदक । वैकुंठनायक आप्त केला ॥ २ ॥
लौकिकाची लाज निश्चयें सोडिली । दृढ मिठी दिली विठोपायीं ॥ ३ ॥
लबाड म्हणती निर्माण पैं झालें । तेथें बुडविलें मीतूंपण ॥ ४ ॥
नामयाचा विठा सत्याचा लबाड । प्रपंच काबाड ब्रम्ह केलें ॥ ५ ॥

( २४ )

उदर भरावया घेउनियां सोंग । घरोघरीं बोंब उपदेशाची ॥ १ ॥
आपणा कळेना लोकां सांगे ज्ञान । धरूनियां ध्यान बक जैसा ॥ २ ॥
आपण बुडाले आणिकां बुडविती । हात धरुनी जाती यमलोका ॥ ३ ॥
दुरी पंथ जाणें तयां यमपुरीं । पापाची शिदोरी बांधुनीयां ॥ ४ ॥
विठा म्हणे काय करुं त्यांच्या कपाळा । पापाचा कंटाळा न धरिती ॥५॥

( २५ ) ( गोंधळ. )

त्रैलोक्यामाझारी एक विठाबाई सुंदरी हो ।
पुंडलिकाकारणें तिष्ठत भीमातीरीं हो ॥ १ ॥
उदो बोला उदो बोला विठाबाई माउलीचा हो ॥ ध्रु० ॥
मांडिला देव्हारा तुझा त्रिभुवनामाझारी हो ।
चौक साधियला नाभीं कळस ठेविला वरी हो ॥ २ ॥
गोंधळ्यांमाझारी एक पुंडलीक नेटका हो ।
घातला गोंधळ विठाई दाविली तिहीं लोकीं हो ॥ ३ ॥
गोंधळ घालित गेली कैसी रावणाच्या घरा हो ।
शरणागत रक्षिले वधियलें दशशिरा हो ॥ ४ ॥
आषाढी कार्तिकी तुझा गोंधळ वाळवंटीं हो ।
येती सनकादिक गरुडटकेयांची दाटी हो ॥ ५ ॥
करुनि गोपाळकाला गोंधळ घाली वेणुनादीं हो ।
गोपिकांसहित सर्वे गोपाळांची मांदी हो ॥ ६ ॥
नामयाचा विठा कैसा गोंधळी नेटका हो ।
वडिलांची विठाई कुलस्वामिनी अंबिका हो ॥ ७ ॥

पुंडलीक वरदे हरिविठ्ठल !

---

# नामदेवांचे समकालीन संत

नामदेवांच्या समकालीन संतांपैकीं पुढील संतांचीं नांवें जुन्या ग्रंथांत सांपडतात:- १ निवृत्ति २ ज्ञानदेव ३ सोपान ४ मुक्ताबाई ५ विसोबा खेचर ६ चांगदेव ७ परिसा भागवत ८ साळ्या रसाळ ९ राका कुंभार १० गोरा कुंभार ११ जनी १२ कूर्मदास १३ भानुदास (पैठणकर नव्हे) १४ कान्हो पाठक १५ चोखामेळा १६ सांवता माळी १७ नरहरि सोनार १८ कान्होपात्रा १९ जगमित्र नागा २० सच्चिदानंद बाबा २१ सुदामा २२ आसंद २३ जोगा परमानंद. नामदेवांनंतर तीनशें वर्षांनीं महाराष्ट्रांत जसा साधुसंतांचा सुकाळ झाला होता तसाच तो नामदेवांच्या कालींही झाला होता हें वरील यादीवरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल. वरील सर्व संतांचीं चरित्रें हल्लीं उपलब्ध नाहींत. तथापि प्रयत्नांतीं जी काय थोडीबहुत माहिती जुन्या ग्रंथांत सांपडली ती येथें यथाक्रम देऊन हें ग्रंथाचें शेवटचें प्रकरण पुरें करूं.

## गोरा कुंभार

**गोरा ज्या म्हणती त्या स्मरुनि सुखी तूं मना कुलाला हो।**
**घे भक्तिचा जयाची मति संसारीं अनाकुला लाहो ॥ १ ॥**

सन्मणिमाला, मोरोपंत.

गोरा कुंभार हे नामांकित 'संत-परीक्षक' ज्ञानदेव-नामदेवांचे समकालीन होत. यांचें चारित्र महीपति, उद्धवचिद्घन आणि भीमस्वामी रामदासी यांनीं आपल्या ग्रंथांत दिलें आहे, त्याच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे. सत्यपुरी उर्फ तेर नामक गांवीं गोरोबा कुंभार राहत असत. महिपतींनीं या गांवाचें नांव 'तरढोकी' असें लिहिलें आहे. गोरोबा कुंभार हे महाभगवद्भक्त होते. 'अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां। सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां ॥ घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं। समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं' ह्या पंडितोक्तीप्रमाणें गोरोबांचें वर्तन असे. 'संसारधंदा करितां रिकामा। होशील केव्हां भजशील रामा॥ आतां तरी तूं धरिं एक नेमा। कामांत कामा भज रामनामा॥' ही समर्थोक्ति गोरोबांच्या नित्याचरणांत पूर्णपणें प्रतिबिंबित झालेली होती. कामधंदा करीत असतांही पांडुरंगाचें नामस्मरण करावयाचें, हा यांचा नित्यक्रम. माती तुडवितांना

प्रेमानंदानें नाचावें, हाच त्यांचा परमार्थ ! एके दिवशीं गोरोबा माती तुडवीत असतां, त्यांची स्त्री आपल्या लहान मुलास तेथें ठेवून पाणी आणण्यास गेली. इकडे तें मूल रांगत रांगत जाऊन मातीच्या आळ्यांत पडलें. ' ब्रह्मानंदीं टाळी ' लागलेल्या गोरोबांनीं मातीबरोबर तें मूलही तुडविलें !

इकडे गोरोबांची पत्नी पाणवठ्यावरून येऊन पाहते, तों मूल कोठेंच दिसेना. उद्धवचिद्धन म्हणतात—

**पाहे तों चिखलांत जावळ मांसास्थी दिसताती ।**
**' जळो भजन हें बाळक मारिलें ' वदन पिटी ती हातीं ॥**

सगळा चिखल रक्तानें लाल झालेला पाहतांच गोरोबांनीं मूल मारिलें हें तिच्या लक्ष्यांत येऊन, तिनें रडून ओरडून आकांत केला; व ' आग लागो या भजनाला ' असें म्हणून गोरोबांस ती रागें भरली. भजनास विक्षेप झालेला पाहतांच, हातीं चक्रदंड घेऊन गोरोबा आपल्या पत्नीस शिक्षा करण्यासाठीं तिच्या अंगावर धावून गेले. आतां हे आपणास मारल्याशिवाय राहात नाहींत, असें पाहून, पुत्रविरहानें दुःखी झालेल्या संतीनें–हें तिचें नांव होतें–' माझ्या अंगास हात लावाल तर तुम्हास विठोबाची आण आहे ' अशी शपथ गोरोबांस घातली. गोरोबांचें सर्वस्व म्हणजे विठोबा, त्याची आण ते कशी मोडतील ? त्यांनीं हातींचा दंड फेंकून दिला व पुनः भजनानंदांत ते निमग्न झाले. बरेच दिवस गेले, तरी गोरोबा आपल्याशीं भाषणही करीत नाहींत, हें पाहून त्यांची स्त्री एके दिवशीं त्यांची पादसेवा करावयास गेली. पण गोरोबांनीं तिला आपल्या अंगास स्पर्श करूं दिला नाहीं. ते म्हणाले, ' तूं मला विठोबाची आण घातली आहेस, ती मला पाळली पाहिजे. ' यावर त्यांची पत्नी म्हणाली, ' अशानें संसार कसा होईल ? मजकडून अपराध घडला खरा; पण त्याची क्षमा करून आपण माझा अंगीकार करावा.' गोरोबांनीं तिला निक्षून सांगितलें कीं, ' माझा निश्चय आतां कांहीं ढळणार नाहीं. '

कांहीं दिवस गेल्यावर **संती** आपल्या माहेरीं गेली, व इत्थंभूत हकीकत तिनें आपल्या आई–बापांस कळविली. ती म्हणाली ' पतीनें माझा त्याग केल्यामुळें, आमचा वंश खुंटल्यासारखा झाला आहे. तरी माझी धाकटी बहीण माझ्या पतीस देऊन वंशवृद्धि होईल असें केलें पाहिजे. ' मुलीची ही दशा पाहून आई–बापांस फार वाईट वाटलें. त्यांनीं आपली धाकटी मुलगी **रामी** गोरोबांस दिली व लग्नसमारंभ आटोपल्यावर मुलीच्या बापानें गोरोबांस विनंति केली कीं,

**‘ हरिचे दास तुह्मीं सज्जन तुम्हां लहान थोर नाहीं ।
दोघींचेंही समान पाळण आण विठूची पाहीं ॥ ’**

आपल्या श्वशुरानें घातलेली ही आण गोरोबांनीं शिरसा मान्य केली. ते आपल्या दोन्ही स्त्रियांसहवर्तमान तरढोंकीस आले, व त्या दोघींसही अगदीं समभावानें वागवूं लागले. पहिलीप्रमाणेंच दुसरीच्या अंगासही त्यांनीं कधीं स्पर्श केला नाहीं. हें पाहून एके दिवशीं **संती** गोरोबांस म्हणाली, ‘ माझी अशी दशा झाली ती झालीच; पण माझी धाकटी बहीणही तुमच्या मनास कां येत नाहीं ? त्या बिचारीनें तुमचा काय अपराध केला आहे ? ’ गोरोबा म्हणाले, ‘ तुझ्या बापानें विठ्ठलाची शपथ घालून मला सांगितलें आहे कीं, दोन्ही स्त्रियांस सारख्या रीतीनें वागवा; त्याप्रमाणें तूं जशी मला अस्पर्श्य आहेस, तशीच तीही आहे. विठ्ठलाची शपथ मी कशी मोडूं ? ’ गोरोबांचें हें भाषण ऐकून बिचारी **रामी** रडूं लागली. मग **संतीनें** तिची समजूत केली व तिला सांगितलें कीं, आपण आज रात्रीं या गोष्टीचा विचार करूं. ’ मग रात्रीं, गोरोबांस झोंप लागली असें पाहून त्या दोघीही त्यांच्या शेजारीं जाऊन निजल्या व गोरोबांचे हात त्यांनीं आपापल्या उरावर ठेविले. गोरोबा जागृत होऊन पहातात, तों आपले हात आपल्या स्त्रियांच्या उरावर आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. विठोबाची शपथ मोडल्याबद्दल त्यांस अतिशयित वाईट वाटलें. मग ज्या हातांनीं हें कर्म केलें, त्यांस शिक्षा करण्यासाठीं त्यांनीं आपले दोन्ही हात शस्त्रावर आपटून तोडून टाकिले ! आपल्या युक्तीचा हा भयंकर परिणाम झालेला पाहून रामी व संती रडूं लागल्या. त्या म्हणाल्या, ‘ संसार करावा असें आमच्या नशीबींच नाहीं ! वंशवृद्धि व्हावी म्हणून दुसरें लग्न केलें तों हें भलतेंच विघ्न उपस्थित झालें. आमचें दुर्दैव म्हणून आम्हांवर देव कोपला, दुसरें काय ? ’ आपल्या स्त्रिया फार कष्टी झालेल्या पाहून गोरोबांसही वाईट वाटलें. ते म्हणाले, ‘ तुम्ही आतां दुःख करूं नका, स्वस्थ असा. श्रीपांडुरंग आपला पाठीराखा आहे, त्यास आपली सर्व काळजी आहे. सगळीं संकटें निवारण करून तोच आपणास सुख देईल. त्याचें निरंतर नामस्मरण करा. ’

पुढें आषाढी एकादशी आली, तेव्हां गोरोबा आपल्या दोन्ही स्त्रियांसह पंढरीस आले. चंद्रभागेंत स्नान करून त्यांनीं पुंडलिकाचें दर्शन घेतलें व महाद्वारीं येऊन भगवंतास लोटांगण घातलें. इकडे गरुडपारावर नामदेवांचें कीर्तन चाललें होतें. ज्ञानदेवादि भक्तमंडळी कीर्तन ऐकावयास बसली होती. कीर्तनांत ‘ विठ्ठल ’ म्हणून टाळी देण्याचा प्रसंग येतांच सगळे श्रोते टाळ्या वाजवूं लागले. नामदेवांच्या प्रासादिक वाणीनें तन्मयवृत्ति झालेल्या गोरोबांनींही टाळी वाजविण्यासाठीं आपले थोटे हात वर केले !

त्या वेळीं भगवंतानें गोरोबांचे हात पूर्ववत् केले व हा चमत्कार पाहून सगळ्या संतांस मोठें नवल वाटलें. त्यांनीं हरिनामाचा मोठा गजर केला. आपल्या पतीचे हात पूर्ववत् झाले हें पाहून गोरोबांच्या ज्येष्ठ पत्नीनें हात जोडून पांडुरंगाची प्रार्थना केली कीं, ' पंढरिनाथा ! आपल्या भक्ताकडे तूं कृपादृष्टीनें पाहतांच त्याचे हात पूर्ववत् झाले; पण मी माझ्या बालकाच्या वियोगानें कष्टी होत आहें, तर माझी आणि माझ्या बालकाची भेट करून देण्यास तूं समर्थ नाहींस काय? ' असें बोलून संती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. ही तिची दुःस्थिति अवलोकन करून भक्तकामकल्पद्रुम भगवंतास तिची करुणा आली व त्यानें तिच्या मुलास रांगत रांगत तिजकडे पाठविलें ! उद्धवचिद्धन म्हणतात:—

**' रांगत बाळक धावुनि आलें, महिमा हा नामाचा ।**
**वेदशास्त्र पुराण वर्णी, कुंठित शेषवाचा ॥ '**

मग धांवत जाऊन संतीनें आपल्या सुंदर बालकास उचलून कडेवर घेतलें व त्याच्या मुखाचें चुंबन केलें. हा देखावा पाहून त्या कोमल अंतःकरणाच्या साधुसंतांचे नेत्र अश्रुपूर्ण झाले. मग रुक्मिणीनें गोरोबांस सांगितलें कीं, ' आजपासून तुझी शपथ सुटली. आतां तूं आपल्या दोघी स्त्रियांचा अंगीकार करून सुखानें संसार चालव. ' जगन्मातेची ही आज्ञा ऐकतांच अखिल संतांनीं गोरोबांचा जयजयकार केला. गोरोबांनींही आपल्या स्त्रियांचा सप्रेम अंगीकार केला.

एकदां गोरोबांस असें वाटलें कीं, सगळ्या सत्पुरुषांस एके दिवशीं आपल्या घरीं बोलवावें. मग त्याप्रमाणें त्यांनीं प्रत्येक साधूच्या घरीं जाऊन ' आपल्या आगमनानें माझा आश्रम आपण पवित्र करावा ' अशी त्यांस विनंति केली. गोरोबांच्या विनंतीस मान देऊन सर्व साधु यांच्या घरीं आले. ' साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ' असें मानणाऱ्या गोरोबांस संतदर्शनानें मोठा आनंद झाला; त्यांनीं त्यांची षोडशोपचारें पूजा केली व त्यांस पंचपक्वान्नांचें भोजन घातलें. निवृत्ति, ज्ञानदेव, सांवता माळी, सोपानदेव, नामदेव इत्यादि संत एकत्र बसले असतां, ज्ञानदेव म्हणाले " गोरोबा, आपल्या घरीं आज जे घट तुम्हीं जमविले आहेत, त्यांत पक्के घट कोणते व कच्चे कोणते याची परीक्षा करून, काय निकाल होईल तो मला सांगा. ' ज्ञानदेवांच्या ह्या आज्ञेचा गर्भितार्थ गोरोबांनीं तत्काल जाणला; व आपली थापटी हातीं घेऊन प्रत्येक संताच्या मस्तकावर ती ते हाणीत चालले ! थापटीचा आघात नामदेवांशिवाय सर्व संतांनीं निमूटपणें सहन केला. गोरोबा नामदेवांपाशीं आले, तेव्हां

नामदेव त्यांस म्हणाले, ‘ तूं हा काय उद्योग चालविला आहेस ? लोकांस आपल्या घरीं जमवून थापटीनें त्यांचीं डोकीं फोडावीं, हा कोणत्या गांवचा आदरसत्कार ? ’ नामदेवांचें हें भाषण ऐकतांच सगळे संत हांसले व गोरोबांनीं नामदेवांकडे बोट दाखवून ज्ञानदेवांस कळविलें कीं ‘ हा एवढा एक घट मात्र कच्चा आहे. ’ तेव्हां मुक्ताबाई गोरोबांस म्हणाली, ‘ तुम्हीं केलेली परीक्षा अगदीं बरोबर आहे. ’ हें ऐकतांच सगळे संत खदखदां हंसूं लागले व त्यामुळें नामदेव मनांत फार ओशाळे झाले.

पुढें नामदेव तेथून निघून पंढरपुरास आले, व गोरोबांच्या घरीं झालेल्या स्वतःच्या अपमानाची सविस्तर हकीकत त्यांनीं पांडुरंगास निवेदन केली. पांडुरंग म्हणाला, ‘ नाम्या ! गोरोबांनीं जी परीक्षा केली, ती अगदीं बरोबर आहे; जो मनुष्य सद्गुरूला शरण गेला नाहीं, तो केवढाही मोठा व्युत्पन्न आणि भक्तिमान् असला, तरी तो कच्चाच आहे, असें म्हटलें पाहिजे. ’ ही भगवदुक्ति ऐकून नामदेव अगदीं विरघळून गेले. ते म्हणाले, ‘ देवा ! माझ्या अपमानदुःखाचा तूं परिहार करशील अशा समजुतीनें मी तुजपाशीं आलों; पण तूंही गोरोबांच्याच म्हणण्याचा अनुवाद करितोस. आतां पुढें मीं करावें तरी काय ? ’ देव म्हणाले, ‘ तूं आतां सद्गुरूस शरण जाऊन त्याचा उपदेश घे, म्हणजे तुला अद्वैताचें खरें रहस्य काय आहे, हें कळून येईल. ’ त्याप्रमाणें पुढें नामदेवांनीं विसोबा खेचर यांजकडून उपदेश घेतला व इतर संतांच्या समुदायांत ‘ पक्का घट ’ म्हणून प्रवेश करण्याचा अधिकार संपादन केला. एकंदरींत, सत्पुरुष या नात्यानें तत्कालीन संतमंडळांत गोरोबांची योग्यता फार मोठी होती, हें वरील कथेवरून अगदीं स्पष्ट होत आहे. यासंबंधानें पंतांनीं म्हटलें आहेः—

## आर्या

**‘ सद्गुरुअनुग्रहाविण हरिला तो कठिण सर्वथा पटणें ।**
**गोरा संत परीक्षी मस्तकिं हाणूनि सर्व थापटणें ॥ १ ॥ ’**

गोरोबांचे ४३ अभंग ‘ सर्वसंग्रह गाथा ’ या ग्रंथांत दिले आहेत. पण त्यांतील बहुतेक अभंग प्रक्षिप्त दिसतात; उदाहरणार्थ, पुढील अभंग पहाः—

**‘ पाहुनियां दोघी करिती रुदन । हात आपटोन रडताती ॥ १ ॥**
**कैसें या विठ्ठलें विपरीत केलें । जगामध्यें जालें हांसें आमुचें ॥ २ ॥**
**पूर्वीं यानें घरें बहुतांचीं बुडविलीं । नारद भीष्म बळी रुक्मांगद ३**
**प्रत्यक्ष कुब्जा पांगुळ तो जाणा । सूरदास नयनां हीन जगीं ॥ ४ ॥**

**कबीर नामयाचे घरीं नाहीं अन्न । ऐशी पैं निर्वाण भक्ति याची ५**
**संती आणि रामी उभयतां रडती । गोरा म्हणे खंती करूं नका ॥६॥**

या अभंगाची भाषा ६०० वर्षांपूर्वीची जुनी दिसत नाहीं; पण ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी शिवायकरून, तत्कालीन इतर संतांचे म्हणून जे अभंग आज प्रसिद्ध आहेत, त्या सर्वांची भाषा कमी अधिक प्रमाणानें इतकीच सोपी असल्यामुळें, हा भाषेचा मुद्दा जरी सोडून दिला, तरी वरील अभंगांतील **कबीर व सूरदास**[1] हीं नांवें त्या अभंगाचें अर्वाचीनत्व उघड सिद्ध करीत आहेत. कारण सूरदास हे शके १५०० च्या सुमारास, म्हणजे अकबर बादशहाच्या कारकीर्दींत होऊन गेले व गोरोबा शके १२२० च्या सुमारास होऊन गेले. अर्थात् सूरदासांचा उल्लेख गोरोबांच्या अभंगांत येणें केवळ असंभवनीय होय. त्याचप्रमाणें रा० राजवाडे यांनीं सरस्वतीमंदिरांतल्या 'नाभाजीनें व महीपतीनें वर्णिलेले संत' या निबंधांत* शके १३७० व शके १५२० हा कबीरांचा काल दिला आहे; यांपैकीं कोणताही एक काल जरी खरा मानला, तरी कबीरांचें नांव गोरोबांस ठाऊक असणें मुळींच शक्य नाहीं, हें उघड आहे. अशा स्थितींत वरील अभंग प्रक्षिप्त आहे, असें म्हणण्यास बिलकूल प्रत्यवाय नाहीं. सर्वसंग्रह गाथेंतल्या गोरोबांच्या ४३ अभंगांपैकीं २१ अभंगांत खुद्द गोरोबा कुंभारांचें चरित्र दिलें असून,

---

१ सूरदास हे नामांकित साधु व कवि सुमारें ३०० वर्षांपूर्वी उत्तर हिंदुस्थानांत होऊन गेले. हे जन्मांध होते. यांचा हिंदी भाषेंत 'सूरसागर' नामक ग्रंथ आहे. यांची वाणी अत्यंत रसवती, प्रौढ व कवित्वपूर्ण आहे.

* कै० राजवाडे यांचा सदर निबंध फार चांगला व उपयुक्त आहे. ह्या एकाच निबंधावरून राजवाड्यांची शोधकबुद्धि व श्रमसहिष्णुता हे गुण स्पष्टपणें दृश्यमान् होतात. पण या निबंधांत थोडासा घोंटाळा झाला असावा असें माझ्या अल्पबुद्धीस वाटतें. ह्या विधानाच्या समर्थनार्थ येथें एकच उदाहरण देतों. सदर निबंधाच्या १२ व्या पृष्ठावर रामानंदांचा काल शके १४९० दिला असून, त्यांच्या समकालीन शिष्यांत कबीरांचें नांव दिलें आहे. अर्थात्, या मानानें कबीरांचा काल शके १५०० हा येतो. पुढें, १४।१५ पृष्ठांवर कबीरांचे शिष्य पद्मनाभ, जीवा व तत्वा यांचा काल शके १३९० हा दिला आहे. आतां, शके १४९० त विद्यमान असलेल्या रामानंदांचे शिष्य कबीर यांचें शिष्यत्व, शके १३९० तल्या पद्मनाभाकडे कसें जाऊं शकेल, याचा विचार वाचकांनींच करावा.

त्यांत ठिकठिकाणीं गोरोबांची फार स्तुति केली आहे. आतां, गोरोबांसारखा 'संतपरीक्षक' स्वतःच्या कवितेंत स्वतःचीच स्तुति करील, अशी कल्पना करणेंही कठीण आहे. अर्थात् हे अभंग पुढें कोणी तरी गोरोबांच्या नांवावर घुसडून दिले असले पाहिजेत हें उघड आहे. अशा प्रकारच्या अभंगांचा नमुना पहाः—

१

**सकळ संतजनीं देखोनीं नयनीं । टाळिया पिटोनि गाती नाम ॥१॥**
**म्हणती धन्य भक्त निधडा वैष्णव। ब्रह्मादिकां भाव न कळे त्याची ॥२॥**
**ऐशी स्तुति करितां बाळ आलें तेव्हां । गोरा म्हणे देवा पावन केलें ॥३॥**

२

**वैराग्याचा मेरु तो गोरा कुंभार । तोडियेले कर आणेसाठीं ॥ १ ॥**
**महाद्वारीं कथा श्रवण करितां । टाळी वाजवितां निघती नवे ॥२॥**
**देवा तुम्हीं कृपादृष्टी अवलोकिला । हृदयीं धरिला प्रीति करीं ॥३॥**
**गोरा म्हणे तुह्मां दासाचा अभिमान । अवतार म्हणोन धरणें लागे ४**

ह्या दोन अभंगांवरून, माझ्या वरील अनुमानाची सत्यता वाचकांच्या लक्ष्यांत येईल असें वाटतें. आतां खुद्द गोरोबांचे असे जे कांहीं अभंग आहेत, त्यांपैकीं कांहीं अभंग पुढें देतोंः—

१

**वंदावें कवणासी निंदावें कवणासी । लिंपण गगनासि कैसें लिंपे ॥१॥**
**नाहीं जया रूप नाहीं जया नाम । तेंची व्यापी वर्म सांगतसे ॥ २ ॥**
**जिवनीं चंद्रबिंब बिंबलें पैं साचा । परि नाहीं तयाचा लेप तेथें ॥३॥**
**म्हणे गोरा कुंभार नामया जिवलगा । आलिंगन दे गा मजलागीं ॥४॥**

२

**स्थूळ होतें तें सूक्ष्म पैं जहालें । मन हें बुडालें महाडोहीं ॥ १ ॥**
**माझें रूप माझ्या विरालेंसे डोळां । सामावलें बुबुळा ज्ञानें माझ्या २**
**म्हणे गोरा कुंभार नवल जाहलें नाम्या। भेटी तुह्मा आह्मा उरली नाहीं**

३

**निर्गुण रूपडें सगुणाचे बुंथी । विठ्ठल निवृत्ति प्रवृत्ति दिसे ॥ १ ॥**
**एक पुंडलीक जाणे तेथिल पंथ । तुह्मा आह्मा उचित भाग्ययोगें ॥२॥**
**सभाग्य विरळे नामपाठीं गेले । अभागी ते ठेले मौनरूप ॥ ३ ॥**
**म्हणे गोरा कुंभार नामया भोगितां । उरल्या उचिता सेवूं सुखें ॥४॥**

४

निर्गुणाचा संग धरिला जो आवडी। तेणें केलें देशधडी आपणियासी
अनेकत्व नेलें अनेकत्व नेलें। एकलें सांडिलें निरंजनीं ॥ २ ॥
एकत्व पाहतां अवघें लटिकें। जें पाहे तितुकें रूप तुझें ॥ ३ ॥
म्हणे गोरा कुंभार सखया नामदेवा। तुम्हां आम्हा नांवा कैंचें कोण

५

केशवाचे भेटी लागलेंसे पिसें। विसरलों कैसे देहभावा ॥ १ ॥
जाहली झडपणी जाहली झडपणी। संचरलें मनीं रूप आधीं ॥२॥
न लिंपेचि कर्मी न लिंपेचि धर्मी। न लिंपे षड्डुर्मी पुण्यपापा ॥३॥
म्हणे गोरा कुंभार सहजीं जीवन्मुक्त। सुखरूप अद्वैत नामदेवा ॥४॥

६

सरितेचा ओघ सागरीं आटला। विदेही भेटला मनामन ॥ १ ॥
कवणाची संगत पुसावया कवणातें। सांगतें ऐकतें तेथं कैंचें ॥२॥
नाहीं दिवसराती नाहीं कुलयाती। नाहीं माया भ्रांती अवघीच॥३॥
म्हणे गोरा कुंभार परियेसीं नामदेवा। सांपडला ठेवा विश्रांतीचा ४

७

देवा तुझा मी कुंभार। नाशीं पापाचे डोंगर ॥ १ ॥
ऐशा संतापें हे जाती। घडे साधूची संगती ॥ २ ॥
पूर्ण कृपा भगवंताची। कुंभार गोरा मागें हेंची ॥ ३ ॥

८

जोहरियाचे पुढें ठेवियलें रत्न। त्याचें मोल उणें होइल कैसें ॥१॥
तैसें थापटणें पारखीया हातीं। आणिका न देती वायांवीण ॥२॥
प्रथम थापटणें निवृत्तीचे डोकया। डेरा जाहला निका परब्रह्म ॥३॥
तेंची थापटणें ज्ञानदेवावर। आतां कैंचें कोरें नुरे येथें ॥ ४ ॥
तेंची थापटणें सोपानाच्या डोई। यांत लेश नाहीं कोरें कोठें ॥ ५ ॥
तेंची थापटणें मुक्ताबाईसी हाणी। अमृतसंजीवनी भरलीसे ॥ ६ ॥
तेंची थापटणें नामदेवावर। चोळीत समोर रडूं लागे ॥ ७ ॥
गोरा म्हणे कोरा राहिला गे बाई। शून्यभार नाहीं भाजियेला ॥८॥

९

ब्रह्म मूर्तिमंत जगीं अवतरलें । उद्धरावया आलें दीन जनां ॥
ब्रह्मादिक ज्याचें वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती २
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरती ॥ ३ ॥
अखंडित गोरा त्याची वास पाहे । निशिदिनीं ध्याये संतसंग ॥४॥

१०

मुकिया साखर चाखाया दिधली । बोलतां ती बोली बोलवेना ॥१॥
तो काय शब्द खुंटला संवाद । आपुला आनंद अवधाराया ॥ २ ॥
आनंदीं आनंद गिळोनी राहणें । अखंडित होणें न होउनियां ॥३॥
म्हणे गोरा कुंभार जीवन्मुक्त होणें । जग हें करणें शहाणें बापा ॥४॥

११

कासयासी बहु घालसी मळण । तुज येणेंविण काय काज ॥ १ ॥
एकपणें एक एकपणें एक । एकाचे अनेक विस्तारले ॥ २ ॥
एकत्व पाहतां शिणलें अवधारा । न चुके वेरझारा चौऱ्यांशींच्या ३
म्हणे गोरा कुंभार कोणी नाहीं दुजें । विश्वरूप तुझें नामदेवा ॥ ४ ॥

गोरोबांचे कित्येक अभंग नामदेवांस उपदेश करण्यासाठीं रचलेले दिसतात. गोरोबांनीं केलेल्या संतपरीक्षेंत उत्तीर्ण न झाल्यामुळें नामदेव रुसून गेले होते, तेव्हां त्यांची समजूत करण्यासाठीं काकांनीं—तत्कालीन संत गोरोबांस काका म्हणत असत—हे अभंग रचले असावेत असें दिसतें.

गोरोबांचें तेरढोकी हें गांव पंढरपुरापासून २५।३० कोसांवर, मोगलाईत उस्मानाबाद जिल्ह्यांत असून, तेथें गोरोबांची समाधि आहे, तिच्यावर देऊळ बांधलेलें असून पुष्कळ भाविक लोक तेथें जात असतात. गोरोबांचा मृत्युशक उपलब्ध नाहीं, परंतु 'भक्तकथातत्त्व'नामक ग्रंथांत त्यांच्या जन्मकालाविषयीं पुढील माहिती आढळते:—

कुलाळवंशीं एक जाण । महादु कुंभार नामाभिधान ।
तया गांवींचे वतन । करी भजन श्रीहरीचें ॥
तया पोटीं झाला सुत । गोरा कुंभार जगविख्यात ।
अकराशें एकोणणवदांत । प्रभव नामसंवत्सर ॥

गोरोबांच्या घराची व जेथें त्यांनीं मूल तुडविलें ती जागाही तेरढोकी तेथील लोक अद्याप दाखवितात. गोरोबांचा वंश आतां शिल्लक नाहीं.

# नरहरि सोनार



**नरहरिनामा पावे संत न सोनार दास मान कसा।**
**तरला करुनि भवाचा अंत नसो नारदासमान कसा ॥ १ ॥**

सन्मणिमाला—मोरोपंत.

नरहरि सोनार हे प्रसिद्ध साधु शा० वा० शके १२३५ च्या सुमारास पंढरपुर येथें होऊन गेले. ते मोठे शिवभक्त होते. पंढरपुरी राहत असूनही ते पांडुरंगाच्या दर्शनास कधीं जात नसत. मल्लिकार्जुनाचें पूजन व भजन यांतच ते सदा निमग्न असत. पंढरपुरच्या श्रीविठ्ठलास एका सावकारानें असा नवस केला होता कीं, 'जर मला पुत्र झाला, तर मी तुला सुवर्णाचा करगोटा वाहीन.' पुढें त्याला पुत्र झाला व पांडुरंगाचा नवस फेडण्यासाठीं तो पंढरपुरास आला. तेथें, सुवर्णाचा करगोटा करून त्याजवर हिरे, माणकें जडवील असा चांगला कुशल सोनार कोण आहे, याबद्दल त्यानें चौकशी केली. तेव्हां पुजाऱ्यांनीं त्यास नरहरि सोनाराचें नांव सांगितलें. सावकार नरहरीच्या घरीं गेला व त्यानें त्यांस सुवर्णाचा रत्नखचित करगोटा करून देण्यास सांगितलें. नरहरि म्हणाले, 'तुम्हीं श्रीविठ्ठलाच्या कंबरेचें मोज घेऊन या, म्हणजे त्याप्रमाणें मी करगोटा तयार करून देतों.' 'ठीक आहे' म्हणून सावकार देवळांत गेला व मोज आणून त्यानें तें नरहरि सोनारास दिलें. त्याप्रमाणें त्यांनीं करगोटा तयार करून सावकारास दिला. मग सावकारानें विठ्ठलाची षोडशोपचारें पूजा केली व देवाच्या कंबरेस करगोटा बांधिला. पण तो थोडासा आंखूड आहे असें आढळून आलें. सावकार पुनः नरहरीकडे गेला व त्यांजकडून त्यानें तो करगोटा वाढवून घेतला. पुनः देवळांत येऊन सावकारानें करगोटा देवाच्या कंबरेस बांधला, पण तो सैल होतो असें त्यास दिसून आलें. तेव्हां नरहरीकडे जाऊन 'तुम्हीच देवळांत या व तेथल्या तेथें करगोटा नीट करून तो देवाच्या कंबरेस बरोबर बसेल, अशी व्यवस्था करा' अशी सावकारानें त्यांस विनंति केली. नरहरि म्हणाले 'मी व्रतस्थ आहें, एका शंकराशिवाय अन्य देवाचें दर्शन मी घेत नाहीं.' परंतु सावकारानें फारच आग्रह केल्यामुळें आपले डोळे बांधून नरहरि सोनार विठ्ठलमंदिरांत गेले. त्यांचे डोळे बांधलेले पाहून क्षेत्रवासी लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व त्यांनीं त्यांचा फार उपहास केला.

नरहरि सोनार देवळांत गेले व विठ्ठलमूर्तीस हातांनीं चांचपूं लागले. तों असा चमत्कार झाला कीं, ती मूर्ति शंकराची आहे असें त्यांस वाटलें. दहा हात, पांच तोंडें, गळ्यांत सर्पांचे अलंकार, मस्तकीं जटाजूट असा शंकराचा थाट त्यांच्या हातास लागला. ते म्हणाले, हें तर माझेंच आराध्य दैवत आहे. मग त्यांनीं आपले डोळे बांधले होते ते सोडले व मूर्तीकडे पाहिलें, तों ती शंकरमूर्ति नसून विठ्ठलमूर्ति आहे, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्यांनीं पुनः डोळे झांकले व हातांनीं मूर्तीस चांचपून पाहिलें, तों पुनः दशभुज पंचवदन शिवमूर्ति त्यांच्या हातास लागली. पण डोळे उघडून पाहतात तों श्रीविठ्ठल पुढें उभा ! मग मात्र नरहरींस पश्चात्ताप झाला. त्यांनीं सद्गदित अंतःकरणानें पांडुरंगास साष्टांग नमस्कार घातला व त्याची प्रार्थना केली कीं, 'हे देवा पंढरिनाथा ! मीं अज्ञानानें द्वैतभाव मनांत धरला होता; पण तुझ्या कृपेनें त्या द्वैताचा आज निरास होऊन, 'सर्वदेवनमस्कारं केशवं प्रतिगच्छति' या सिद्धांताची सत्यता पूर्णपणें माझ्या अनुभवास आली. मी तुला शरण आलों आहें; मजवर तुझी कृपा असूं दे.' मग भगवंतांनीं नरहरींची समजूत केली व त्या दिवसापासून नरहरि सोनारांनीं आपलें शेष आयुष्य भगवद्भजनांत वेंचिलें.

नरहरि सोनारांचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत; त्यांपैकीं बारा निवडक अभंग पुढें दिले आहेत. ही सत्पुरुषांची वाणी आहे, ती भाविकपणानेंच ऐकली पाहिजे.

१

**निगम हा वेल प्रकाशमान जाहला। भक्ति फुलें त्याला शोभताती १**
**निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताई। घनदाट पाहीं फळें आलीं ॥ २ ॥**
**तयांचिया चरणीं सोनार नरहरि। झाडलोट करी तया द्वारीं ॥३॥**

२

**संवगडे निवृत्ति सोपान मुक्ताई। ज्ञानदेवापायीं भाव माझा ॥ १ ॥**
**धन्य ते वैष्णव मिळाले सकळीं।जीवभाव ओंवाळीं तयां चरणीं॥२॥**
**अखंड ध्यानीं ध्यातो हृदयीं साचार।नरहरि सोनार कायामनें ॥ ३ ॥**

३

**कटीं दोनी कर दिव्य तें रूपडें। सनकादिक वेडे जयासाठीं ॥ १ ॥**
**तें हें बाळरूप उभें चंद्रभागेचे तीरीं। चतुर्भुज हरी शोभतसे ॥ २ ॥**
**वैजयंती माळा किरीट कुंडलें। हृदय शोभलें द्विजपदें ॥ ३ ॥**
**कासे पीतांबर शोभत मेखळा। ध्यानीं लक्षी त्याला नरहरी ॥ ४ ॥**

४

पाहतां पाहतां वेधलेंसे मन । जाहलें तें उन्मन दृष्टीभरी ॥ १ ॥
आनंद आनंद नित्य परमानंद । ध्याती चरणारविंद शिवादिक ॥ २ ॥
तोचि उभा हरि पंढरीनायक । पाहतां सम्यक सुख वाटे ॥ ३ ॥
सोनार नरहरि तयाचिया घरीं । झाडलोट करी जीवें भावें ॥ ४ ॥

५

नव्हे तें सगुण नव्हे तें निर्गुण । जाणती ते खूण तत्त्वज्ञानी ॥ १ ॥
नव्हे तें अंबर निःशब्द निराळ । अद्वैत केवळ जैसें तैसें ॥ २ ॥
म्हणे नरहरी सोनार क्षराहूनी क्षर । परेहूनी परब्रह्म विटेवरी ॥ ३ ॥

६

पहा पहा तुम्ही डोळां । माझा भोळा शंकर ॥ १ ॥
ज्याचें देणें अवघ्यां सम । नाहीं विषम कोणासी ॥ २ ॥
भावें तोषे कर्पूरगौर । हर हर वदतां ॥ ३ ॥
ध्यान धरुनी स्मशानीं । जपे रामनाम मनीं ॥ ४ ॥
शंभूचे चरणावरी । लोळे सोनार नरहरी ॥ ५ ॥

७

सुखाची विश्रांती सुख आलें भेटी । प्रेम दुणावे पोटीं वोसंडलें ॥ १ ॥
सांवळें सगुण साजिरें निर्गुण । पाहतां आनंद पूर्ण मना होय ॥ २ ॥
अलक्ष्य अपरंपार न कळे विचार । नरहरी सोनार ध्यात चित्तीं ॥ ३ ॥

८

कारण महाकारण यांच्याही परता । भरुनी पुरता उरलासे ॥ १ ॥
तें हें विटेवरी समचरण साजिरें । पाहतां गोजिरें नीळवर्ण ॥ २ ॥
उदंडें वर्णिलें उदंडें ध्याइलें । उदंडें गाइलें परी नसरेचि ॥ ३ ॥
म्हणे नरहरि सोनार अलक्ष्या वेगळें । पाहतां नकळे भक्तीविण ॥ ४ ॥

९

चरणाचा महिमा ब्रह्मयासी आवडे । येरांसी थोकडें निरुपम ॥ १ ॥
पायवणी वंदी शिव तो हृदयीं । सर्व सुख पाहीं तेणें लाभे ॥ २ ॥
सोनार नरहरी वंदी माथां पाय । आणिक न पाहे वास दुजी ॥ ३ ॥

१०

शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा सदोदित॥
धन्य ते संसारीं नर आणि नारी । वाचे हर हरि उच्चारित ॥ २ ॥
नाहीं पैं भेद अवघा मनीं अभेद । द्वेषाद्वेषसंबंध उरी नुरे ॥ ३ ॥
सोनार नरहरि न देखे द्वैत । अवघा मूर्तिमंत एकरूप ॥ ४ ॥

११

नामाची आवडी जिव्हेसी तो चाळा । तेणें कळिकाळा भय त्रास१
गोमटें गोजिरें नाम हें विठ्ठल । बोला वाचा बोल प्रेमभरें ॥ २ ॥
न सरे कल्पना न निवारेचि भ्रांति । नामें होय प्राप्ती नित्यानंद ३
सोनार नरहरि प्रेमाचा भुकेला । म्हणोनी छंद त्याला नामस्मरणीं४

१२

माझें प्रेम तुझे पायीं । राहो ऐसें करीं कांहीं ॥ १ ॥
मागणें तें हेंचि मागों । आणिका न लागों छंदासी ॥ २ ॥
काया वाचा आणि मन । केलें समर्पण तव चरणीं ॥ ३ ॥
हाचि माझा निर्धार । म्हणे नरहरी सोनार ॥ ४ ॥

नरहरि सोनारांची मृत्युतिथि 'भक्तकथामृतसार' ग्रंथांत दिली आहे ती येणेंप्रमाणें:—

शककर्ता शालिवाहन । बारा शतें पसतीस जाण ।
प्रमादी नामें वत्सर पूर्ण । माघ कृष्ण प्रतिपदा ॥
भूवैकुंठ पंढरी क्षेत्र । नरहरी सोनार परम पवित्र ।
माध्यान्हीं आला कुमुदिनी मित्र । देह अर्पिला तयानें ॥

महीपतीनीं आपल्या भक्तविजयाच्या २० व्या अध्यायांत नरहरि सोनारांचें चरित्र फार प्रेमळ भाषेंत वर्णिलें आहे, तें वाचण्याची वाचकांस आम्ही शिफारस करितों.

# परिसा भागवत



'परिसा भागवत' ह्मणे, तेंचि वदति नाम परिसते ज्याचें ।
तम पुनरपि न उरों दे बळ मिरवी भानुपरिस तेजाचें ॥ १ ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

यांची बहुतेक माहिती पूर्वीं नामदेवचरित्रांत दिलीच आहे.

भागवतांचे कांहीं अभंग गाथ्यांत सांपडतात, ते फार प्रेमळ आहेत. पुढील अभंग पहा:—

१

अणुमाजी राम रेणूमाजी राम । तृणकाष्ठीं राम वर्ततसे ॥ १ ॥
बाहीजुं भीतरीं राम चराचरीं । विश्वीं विश्वाकारीं व्यापलासे ॥२॥
रामेंवीण स्थळ रितेंचि पैं नाहीं । वर्ते सर्वांठायीं राम राम ॥ ३ ॥
परिसा भागवत कायावाचामनें । श्रीरामावांचून आन नेणें ॥ ५ ॥

२

पैल मेळा रे कवणाचा । नामा येतो केशवाचा ॥ १ ॥
ब्रीद दीसतें अंबरीं । गरुडटाकियांच्या हारी ॥ २ ॥
परिसा येतो लोटांगणीं । नामा लागे त्याचे चरणीं ॥ १ ॥

३

आषाढ शुद्ध एकादशी । नामा विनवी विठोबासी ।
आज्ञा द्यावी हो मजशीं । समाधि विश्रांतीलागीं ॥ १ ॥
आयुष्य कळसासी आलें । अभंग त्वां सिद्धी नेले ।
ज्ञानेश्वरसंगतीं घडलें । तीर्थमिसें जगदोद्धार ॥ २ ॥
जन्मा आलियाचें कृत्य । जन लावावें सुपंथें ।
विठ्ठलमंत्र त्रिभुवनातें । जग जाणत महिमा हा ॥ ३ ॥
सर्व सिद्धी मनोरथ । तुझे कृपें पावलों सत्य ।
म्हणे परिसा भागवत । नामा नाम जपतसे ॥ ४ ॥

४

वैष्णवांचा थाट पताकांचे भार। करिती जयजयकार नामघोष॥१॥ पुष्पांचा वरुषाव विमानांची दाटी। नामघोष सृष्टीं न समाये ॥२॥ ऋषिगण गंधर्व इंद्र प्रजापती। धन्य धन्य म्हणती नामयासी ॥३॥ देव वेळाईत केला सेवाऋणें। अनन्या अनन्य भक्ती याची ॥ ४ ॥ अळंकापुरीं ज्ञानिया इंद्रनीळीं सोपान। निवृत्तीसी जाण त्र्यंबकेश्वरीं ॥ ५ ॥ नामा महाद्वारीं श्रेष्ठ हे पंढरी। प्रत्यक्ष भूमीवरी वैकुंठ हें ॥ ६ ॥ देवें नामयासी पोटासी धरियेलें। नेत्रोदकें क्षाळिलें सर्व अंग ॥ ७ ॥ जन्मोनी सार्थक त्वां बरवें केलें। वनीं मोकलीलें मजलागीं ॥ ८ ॥ राही रखुमाई सत्यभामादि प्रवृत्ती। नामया आलिंगिती प्रेमेंकरुनी ॥ ९ ॥ धन्य दिन सुखाचा वेदघोष विप्रांचा। वैष्णवीं नामाचा गजर केला ॥ १० ॥ तेथें पूजा पुनस्कार परिसियानें केली। हृदयीं धरिलीं चरणकमळें ॥ ११ ॥

५

नामदेव नामदेव। धरा भाव दृढ हा ॥ १ ॥
देव सांगे वैष्णवांसी। नका यासी विसंबूं ॥ २ ॥
रिद्धी सिद्धी लोटांगणीं। निशिदिनीं तिष्ठती ॥ ३ ॥
म्हणे परिसा भागवत। देवें मात सांगितली ॥ ४ ॥

६

टाळ मांदळीं नाहीं चाड। नाम गोड विठोबाचें ॥ १ ॥
वाहों टाळिया नाचों बागडे। गावों नामें गोड विठोबाचीं ॥२॥
परिसा म्हणे येर अवघी उपाधि। नाम गातां सिद्धि होईल रोकडी ३

# विसोबा खेचर.



**साधु विसोबा खेचर राखे चरणानतांसि सुज्ञानें ।**
**केला कृतकृत्य क्षणमात्रें ज्या नामदेव सुज्ञानें ॥**

सन्मणिमाला, मोरोपंत.

विसोबा खेचर हे प्रसिद्ध सत्पुरुष ज्ञानदेव–नामदेवांचे समकालीन; नामदेवांच्या गुरुत्वाचा मान यांजकडे आहे. कवि या नात्यानें जरी यांची महाराष्ट्रकविमंडळांत विशेष प्रसिद्धि नाहीं, तरी महाराष्ट्रांतील भागवतधर्माचे एक प्रसिद्ध प्रवर्तक या दृष्टीनें, त्यांची योग्यता मोठी असल्यामुळें, त्यांच्या चरित्राचा प्रस्तुत ग्रंथांत यथाशक्ति परामर्श घेणें हें महाराष्ट्र कविचरित्रकाराचें कर्तव्यच होय. महीपतिकृत 'भक्तविजय' ग्रंथांत ज्ञानदेव व नामदेव यांच्या चरित्रांत विसोबा खेचरांचा उल्लेख आला आहे.

असें सांगतात कीं, खेचरांचें मूळ वास्तव्यस्थान आळंदी असून, पुढें त्यांची वस्ती औंढ्या नागनाथ क्षेत्रीं असे. यांच्या जन्ममृत्युकालाविषयीं निश्चित अशी कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. परंतु, शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत हे विद्यमान होते व ते बरेच वृद्ध होऊन मरण पावले असें ढोबळ अनुमान करण्यास हरकत नाहीं. यांचेच समकालीन दुसरे प्रसिद्ध साधु जोगा परमानंद यांचें काव्य हें उतरून ठेवीत असत, अशी माहिती एका जुन्या अभंगांत आढळते.

विसोबांनीं आपल्या पूर्ववयांत एकदां ज्ञानदेवादि भावंडांचा छल केला होता व त्या वेळीं ज्ञानदेवांनीं आपल्या योगसामर्थ्यानें आपला जठराग्नि प्रदीप्त करून, आपल्या तप्तोदरावर मुक्ताबाईकडून मांडे भाजविले व तो चमत्कार पाहून विसोबा ज्ञानदेवांस शरण गेले अशी कथा भक्तविजयांत आहे. यावरून विसोबा खेचरांचे गुरु ज्ञानदेवच असावेत असें वाटतें. त्यांच्या एका अभंगाचा शेवटचा चरण असा आहे:—

**"मग म्हणे खेचरू। मज ज्ञान हेंचि गुरु । तेणें अगोचरू केला नामा ॥**

ह्यावरून वरील अनुमानास बळकटी येते.

पंढरिनाथानें नामदेवांस गुरुपदेश घेण्याची आज्ञा केली, तेव्हां बारशी येथें ते विसोबा खेचरांचा शोध करण्यास गेले असतां, लोकांनीं त्यांस महादेवाच्या देवळांत जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नामदेव देवळांत जाऊन पाहातात तों तेलानें लडबडलेल्या नव्या वाहणा पायांत घातलेला एक गलितकुष्ट असा वृद्ध पुरुष शंकराच्या पिंडीवर आपले पाय ठेवून अस्ताव्यस्त पसरलेला त्यांच्या दृष्टीस पडला. त्या वृद्धाच्या अंगावरील जखमांतून पू वहात असल्यामुळें त्याच्या सर्वांगावर माशा घोंघावत होत्या व दुर्गंधी इतकी सुटली होती कीं, नाकास पदर लावल्यावांचून त्याच्याजवळ जाण्याची सोय नव्हती. आपल्या भावी गुरुवर्यांची ही स्थिति पाहून नामदेवांस सखेदाश्चर्य वाटलें. ते विसोबापाशीं जाऊन त्यांस म्हणाले, “ अहो महाराज, नीट उठून बसा आणि पिंडीवर आपले पाय पडले आहेत ते काढून घ्या. ” विसोबा म्हणाले, “ बाबा रे, मी वृद्ध असल्यामुळें माझीं इंद्रियें माझ्या स्वाधीन नाहींत, याकरितां कृपा करून तूंच माझे पाय पिंडीवरून खालीं काढ. ” नामदेवांनीं, त्याप्रमाणें, त्यांचे पाय खालीं काढून जमिनीवर ठेवले व पाहतात तों पायांखालीं दुसरें शिवलिंग ! पुनः विसोबांचे पाय त्यानीं दुसरीकडे उचलून ठेवले तों तेथेंही शिवलिंग ! हा चमत्कार पाहून नामदेव अगदीं विस्मित झाले व देवानें ज्याच्याकडे मला पाठविलें तोच हा योग्य पुरुष होय असें समजून विसोबांच्या चरणांवर त्यानीं आपलें मस्तक ठेविलें. नंतर कांहीं दिवस तेथें राहून विसोबांची त्यांनीं भक्तिपुरस्सर सेवा केल्यावर विसोबांनीं त्यांस अनुग्रह दिला. विसोबा खेचरांचा आपणास उपदेश झाल्याचा उल्लेख नामदेवांनीं आपल्या कवितेंत अनेक ठिकाणीं केला आहे. पुढील चरण पहा:—

**तो देव नामया हृदयीं दाविला ।**
**खेचरानें केला उपकारू हा ॥**

*    *    *    *

**अवघी सत्ता आली हाता ।**
**नामयाचा खेचर दाता ॥**

नामदेवांस उपदेश करण्यासाठीं विसोबा खेचरांनीं लिहिलेले कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत, त्यांतील एक दोन अभंग येथें देतों:—

आधीं चैतन्य आपैतें करोनी । मग संचरें तारुण्यवनीं ।
कामक्रोध तुज देखोनी । जाती पळोनि बारा वाटा ॥ १ ॥
तुजपाठीं कवण धांवे । कवण टाकी कवण पावे ।
कामक्रोधें जग मोहावें । कासयासी खोवबी पोटीं पाय ॥ २ ॥
माया मोहजाळ तुटेल । पळेल पा काळवेळ ।
कां रे स्मरसी ना गोपाळ । मिथ्या व्याकुळ काजेंवीण ॥ ३ ॥
वैराग्यें दृढ होईं निरुता । कासया भितोसी चपेटघाता ।
परस्त्री तितुकी मानीं माता । विषय निमित्ता आल्यासाठीं ॥ ४ ॥
धर्माचेनि मागें रिघाला कर्ण । शिबी चक्रवर्ती जाला जीवित्वहीन ।
तयामाजी सांग नाडला कोण । लटकी झकपण कां बोलती ॥ ५ ॥
इंद्रियां गोड तें आरोगिजे । मग धणीवरी धावा पोखरिजे ।
काय सांगू शहाणपण तुझें । खेचर विसा म्हणे अरे नामया ॥ ६ ॥

२

पर्वतप्राय पापराशी होती दग्ध । वाचेसी मुकुंद उच्चारितां ॥ १ ॥
अच्युत श्रीहरि केशव नरहरि । माधव हरहरि रामकृष्ण ॥ २ ॥
नामासी साधन करिशील पूर्ण । तें प्रपंचाचें भान उरों नेदी ॥ ३ ॥
उदासीन वृत्ति आचरावें कर्म । नाहीं देहधर्म गुण माया ॥ ४ ॥
ऐसा हा अनकळित मार्ग साधेल तुज। खेचर विसा गुज सांगे नाम्या ॥

'ज्ञानेश्वरी' चे लेखक सच्चिदानंदबाबा यांनीं 'ज्ञानेश्वरविजय' नामक ग्रंथ लिहिल्याचें प्रसिद्ध असून, त्याचा उल्लेख, तो ग्रंथ प्रत्यक्ष पाहून, कै. श्रीपतिबुवा भिंगारकर यांनीं **"ज्ञानदेवकालनिर्णय"** या आपल्या निबंधांत केला आहे. हा ग्रंथ सध्यां उपलब्ध नाहीं, परंतु ज्ञानदेवांनीं विसोबा खेचरांस अनुग्रह दिला होता या गोष्टीचा उल्लेख सदर ग्रंथांत असल्याचें कै. भिंगारकर बुवांच्या उपरिनिर्दिष्ट निबंधावरून समजतें.

विसोबा खेचर हे शिवलिंगावर पाय ठेवून निजले होते अशी जी आख्यायिका वर दिली आहे तिला पोषक असा एक अभंग "सन्मणिमालाकवितासंग्रह" या मासिकांत आढळला तो येथें देतोंः—

'खेचरीं धरिली माव । लिंगावरी ठेविला पाय ।
पहावया भाव । नामयाचा ॥ १ ॥

नामा तेथें आला । देव नमस्कारिला ।
देखोन बोलला । वचन त्यासी ॥ २ ॥
लिंगावरी चरण ठेविले । काढा जी वहिले ।
दिसतां वरी भले । करणी न कळे ॥ ३ ॥
तंव येरू बोलिला । नाम्या तूं भला ।
मज नाहीं कळला । देव तुझा ॥ ४ ॥
जेथें नाहीं देव । तेथें ठेवीं पाव ।
सर्वज्ञ सदैव । तूंचि असशी ॥ ५ ॥
मीपणीं भुललों पाहीं । मज न कळेचि कांहीं ।
देव नसे ते ठायीं । पाय ठेवीं ॥ ६ ॥
तंव होय नामा विचारी । शब्दाची कुसरी ।
पाहतां निर्धारीं । सान नोहे ॥ ७ ॥
देवाविण ठाव । हें बोलणेंचि वाव ।
परतोनि संदेह । पडला मज ॥ ८ ॥
आपुलें उमाणें । आपण उमगावें ।
मजसी तारावें । भवसागरीं ॥ ९ ॥
नामा धरी चरण । अगाध तुमचें ज्ञान ।
आपुलें नाम कोण । सांगा स्वामी ॥ १० ॥
येरू म्हणे तंव खेचर विसा पैं जाण ।
लौकिकीं मिरवणें । अरे नाम्या ॥ ११ ॥
नाम आणि रूप । दोन्ही जया नाहीं ।
तोचि देव पाहीं । येर मिथ्या ॥ १२ ॥
जळ स्थळ आणि काष्ट हे पाषाण ।
पिंड ब्रह्मांड व्यापून । अणुरेणु ॥ १३ ॥
सर्वत्र साक्षीभूत । हें जाणोनि पाहत ।
खेचर म्हणे नाम्यांत । अवघा देवो ॥ १४ ॥

शेवटच्या नामोल्लेखावरून हा अभंग विसोबा खेचरांचा दिसतो व त्याची भाषाही बरीच जुनी दिसते, पण तेवढ्यावरून तो नक्की विसोबांचाच आहे असें समजणें

चुकीचें होईल. कारण प्रसिद्ध संतकवींच्या नांवांवर घुसडून दिलेले शेंकडों बनावट अभंग जुन्या वह्यांतून आढळतात हें मीं पूर्वी अनेक वेळां सांगितलेंच आहे असो.

विसोबांनीं एकंदर किती कविता लिहिली होती हें समजण्यास आतां मार्ग नाहीं. त्यांचे उपलब्ध असलेले अभंग वीसपंचवीसांहून अधिक नाहींत. त्यांतले आणखी कांहीं अभंग येथें देऊन हा लेख संपवितों.

१

**मूळु वदनाचा उधानु नेत्रांचा । अंगुळु हस्ताचा स्वामी माझा ॥१॥ मुगुट जयाचा केवळया आगळी काठी । पवित्र तळवटीं चरण ज्याचे ॥ २ ॥ सेली ते भागले पोकु वेडावले । अंगुळु मागें जाले थकित रया ॥ ३ ॥ ढकारु वदनाचा आला वर्णावया । जिव्हा चिरलिया न कळे त्यासी ॥ ४ ॥ सद्भावें शरण अवारू जोडुनी । खेंचर विसा चरणीं विनटला ॥ ५ ॥**

२

**भवजलधि अगाध तरावया दुस्तर । रचिलें पंढरपुर चंद्रभागीं॥१॥ तारूं पंढरिनाथु मोलेंविण उतरितु । उभला असे तिष्टतु वाट पाहे ॥ १ ॥ बुडत्याचें भय नाहीं संसारीं। कलिमाजी पंढरीनाथ थोर ३ राव रंक दोन्ही बैसवोनी वरी । उतरितु पैलतीरीं भरंवसेनी ॥ ४ ॥ आठराही आवले जे नावेसी लागले। साही खण भरले मिरवताती५ चौमुखीं वर्णितां न कळे याचा पार । वेदा अगोचर सहस्त्रमुखा ६ साडियातें कासे लावीत आपण । कुटुंबिये जाण नावेवरी ॥ ७ ॥ प्रेमाचे पेटे बांधोनिया पोटीं । उतरी जगजेठी पैलपारू ॥ ८ ॥ आप अंगें उडी बुडत्यातें कडे काढी। ऐसे लक्ष कोडी तारियेले ९ सहस्त्र नाम पेटे बांधी मग पोटीं । तारी जगजेठी लावी कासे १० आदिकरोनि सर्वांहि तारिले । उतरुनी नेले पैलतीरीं ॥ ११ ॥ ऐसे पक्षी कीटक गुल्मल तारिले । खेचर विसा म्हणे तारी मातें पुंडलीक ॥ १२ ॥**

वरील अभंगांतील शेंवटचा चरण " खेचर विसा म्हणे तारी मातें पंडलीक " याचा अर्थ नीट लागत नाहीं; व्याकरणदृष्ट्या हें वाक्य अशुद्ध नाहीं, परंतु मागील

चरणातील अर्थाचा संदर्भ सुटलेला दिसतो. शिवाय यमकही जुळत नाहीं. यावरून हा चरण लेखकाच्या चुकीमुळें बदलेला दिसतो. असो.

'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ निर्माण झाल्यावर, त्यांतील नुसत्या प्रमेयांचाच नव्हे तर वाक्यांचा व शब्दांचा देखील तत्कालीन व तदनंतरच्या पुष्कळ कवींनीं आपल्या कवितेंत मनमुराद उपयोग केलेला आढळतो; किंबहुना, सांवतामाळी, जनी, एकनाथ, तुकाराम, निळोबा, चोखामेळा या वारकरी सांप्रदायी कवींची बरीच कविता ज्ञानेश्वरी-भाष्यात्मक आहे असें म्हटल्यास चालेल. उदाहरणार्थ विसोबांचा वरील अभंग ज्ञानेश्वरींतील पुढील ओव्यांशीं ताडून पहाः—

**" भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे ।**
**तेथ जरी कीं माझे । बिहिती हन ॥ ८८ ॥**
**म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।**
**करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ८९ ॥**
**नामाचेया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ।**
**सजूनियां संसारीं । तारूं जाहलों ॥ ९० ॥**
**सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ।**
**परिग्रही घातले । तरियावरी ॥ ९१ ॥**
**प्रेमाची पेटी । बांधली एकाचिया पोटीं ।**
**मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥**
**परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे ।**
**वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥**

ज्ञानेश्वरी, अध्याय १२

नामदेवांचा पुत्र विठा यांच्या कांहीं अभंगांत विसोबा खेचरांचा विनोदपूर्वक उल्लेख केलेला आढळतो. नमुना पहाः—

**" तंव धाउनी गेला चरणीं लागला ।**
**देवा तूं दाखविला ठेवा माझ्या मायबापाचा ॥ १ ॥**
**जाऊन तो धरीन न सोडीं मी आतां ।**
**जे मज पंढरिनाथा ग्वाही दिधली ॥ २ ॥**
**तंव खेंचरू तेथें स्नानसंध्या करी ।**
**तंव ओढोनि पाय धरी विठा नामयाचा ॥ ३ ॥**

तंव तो अवचिता खडबडोनि भ्याला ।
कोंदुनी घाला पडिला धाडी मजवरी ॥ ४ ॥
उठीं परता तूं कोणाचा रे काय ।
ठायीं ठायीं राहें हालूं नको ॥ ५ ॥
तुझिया वडिलांसी जाव देईन ।
धरोनि नेईन हें पोर कोणाचें ॥ ६ ॥
लाडिकें लडिवाळ आपुलें वा धांवे पायीं ।
तूज कोणी नाहीं मग तूं निलाजिरें ॥ ७ ॥
छंद ना बंद झोंबतोसी धीट ।
बांधीन चोहटा चौघाचारीं ॥ ८ ॥
फजीत करितील तुज कीं मज जाण ।
खेचर विसोबा म्हणे तुज्ञ विठोबाची आण ॥ ९ ॥

विसोबा खेचर यांच्या समाधिकालाचा उल्लेख खालील अभंगांत सांपडतो:—

विमानाची दाटी पुष्पांचा वर्षाव । अप्सरा गंधर्व नाचताती ॥ १ ॥
अलंकापुर क्षेत्र इंद्रायणीतीर । मनीं ज्ञानेश्वर आठविला ॥ २ ॥
मग आठविला पंढरीचा राव । देवाधिदेव पांडुरंग ॥ ३ ॥
सौम्य संवत्सर बाराशें एकतीस । शुद्ध श्रावण मास एकादशी॥४॥
निर्गुण निराकार स्वरूपीं मिळाला । खेचर बैसला समाधीसी॥५॥

---

# जनी.

हरिहरजनपदभजनें प्रकटी अद्भुत रुचि प्रभाव जनी।
स्पष्ट महासत्याधिका भरलीच इची शुचिप्रभा वजनीं ॥

सन्मणिमाला, मोरोपंत.

महाराष्ट्रांत कवींप्रमाणेंच कवयित्रीही पुष्कळ होऊन गेल्या आहेत; आणि मुक्ताबाई, प्रेमाबाई, वेणाबाई, बयाबाई, बहिणाबाई, कान्होपात्रा, साखराई, गोणाई इत्यादि अनेक कवयित्रींची थोडीबहुत कविता सुदैवानें आज उपलब्धही आहे, परंतु त्या

सर्वांत जनाबाईइतकी प्रसिद्धि कोणत्याहि कवयित्रीची नाहीं. ज्ञानदेव-भगिनी मुक्ताबाई आणि तुकारामानुग्रहीता बहिणाबाई यांचा पारमार्थिक अधिकार फार मोठा होता आणि त्यांची कविताही शुद्ध आणि सुसंस्कृत आहे; रामदासपरंपरेंतील वेणाबाईस तर संस्कृतदेखील येत होतें आणि त्यांचा "सीतास्वयंवर" हा ग्रंथही फार रसाळ आहे, परंतु भाविक महाराष्ट्रास आज सुमारें ६०० वर्षे भोळ्या जनीची साधी भोळी पण प्रेमळ कविताच फार प्रिय होऊन राहिली आहे. अभंग रचणाऱ्या सर्व कवींत जी तुकारामाची योग्यता तीच अभंग रचणाऱ्या सर्व कवयित्रींत जनाबाईची. अशी ही भाग्यवती जनाबाई मूळची कोठली, तिची जात कोण, तिचे पूर्वज कोण होते, तिचा जन्ममृत्युकाल कोणता इत्यादि बाबतींत कोठेंच कांहीं विश्वसनीय माहिती सांपडूं नये ही केवढी सखेदाश्चर्याची गोष्ट ! पण वस्तुस्थिति अशी आहे खरी. बिचाऱ्या महीपतींनीं आपल्या संतचरित्रविषयक ग्रंथांत नामदेवचरित्रानुषंगानें जनाबाईची थोडी तरी हकीकत नमूद करून ठेविली आहे म्हणून आज माझ्यासारख्यास ह्या चार ओळी तरी लिहितां येत आहेत, नाहीं तर "जनी" ह्या नामोल्लेखापलीकडे जनाबाईविषयीं एक शब्ददेखील लिहितां येणें जवळजवळ अशक्यच होतें. अस्तु.

जनीविषयीं महीपतींनीं जी माहिती दिली आहे ती येणेंप्रमाणें:—गोदातीरीं गंगाखेड नामक एक गांव आहे. तेथें दमा या नांवाचा एक शूद्र महाभगवद्भक्त होता. त्याच्या स्त्रीचें नांव करुंड, तीही मोठी पतिव्रता होती. दमा प्रत्येक वारीस पंढरीस जात असे. असा क्रम पुष्कळ वर्षे चालला होता. परंतु संतति नसल्यामुळें तीं उभयतां जरा दुःखी असत. एकदां तीं पंढरीस गेलीं असतां, "आम्हास पुत्र व्हावा" अशी पांडुरंगाची त्यांनीं प्रार्थना केली. त्या रात्रींच दमा निद्रित असतां त्यास असें स्वप्न पडलें कीं "तुला पुत्र कांहीं होणार नाहीं. परंतु एक कन्या फार सद्गुणी होईल व ती तुझ्या कुळाचा उद्धार करील. ती कन्या कृतयुगांत पद्मिनी, त्रेतायुगांत मंथरा, द्वापरयुगांत कुब्जा होती; तीच तुझ्या उदरीं येईल. तिचें नांव जनाबाई असें ठेव व नामदेवाच्या चरित्राशीं तिचा संबंध येणार असल्यामुळें नामदेवाचा बाप दामशेटी यास ती अर्पण कर."

कालांतरानें दमाची स्त्री करुंड ही गर्भिणी होऊन नऊ मास भरतांच प्रसूत झाली. कन्या झाली तिचें नांव 'जनाबाई' असें ठेविलें. ती कन्या पांच सात वर्षांची होतांच दमानें तिला पंढरीस नेऊन दामशेटीच्या स्वाधीन केलें. पुढें दामशेटीनें तिचें कन्येप्रमाणें पालन केलें. दामशेटीचें घराणें मोठें भक्तिमान् असल्यामुळें त्या घरा-

ष्यांतील माणसांच्या, विशेषतः नामदेवांच्या सहवासानें जनाबाई मोठी भगवद्भक्त निपजली. प्रत्यक्ष नारदमुनींनीं तिला मंत्रोपदेश केला, अशी आख्यायिका आहे. एके समयीं पंढरपुरास रात्रीच्या वेळीं फार वारा सुटला व पाऊसही पडूं लागला. तेव्हां नामदेवांची चंद्रमौळी झोंपडी वाऱ्यानें उडून गेली! झोंपडींत नामदेवांच्या घरचीं सगळीं माणसें निजलीं होतीं. पांडुरंगानें त्यांच्या संरक्षणार्थ आपलें सुदर्शन पाठविलें व मागाहून स्वतः येऊन त्यांची झोंपडी पूर्ववत् बांधून दिली! देवास फार श्रम झाले म्हणून जनी त्याची पाठ रगडीत बसली होती. जनीचा भक्तिभाव पाहून देव इतका संतुष्ट झाला कीं,

**" दळण कांडण धुणें धुवोनी पांटी डोईवरी ।**
**गंवऱ्या वेंचुन आणी घरीं ॥ "**

अशा प्रकारें जनीच्या कामांत त्यानें तिला साहाय्य केलें. एकदां देवाचा पीतांबर आणि पदक चोरल्याचा आळ जनीवर आल्यामुळें तिला सुळीं देण्यास नेलें असतां, तिनें पांडुरंगाचा धांवा करितांच सुळाचें पाणी झालें! पुढें एके दिवशीं पांडुरंग जनाबाईची कविता लिहीत बसला असतां, ज्ञानदेव दर्शनास येत असल्याचें ऐकून त्यानें कागद लेखणी लपवून ठेविली. तें अंतर्साक्षी ज्ञानदेवांनीं जाणून देवास विचारलें, " देवा, आपली स्तुति आपल्याच हातानें लिहीत बसतोस हें आश्चर्य आहे. " देव म्हणाला " ज्ञानोबा, मला जनाबाईचें गाणें अतिशय आवडल्यामुळें मी तें लिहित बसलों होतों. " नंतर देव आणि ज्ञानोबा नामदेवांचे घरीं आले. तेथें अगोदरच सांवता माळी, परिसा भागवत, गोराकुंभार, चोखामेळा इत्यादि संतमंडळी येऊन बसली होती. त्या वेळीं जनाबाई माळावर गोंवऱ्या वेंचण्यास गेली होती. देवानें जनाबाईस बोलावणें पाठविलें. देव आल्याचें वर्तमान तिला समजतांच तिनें धांवत येऊन देवभक्तांचें दर्शन घेतलें. नंतर देव म्हणाला, " ज्ञानेश्वरा, जनाबाईचें कवित्व उतरून घेण्याची कामगिरी मीं स्वतःकडे घेतली आहे. इतर संतांच्या लेखकांचें काम कोणी कोणी करावें हें आतां सांगतों——

## ओव्या

**ज्ञानेश्वराचीं शब्दरत्नें । तीं सच्चिदानंद लिहील ब्राह्मण ।**
**निवृत्तीचा लेखक सोपान । जो अवतार पूर्ण विधीचा ॥**
**आणिक मुक्ताबाईचे अभंग । ज्ञानदेव लिहितील निजांगें ।**
**जोगा परमानंद अंतरंग । त्याचे विसोबा खेचर लिहीतसे ॥**

**सांवतामाळी भक्त वैष्णव । त्याचा लेखक काशिबा गुरव ।**
**कूर्मदेवाचा काईत सुदेव । देवाधिदेवें नेम केला ॥**
**अनंतभट ब्राह्मण । तो चोखामेळयाचें करील लेखन ।**
**आणि नामया-जनीचें बोलणें । रुक्मिणीरमण लिहीतसे ॥**
**ऐसी करून दिधली वांटणी । मग ज्ञानदेवासी म्हणे चक्रपाणी ।**
**आतां जनीचे अभंग ऐकतां कानीं । संकोच मनीं न धरावा ॥**

भक्तविजय, अध्याय २२

## जनी

या कथाभागांतील अतिशयोक्तींचा भाग जरी वजा केला तरी, त्यावरून तत्कालीन संतमंडळांत जनाबाईची योग्यता फार मोठी होती येवढा निष्कर्ष काढण्यास हरकत नाहीं. जुन्या ग्रंथांत जनाबाईचा समाधिकाल, आषाढ वद्य १३ शके १२७२ हा दिला आहे.

नामदेवांनीं शतकोटि अभंग लिहिण्याची प्रतिज्ञा करून आपल्या कुटुंबांतील माणसांच्या अभंगांसुद्धां त्यांनीं एकंदर ९६ कोटी अभंग पुरे केले व त्यांत जनीचे अभंग साडेबारा कोटी होते अशी आख्यायिका आहे. परंतु हल्लीं तिचे जे अभंग उपलब्ध आहेत त्यांची संख्या ३०० पेक्षां अधिक नाहीं व या ३०० अभंगांत खुद्द जनीचे असे अभंग फारच थोडे असून बनावट अभंगांचाच भरणा मोठा आहे. जनाबाई ही जरी ज्ञानदेवांची समकालीन होती तरी तिच्या अभंगांची भाषा नामदेवांच्या अभंगांच्या भाषेसारखी अगदीं सोपी आहे. जनीच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या ३०० अभंगांत बनावट अभंग पुष्कळच आहेत असें जें वर म्हटलें आहे त्याचें प्रत्यंतर पहाः—

जनाबाईकृत द्रौपदीवस्त्रहरणाच्या अभंगांत पुढील अभंग आहेः—

**नष्ट बोले दुर्योधन । बैस मांडीवरी म्हणे ॥ १ ॥**
**भोग विलास सदनीं । तुज करीन पट्टराणी ॥ २ ॥**
**शब्द प्रत्यक्षचि बाण । अंगीं खडतरे दारुण ॥ ३ ॥**
**म्हणे काय खळा । दुष्ट दुर्जना कंस खळा ॥ ४ ॥**
**जळो जळो तुझी वाणी । विष्टा भक्षिसी कां जनीं ॥ ५ ॥**
**वीज कडकडूनि माथां । पडो दुष्टा तुझ्या आतां ॥ ६ ॥**
**दृष्टि झडो रे पापिया । प्राणें विघडो तुझी काया ॥ ७ ॥**

गुण लावण्य सुंदरी । गदा शोभे भीमाकरीं ॥ ८ ॥
तुज नवरी साजे चांग । तुझें निववील सर्वांग ॥ ९ ॥
बहुलें तें रणचत्वारीं । आयुष्य अंतरपाट धरी ॥ १० ॥
रक्त हळदीचें लेपन । माथां अक्षता तेचि बाण ॥ ११ ॥
अचुक भेदें रक्त भाळीं । तेंचि मळवट्ट कपाळीं ॥ १२ ॥
स्त्रिया आक्रंदती भारी । तेंचि वाद्य नाना परी ॥ १३ ॥
रुदन करिती सकळ । सुखें भोगिसी सोहळे ॥ १४ ॥
रणमंचक शेजेवरी । पहुडें तुझे मांडीवरी ॥ १५ ॥
परते करुनी प्राणातें । सुखें सेवीं कां एकांत ॥ १६ ॥
जागा न होसी कोणे काळें । सुखें भोगीं सर्व काळ ॥ १७ ॥

आतां वरील अभंग, मुक्तेश्वरकृत सभापर्वांतील द्रौपदीवस्त्रहरणाध्यायांतल्या खालील ओंव्यांशीं ताडून पहा म्हणजे असें स्पष्ट दिसून येईल कीं, सदर अभंग म्हणजे मुक्तेश्वरी ओंव्यांचें वेडेंवांकडें “ शब्दांतर ” ( पॅराफ्रेज ) आहे:—

हें देखोनि दुराचारी । म्हणे वो द्रुपदाचे कुमरी ।
येऊनि बैसें मांडीवरी । होईं अंतुरी पट्टाची ॥ १०९ ॥
पापशब्द पडतां कानीं । हृदयीं धडकला क्रोधाग्नि ।
म्हणे ‘दुरात्मिया ही वाणी । जळो तुझी पापिष्ठा ॥ ११० ॥
प्रळयवीज माथां पडो । दृष्टि जळोनि जिव्हा झडो ।
कायेपासूनि प्राण विघडो । तात्कालिक पैं तुझा ॥ १११ ॥
भीमाकरीं जे केळवली । गदा नोवरी सगुणाथिली ।
वाग्निश्चयें तुज नेमिली । गोत्रघटित निर्धारें ॥ ११२ ॥
बाहुलें योजिलें रणतळवट । आयुष्य अवधीचा अंत्रपाट ।
हातें सारूनि वळी वरिष्ठ । लग्न लावील स्वहातें ॥ ११३ ॥
रक्तहरिद्रा तनुलेपनीं । माथां अक्षता पायपिटणी ।
स्त्रियाप्रलाप वाद्यध्वनी । सुखसोहळा भोगिसी ॥ ११४ ॥
ते गदा घेऊनि मांडीवरी । रणमंचकीं निद्रा करीं ।
प्राण पारखे दवडूनि दुरी । मग एकांतीं पहुडें कां ॥ ११५ ॥

मुक्तेश्वरी सभापर्व, अध्याय १५

आतां यावर कोणी असा आक्षेप घेईल कीं, जनाबाई ही मुक्तेश्वरांपूर्वीं होऊन गेलेली असल्यामुळें तिच्याच कवितेंतील कल्पना मुक्तेश्वरांनीं कशावरून उचलल्या नसतील ? हा कोटिक्रम सकृद्दर्शनीं निरुत्तर करणारा दिसतो खरा, पण सबंध महाभारतावर कविता करणारा मुक्तेश्वरासारखा महाकवि, जनाबाईच्या नांवावर घुसडून दिलेल्या या अप्रसिद्ध द्रौपदीवस्त्रहरणांतील कल्पना आपल्या ग्रंथांत उतरून घेईल ही गोष्ट मला तरी निदान बिलकुल संभवनीय दिसत नाहीं.

बनावट अभंगांचा दुसरा मासलाः—

**विठो माझा लेंकुरवाळा । संगें लेंकुरांचा मेळा ॥ १ ॥**
**एकनाथ खांद्यावरी । कबीराचा हात धरी ॥ २ ॥**
**पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥**
**गोरा कुंभार मांडीवरी । चोखा जीवा बरोबरी ॥ ४ ॥**
**बंका कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥ ५ ॥**
**जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥**

जनाबाईच्या कालानंतर ३०० वर्षांनीं झालेल्या एकनाथांचा उल्लेख वरील अभंगांत आहे. कदाचित् दुसरी एखादी जनाबाई होऊन गेली असेल तर कोण जाणे !

आतां माझ्या समजुतीप्रमाणें खुद्द नामदेवकालीन जनाबाईचेच असे सुंदर १० अभंग येथें देऊन हा संक्षिप्त लेख पुरा करितों.

१

**ये ग ये ग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥**
**भीमा आणि चंद्रभागा । तुझे चरणींच्या गंगा ॥ २ ॥**
**इतुक्यांसहित त्वां बा यावें । माझे रंगणीं नाचावें ॥ ३ ॥**
**माझा रंग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥**

२

**नोवरीया संगें वऱ्हाडियां सोहळा ।**
**मांडे पुरणपोळया मिळे अन्न ॥ १ ॥**
**परिसाचेनि संगें लोहो होय सोनें ।**
**तयाचीं भूषणें श्रीमंतांसी ॥ २ ॥**
**जनी म्हणे जोड झाली विठोबाची ।**
**दासी नामयाची म्हणोनियां ॥ ३ ॥**

३

आंधळ्याची काठी । अडकली कवणें वेटीं ॥ १ ॥
माझिये हरणी । गुंतलीस कोणे रानीं ॥ २ ॥
मुकें मी पाडस । चुकलें भोवें पाहें वास ॥ ३ ॥
तुजविण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं ॥ ४ ॥
आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे आये ॥ ५ ॥
माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ॥ ६ ॥

४

ज्ञानाचा सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥
मरोनियां जावें । बा तुझ्याचि पोटा यावें ॥ २ ॥
ऐसें करीं माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥
जावें वोवाळुनी । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ४ ॥

५

गंगा गेली सिंधूपाशीं । त्यानें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥
तरि तें सांगावें कवणाला । ऐसें बोलें बा विठ्ठला ॥ २ ॥
जळ काय जळचरा । माता अव्हेरी लेंकुरा ॥ ३ ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

६

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा ॥ १ ॥
त्याचा झाला म्हणियारा । राहे घरीं करी थारा ॥ २ ॥
देव बाटविला त्यानें । हांसे जनी गाय गाणें ॥ ३ ॥

७

पाय जोडुनि विटेवरी । कर ठेवुनि कटीवरी ॥ १ ॥
रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडलें मकराकार ॥ २ ॥
गळां वैजयंती माळा । तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
गरुड सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ४ ॥

८

हरिहर ब्रह्मादिक । नामें तरले तिन्ही लोक ॥ १ ॥
ऐसा कथेचा महिमा । जाली बोलायाची सीमा ॥ २ ॥

जपें तपें लाजविलीं । तीर्थें शरणागत आलीं ॥ ३ ॥
नामदेवाच्याकीर्तनीं । ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ॥ ४ ॥
वेद श्रुति देती ग्वाही । जनी म्हणे सांगू काई ॥ ५ ॥

९

देव भावाचा लंपट । सोडुनि आलासे वैकुंठ ॥ १ ॥
पुंडलीकापुढें उभा । समचरणाची शोभा ॥ २ ॥
हातीं चक्र पायीं वांकी । मुख भक्तांचें अवलोकी ॥ ३ ॥
उभा बैसेना सर्वथा । पाहे कोडें भक्तकथा ॥ ४ ॥
सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे शारंगधर ॥ ५ ॥

१०

वैकुंठींचा हरि । तान्हा यशोदेच्या घरीं ॥ १ ॥
रांगतसे हा अंगणीं । माथां जावळाची वेणी ॥ २ ॥
पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ॥ ३ ॥
धन्य यशोदा माय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

'देवानें मला न्हाऊं घातलें, माझें दळणकांडण केलें, माझ्याबरोबर गाणें गायिलें, इत्यादि गोष्टींचा ज्या अभंगांत उल्लेख आला आहे ते अभंग खुद्द जनाबाईचे असतील असें मला वाटत नाहीं. शिवाय जनाबाईच्या अभंगांत ज्ञानदेवांच्या कवितेंतले जुने मराठी शब्द मुळींच सांपडत नाहींत हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

---

# जगमित्र नागा.

'जगमैत्र नागा ऐका कथा त्याची ।
मैत्री ज्याची साची भूतमात्रीं ॥'

भीमस्वामी रामदासी.

जगमित्र नागा हे एक मोठे सत्पुरुष ब्राह्मणी राज्यांत होऊन गेले. यांचें चरित्र महीपति व भीमस्वामी रामदासी यांनीं वर्णिलें आहे, पण यांचा कालनिर्देश त्यांनीं केला नाहीं. रा० राजवाडे यांनीं प्रस्तुत साधूचा काल शके १२५२ हा दिला आहे.

जगमित्र हे परळी वैजनाथाचे रहिवासी. त्यांच्या चरित्राचा मुसलमानी राज्याशीं संबंध आला असून, शके १२५२ ( इ. स. १३३० ) मध्यें परळी वैजनाथ हें ठिकाण मुसल्मानी राज्यांत सामील झालें होतें, असें ऐतिहासिक पुराव्यावरून कदाचित् मानतां येण्यासारखें आहे. सावंतामाळी, गोराकुंभार, चोखामेळा, ज्ञानदेव, नामदेव इत्यादि जे संत ६०० वर्षांपूर्वीं होऊन गेले, त्या सर्वांत हे 'जगमित्र' वयानें कनिष्ठ होते, असेंही मानण्यास हरकत नाहीं. यांची जी थोडीशी कविता उपलब्ध आहे, तींत मुसल्मानी शब्द फारसे आढळत नाहींत; पण एकंदर भाषा फारशी प्राचीन आहे, असेंही दिसत नाहीं. असो.

जगमित्र नागा हे परळी वैजनाथ येथें गांवांत भिक्षा मागून राहत असत. ते रात्रीच्या वेळीं कीर्तन करीत असत, तें ऐकण्यास लोकांची फार गर्दी होत असे. गांवांतले कित्येक लोक त्यांस वंदन करीत असत, कित्येक त्यांची निंदा करीत असत, पण ते तिकडे मुळींच लक्ष्य देत नसत. एके दिवशी रात्रीं, जगमित्र आपल्या घरांत निद्रित असतां, कांहीं दुष्ट लोकांनीं त्यांच्या घरास आग लाविली ! एकदम मोठा उजेड झाल्यामुळें, जगमित्र जागृत होऊन पाहतात तों खोपट जळत आहे ! त्यांचीं मुलेंमाणसें आंत निजलीं होतीं, तीं आतां सुरक्षित कशीं राहतात, या काळजीनें त्यांनीं पंढरिनाथाची आठवण केली. भगवंतानें तत्काल प्रगट होऊन अग्नीपासून त्यांच्या कुटुंबाचें रक्षण केलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ही बातमी सर्व गांवभर पसरली. जगमित्र नागासारख्या सत्पुरुषाचें घर जळालें, याबद्दल गांवांतल्या पुष्कळ लोकांस फार वाईट वाटून ते चौकशी करण्यासाठीं त्यांच्या घरीं आले. पण, खोपट वरच्यावर जळून गेलें, तरी आंतील माणसांस बिलकूल धोका पोंचला नसून, तीं आनंदानें भजन करीत बसलीं आहेत असा देखावा पाहतांच लोक फार आश्चर्यचकित झाले. मग, जगमित्रांस नमस्कार करून ते म्हणाले, 'तुमच्या साधुत्वासंबंधानें आज आमची अगदीं पुरी खात्री झाली.' पुढें जगमित्रांस कांहीं जमीन इनाम करून द्यावी, असें ठरवून, त्यांनीं ती गोष्ट जगमित्रांपाशीं काढली. तेव्हां ते म्हणाले, 'मला जमीन काय करावयाची आहे? गांवांत भिक्षा मागतों, तिजवर माझ्या कुटुंबाचा निर्वाह चालतो, मग आणखी जमिनीच्या लोभांत मी कशास पडूं?' जगमित्रांचें हें स्पष्टोत्तर ऐकून, त्यांच्यासंबंधानें लोकांची पूज्यबुद्धि वाढत चालली; पण त्यांस जमीन इनाम करून देण्याचा विचार त्यांनीं सोडून दिला नाहीं. ते जगमित्रांस म्हणाले, 'आम्ही तुमच्या नांवानें इनामपत्र लिहून देतों, मग जमिनीचें उत्पन्न कोणीही खावो !'

इतकें बोलून, लोकांनीं लागलीच सनद लिहून दिली, ती अशी कीं, ' परळी वैजनाथ या गांवीं एक चाहूर जमीन जगमित्र नागनाथ यांस इनाम दिली आहे. ' इतकें झालें तरी जगमित्रांनीं त्या जमिनीचा स्वीकार न केल्यामुळें, गांवांतील शेतकरी लोक त्या जमिनींत धान्य पिकवून तें जगमित्रांच्या नांवानें दानधर्माकडे खर्च करीत असत !

पुढें, परळी वैजनाथ येथें एक नवा हवालदार आला. तो यवन होता. त्यानें जगमित्रांची इनाम जमीन जप्त केली. त्या वेळीं 'धर्मकार्याच्या आड तुम्हीं येऊं नका, ' असें गांवांतील लोकांनीं त्यांस सांगितलें; परंतु त्यानें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. पुढें, एके दिवशीं, तो हवालदार जगमित्रांच्या घरीं जाऊन त्यांस म्हणाला, ' आमच्या घरीं लग्नांत देवप्रतिष्ठेस वाघाचें दैवत लागतें, तरी आज संध्याकाळपर्यंत वाघास घेऊन ये, नाहीं तर जप्त केलेली इनाम जमीन खालसा करीन. ' जगमित्रांनीं वाघ आणण्याचें कबूल करून ते अरण्यांत गेले व तेथें त्यांनीं परमेश्वराचा धांवा केला, ' हे पंढरिनाथा ! हवालदाराच्या कन्येचें लग्न आहे, देवप्रतिष्ठेस त्याला वाघ लागत असतो, तो आणून देण्याचें मी त्यास वचन दिलें आहे; तर आतां तूं हें संकट निवारण कर. ' जगमित्राचे हे शब्द ऐकून भगवंताचें निसर्गकोमल हृदय द्रवलें. त्यानें वाघाचें स्वरूप धारण केलें व त्यास घेऊन जगमित्र गांवांत आले. एक भयंकर वाघ घेऊन जगमित्र चालले आहेत, हें पाहतांच गांवांतील लोकांची पांचावर धारण बसली. बायकापोरें भयानें लपून बसलीं व पुरुष वाट फुटेल तिकडे पळून गेले ! कित्येकांनीं हवालदाराच्या घरीं जाऊन त्याची कानउघाडणी केली कीं, तुझ्या दुष्टपणामुळें सगळा गांव मोठ्या संकटांत पडला आहे. याप्रमाणें गडबड चालू आहे, तोंच जगमित्र वेशीवर आले; पण गांवच्या वेशी लोकांनीं पूर्वींच बंद केल्या होत्या यामुळें त्यांस प्रतिबंध झाला. हा प्रकार पाहतांच व्याघ्ररूपी भगवंतानें एक मोठी डरकाळी फोडली, त्याबरोबर एकदम दरवाजे उघडले. हें पाहून बायकामुलांनीं रडून ओरडून एकच आकांत केला. तेव्हां जगमित्रांनीं सर्वांस अभय देऊन सांगितलें कीं, " ज्याचें कर्म तो भोगील, इतरांस भिण्याचें कारण नाहीं. तुम्हीं निर्भयपणें ईश्वराचें भजन करा. "

मग, जगमित्र वाघास घेऊन हवालदाराकडे आले व त्यास हाक मारून म्हणाले, ' तुमचें दैवत मी घेऊन आलों आहें; हें आपल्या ताब्यांत घ्या. भयानें लपून बसूं नका. ' दुष्ट लोकांचा नाश करावा म्हणून व्याघ्र मोठमोठ्यानें डुरकण्या फोडीत होता, पण जगमित्रांनीं त्यास आपल्या ताब्यांत ठेविलें होतें. मग ' तुमच्यामुळें सर्वांचा नाश होतो ' असें आपल्या स्त्रीचें भाषण ऐकून हवालदार बाहेर आला व

हात जोडून, अन्यायाची क्षमा मागून ‘ जीवदान द्या ’ अशी जगमित्रांस त्यानें विनंति केली. मग त्यास अभय देऊन, व्याघ्रासह जगमित्र रानांत निघून गेले. तेथें भगवंतानें श्यामसुंदर चतुर्भुजरूप धारण करून जगमित्रांस प्रेमालिंगन दिलें व त्यांचा निरोप घेतला. एकंदरींत, ‘ चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्र ते न खाती सर्प तया ॥ ’ ह्या तुकारामाच्या सिद्धांतरूप उक्तीची सत्यता जगमित्रांच्या चरित्रांत अगदीं स्पष्टपणें व्यक्त होत आहे.

एका जुन्या चरित्रांत ‘ जगमित्र राहे प्रतिष्ठानीं । द्रव्याचा व्यवसाय करूनी । ’ असें लिहिलें असून, तो ‘ लक्षाधिपति धनी ’ होता असेंही म्हटलें आहे. जगमित्रांची ही येवढी अलोट संपत्ति नष्ट होऊन पुढें ते अगदीं अकिंचन कसे झाले, हें समजत नाहीं. दारिद्र्य आल्यामुळें मित्र होते ते अमित्र झाले व त्यांना मऊ गादीवरून उठून धुराळ्यांत लोळण्याची पाळी आली. शेवटीं, संकटकाळीं सर्वांस समाधान देणारें जें ईश्वरभजन त्यांत ते मग्न झाले. पुढें ते नागस्वामी नामक सत्पुरुषास शरण गेले व त्यांचें नांव आपल्या नांवापुढें लावून स्वतःस जगमित्र नागा म्हणवूं लागले. कै. भावे आपल्या ‘ महाराष्ट्र सारस्वतांत ’ लिहितात, “ जगमित्र किंवा जगमैत्र हें उपनांव असून या जगमैत्रांकडे मुठेखोऱ्यांतील मौजे पिरंगुट येथील कुळकरण होतें. जगमित्रांचा समाधिकाल शके १२५२ कार्तिक शुद्ध ११ असा देतात. याची समाधि जोगाईच्या आंब्याजवळ परळी येथें आहे. ”

वारकरी लोकांत जगमित्रांचे थोडेसे अभंग मात्र प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं ११ अभंग येथें देतों:—

१

**भक्तासाठीं रूपें धरी । त्याचें काम अंगें करी ॥ १ ॥**
**आला पुंडलिकासाठीं । अकस्मात जगजेठी ॥ २ ॥**
**अनंत ब्रह्मांडें रचिलीं । नानापरी क्रीडा केली ॥ ३ ॥**
**हे तंव नकळे कोणासी । जगमित्र नागा ध्याय मानसीं ॥४॥**

२

**शुक–व्यासादिक भुलले । लीळा गातां वेडावले ॥ १ ॥**
**उपनिषदें श्रुतिशास्त्रें । गातां शिणलीं स्तुतिस्तोत्रें ॥ २ ॥**
**तो हरिकीर्तनाचे रंगीं । नाचे देहभाव विसरूनि अंगीं ॥ ३ ॥**
**कीर्तनाची आवडी गाढी । जगमित्र नागा उभवी गुढी ॥ ४ ॥**

३

सकळ भूषणाचें भूषण । कंठीं धरा नारायण ॥ १ ॥
तेणें तुटती यातना । चुकती यमाच्या पतना ॥ २ ॥
शिव मस्तकीं धरिला । भेद भक्तांचा काढिला ॥ ३ ॥
अवध्या देवांचें हें ध्यान । जगमित्र नागा वंदी चरण ॥ ४ ॥

४

हीच उपासना धरा । नरदेहीं सार्थक करा ॥ १ ॥
भक्ति देवाची करावी । भेदद्दष्टी हे सोडावी ॥ २ ॥
आत्मा आहे हा भूतांत । भूतें आहेती आत्म्यांत ॥ ३ ॥
ऐसा धरा द्दढभाव । जगमित्र नाग्याचा हा ठाव ॥ ४ ॥

५

भक्ताचिया काजा । रूप धरिलें सहजा ॥ १ ॥
वैजयंती कुंडल माळा । पीतांबर घनसांवळा ॥ २ ॥
शंखचक्रपद्मगदा । कौस्तुभ शोभतसे गोविंदा ॥ ३ ॥
वस्त्रभूषण अलंकार । जगमित्र नाग्याचा दातार ॥ ४ ॥

६

कृष्ण लोंणी खाया गेला । येउनि गोपीनें धरिला ॥ १ ॥
मायेपाशीं घेउनि आली । तेथें कृष्णा पाहती जाली ॥ २ ॥
येथें कृष्ण तेथें कृष्ण । जिकडे तिकडे अवघा कृष्ण ॥ ३ ॥
ऐसें आश्चर्य गे माये । जगमित्र नागा पाहुनि धाये ॥ ४ ॥

७

हरिजागरासी जावें । माझ्या विठोबासी पहावें ॥ १ ॥
देवऋषी सर्व येती । नभीं विमानें दाटती ॥ २ ॥
कांकड आरति द्दष्टीं पडे । उठाउठी पाप झडे ॥ ३ ॥
ऐसा आनंदसोहळा । जगमित्र नागा पाहे डोळां ॥ ४ ॥

८

आई बहु कृपावंत । विश्वजनासी पोषीत ॥ १ ॥
रुक्मादेवीस भजती । मनोरथ त्यांचे पूर्ण होती ॥ २ ॥
दिव्यवस्त्रकुंकुम ल्याली । रत्नाभरणें ती शोभली ॥ ३ ॥
रुक्मादेवीवराच्या चरणीं । जगमित्र नागा लोटांगणीं

९

मंगळ आरती मंगळस्नान। पाहतां शुद्ध अंतःकरण ॥ १ ॥
दूध देवावर घालिती । लोणी मुखासी लाविती ॥ २ ॥
वर दहीं पडे जेव्हां । पाहतां वंशा उद्धार तेव्हां ॥ ३ ॥
घृत मधु साखर वर । लावुनि वोवाळिती श्रीधर ॥ ४ ॥
अवघे आनंदें पाहती । जगमित्र नागा ध्याये चित्तीं ॥ ५ ॥

१०

पाहतां पंढरीच्या सुखा । त्याचा कांहीं नोहे लेखा ॥ १ ॥
नामघोष घरोघरीं । गाती नर आणि नारी ॥ २ ॥
विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे । जन्मसार्थक जाहलें साचें ॥ ३ ॥
पाय जोडोनि उभा समकरकटीं । नागा जगमित्रा आनंद पोटीं ४

११

अग्नि जाळी तरी न जळे प्रल्हादु । हृदयीं गोविंदु म्हणोनिया ॥ १ ॥
अग्नि जाळी तरी न जळती गोपाळू । हृदयीं देवकीबाळू म्हणोनियां२
अग्नि जाळी तरी न जळती पांडव। हृदयीं वासुदेव म्हणोनियां॥३॥
अग्नि जाळी तरी न जळे बिभीषणाचें घर। हृदयीं सीतावर म्हणोनियां

जगमित्रांच्या घरास आग लागली असतां पांडुरंगानें त्यांचें रक्षण केलें अशी जी कथा वर दिली आहे, तिची सत्यता या अभंगावरून सिद्ध होत आहे.

---

# कान्हूपात्रा.

कान्हूपात्रा श्रीमद्विठ्ठलरूपीं समानता पावे।
तापत्रयें जन यशा या पिउनि अमृतसमा न तापावे ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं कान्हूपात्रेचा काल शके १३९० हा दिला आहे, परंतु तो बरोबर नसून, शालिवाहन शकाच्या तेराव्या शतकाची अखेर हा तिचा काल असावा असें मला वाटतें. पंढरपुरापासून सुमारें सात कोसांवर मंगळवेढें

म्हणून एक गांव आहे, तेथें शामा नामक एक वेश्या राहत होती, तिची कन्या कान्हूपात्रा होय. प्रसिद्ध सत्पुरुष दामाजीपंत व चोखामेळा, हे मंगळवेढें येथेंच होऊन गेले. कोन्होपात्रा रूपानें इतकी सुंदर होती कीं तिच्याइतकी सुंदर स्त्री त्या वेळीं त्या प्रांतांत दुसरीं नव्हती. तिच्या मातेनें एके दिवशीं तिला म्हटलें कीं, आपण राजवाड्यांत जाऊन राजाची भेट घेऊं. तूं चांगली सुंदर आहेस; राजा तुला पुष्कळ द्रव्य देईल. कान्हूपात्रा म्हणाली, ' आई गे, माझ्या योग्य असा पुरुष कोणी दिसत नाहीं, हें तूं जाणतच आहेस. माझ्याहून जो पुरुष रूपवान् असेल, त्यालाच मी वरीन '

पुढें एके दिवशीं, मंगळवेढ्यांतून वारकरी लोक टाळमृदंग वाजवीत व भजन करीत पंढरपुरास चालले होते. कान्होपात्रेनें त्या संतांस नमस्कार केला व ' तुम्ही कोठें जात आहां ?' म्हणून विचारलें. ' आम्हीं पंढरपुरास जातों ' असें संतांनीं सांगितलें. तिची भाविक व प्रेमळ वृत्ति पाहून; त्यांनीं तिजपाशीं श्रीविठ्ठलाचे पुष्कळ गुणानुवाद गायिले. कान्होपात्रेस वाटलें कीं आपणही पंढरपुरास जावें. ती वारकऱ्यांस म्हणाली, ' मी पंढपुरास आल्यें, तर पंढरिनाथ माझा अंगीकार करील काय ? ' संत म्हणाले, 'पांडुरंग भक्तीचा भुकेला आहे, तो तुझा अंगीकार खचित करील. ' मग आपल्या मातेची आज्ञा घेऊन कान्होपात्रा पंढरपुरास गेली आणि महाद्वारीं बसून पांडुरंगाची स्तुति करूं लागली. ती म्हणाली, ' देवा ! तुझी विमल कीर्ति श्रवण करून, मी तुला शरण आल्यें आहें, मला पदरीं घे. ' असें म्हणून तिनें भगवंताच्या चरणीं मस्तक ठेविलें. पुढें ती पंढरीसच राहिली. नित्य पांडुरंगाचें दर्शन घेऊन त्याच्या भजनपूजनांत आपलें आयुष्य घालविण्याचा तिनें निश्चय केला व तो शेवटपर्यंत पाळला.

एके दिवशीं, कोणी गृहस्थानें बेदरच्या बादशहाजवळ कान्होपात्रेच्या सौंदर्याची अतिशय तारीफ केली. तेव्हां, तिला बेदरास आणण्यासाठीं बादशहानें आपले शिपाई पाठविले, ते पंढरपुराजवळ येऊन दाखल झाले तेव्हां ती हकीकत कान्होपात्रेस समजली. त्या वेळीं तिनें पांडुरंगाचा धांवा केला. इतक्यांत बादशहाचे शिपाई महाद्वारीं येऊन, त्यांनीं बादशहाचा निरोप कान्होपात्रेस सांगितला. ते म्हणाले ' तूं जर सुखासमाधानानें येत नसलीस, तर तुला जबरदस्तीनें बेदरास आणण्याचा बादशहानें आम्हांस हुकूम दिला आहे. ' कान्होपात्रा त्यांस म्हणाली, ' ठीक आहे. तुम्ही येथेंच असा. मी आंत जाऊन भगवंताचा निरोप घेऊन येत्यें. ' मग कान्होपात्रा पांडुरंगाजवळ गेली व हात जोडून तिनें प्रार्थना केली:—

## अभंग

१

ुरविली पाठ न सोडी खळ। अधम चांडाळ पापराशी॥ १॥
ारितां नायके दुष्ट दुराचार। काय करूं विचार पांडुरंगे॥ २॥
ूं माय माउली जगाची जननी। ह्मणवोनी मिठी चरणीं घालीतसें ३
वेनवी कान्होपात्रा जोडोनियां हात। आतां बेह-अंतसमय आला ४

२

आपुल्या निढळीं लिहिलीं अक्षरें। तुम्हां खोटें खरें कोण म्हणे॥१॥
ायांच म्यां देवा धरिली आवडी। न पावे जोडी कांहीं केल्या॥२॥
आतां पंढरिनाथा नका पाहूं अंत। आला तो आघात निवारावा॥३॥
ह्णोनि कान्होपात्रा येत लोटांगणीं। वारंवार विनवणी करीतसें॥४

३

ंचित माझें खोटें मज असे ग्वाही। तुह्मा बोल नाहीं देवराया॥१॥
ानिला भरंवसा परी जाहली निरास। आतां पाहूं वास कवणाची
२॥ लागला तो पाठीं काळाचा दरारा। सोडवी दुसरा ऐसा
ोण॥ ३॥ तुझें म्हणविल्या शरण जाऊं कोणा। कान्होपात्रा
ह्णे मना आणीं देवा॥ ४॥

४

ाखंड वासना तुमचे ते पाय। दिन निशीं राहें हृदयांत॥ १॥
चि माझी आस हेंचि माझें मागणें। नको दुजें पेणें विठाबाई॥२॥
जवांचोनियां दुजा नको ठाव। भाकीतसें कींव विठाबाई॥ ३॥
ह्णे कान्होपात्रा पंढरीनिवासा। सोडवीं हा फांसा पडिला
गळां॥ ४॥

५

को देवराया अंत पाहूं आतां। प्राण हा सर्वथा फुटों पाहे॥ १॥
रिणीचें पाडस व्याघ्रें धरियेलें। मजलागीं जाहलें तैसें देवा॥२॥

**तुजवीण ठाव न दिसे त्रिभुवनीं । धांवें वो जननी विठाबाई ॥ ३ ॥**
**मोकलोनी आस जाहलें मी उदास । घेईं कान्होपात्रेस हृदयांत ॥४॥**

ही कान्हूपात्रेची प्रार्थना देवानें तत्काल मान्य केली. तिचे प्राण भगवंतानें आपल्या स्वरूपांत मिळवून टाकिले. साधुसंतांनीं त्या साध्वींचें प्रेत देवाल्याच्या दक्षिणद्वारीं नेऊन पुरलें; त्या ठिकाणीं तरटीचा वृक्ष उगवला, तो पंढरपुरीं अद्याप आहे असें लोक सांगतात.

इकडे बादशहाचे शिपाई महाद्वारीं बसले होते, त्यांनीं कान्हूपात्रा अद्याप येत नाहीं असें पाहून, ती आंत काय करीत आहे म्हणून पुजाऱ्यांस विचारलें. झालेली हकीकत पुजाऱ्यांनीं त्यांस निवेदन केली; पण ती त्या शिपायांस खरी वाटली नाहीं. मग, त्यांनीं त्या बिचाऱ्या पुजाऱ्यांवर कान्होपात्रेस पळविल्याचा आरोप ठेवून, त्यांस बेदर येथें बादशहापाशीं नेऊन उभें केलें. पुजाऱ्यानीं नारळ, बुका वगैरे प्रसाद बादशहापुढें ठेविला. बादशहानें प्रसाद घेतला, तों त्यांत एक केंस निघाला. हा प्रकार पाहून बादशहास मोठा क्रोध आला. ‘ केंस देवाचा आहे, ’ असें पुजाऱ्यांनीं त्यास सांगितलें व ‘ हें खोटें ठरल्यास आम्हांस वाटेल ती शिक्षा करा ’ असेंही ते म्हणाले. मग एकंदर प्रकरणाचा खुलासा करून घेण्यासाठीं बादशहा स्वतः पंढरपुरास गेला. पांडुरंग कसेंही करून आपलें रक्षण करील, या भावनेनें पुजारीही स्वस्थ राहिले.

बादशहा पंढरपुरीं आल्यावर त्यानें जेव्हां श्रीपांडुरंगाचें तें मनोहर ध्यान पाहिलं, तेव्हां त्याच्या मनांतला सगळा संशय फिटून, तो फार संतोष पावला. त्यानें भगवंतास साष्टांग नमस्कार घातला व त्या पुजाऱ्यांस आलिंगन दिलें. असो. याप्रमाणें कान्हूपात्रा आपल्या निस्सीम भक्तीच्या योगानें स्वानंदपद पावली.

कान्होपात्रेचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत, त्यांपैकीं पांच अभंग पूर्वीं दिलेच आहेत; आणखी थोडे अभंग देऊन हा लेख पूर्ण करूं.

१

**देहींचीये आशा विठ्ठलाचे पाय । आणिक न गमे माय दुजा हेत १**
**येईं वो विठ्ठले येईं वो विठ्ठले । कृपेनें वहिलें आलिंगावें ॥ २ ॥**
**निर्दय पामर बोलताती फार । न कळे विचार तुझा देवा ॥ ३ ॥**
**म्हणे कान्होपात्रा पंढरीच्या राया । धांवण्या सखया धांव वेगीं४**

२

पतितपावन ब्रीद बांधिलें आधीं । तरी कां उपाधी भक्तापाठीं ॥१॥
तुझें म्हणविल्या दुजा अंगसंग । उणेंपण सांग कोणाकडे ॥ २ ॥
सिंहाचें भातुकें जंबुकें नेतां । थोराचिये माथां लाज लागे ॥ ३ ॥
कान्होपात्रेचा देह तंव जाण । रक्षावा आपण ब्रीदासाठीं ॥ ४ ॥

३

दंभ प्रपंच भजिन्नलें तुमतें । आम्हुतें पंढरिनाथें न विसरिजे ॥ १ ॥
ज्ञान वैराग्यें भजिन्नलें तुमतें । आम्हुतें पंढरिनाथें न विसरिजे ॥ २॥
विनवी कान्होपात्रा पंढरिरायातें । आम्हुतें पंढरिनाथें न विसरिजे ३

४

शांति आणि क्षमा हे तुमचे उपाय । दंभ प्रपंच भय निवारावें ॥१॥
ज्ञान वैराग्य श्रद्धायुक्त हें भजन । हेंचि मज प्रमाण देईं देवा ॥ २॥
विनवी कान्होपात्रा अहो दीननाथा । चरणीं असो माथा सर्व काळ३

५

नलगे भुक्तिमुक्ति नलगे स्वर्गवास । नको जाणें वैकुंठास देवराया ॥ १ ॥ न लगे योग याग अष्टांगसाधन । न चुके बंधन येणें कांहीं ॥ २ ॥ न लगे इष्ट-मित्र सोईरे संबंधी। नको हे उपाधी पाठीं लावूं ॥ ३ ॥ कान्होपात्रा म्हणे विठोबा दयाळा । दे गा प्रेम-कळा नाम तुझें ॥ ४ ॥

६

द्रौपदी संकट पडतां जडभारी । धांवसी सत्वरीं देवराया ॥ १ ॥
तैसें मज करीं कृपेचें धांवणें । सोडवीं वचनें अभयाच्या ॥ २ ॥
तिहीं लोकीं ब्रीद गाजतसे देवा । अव्हेरितां केशवा लाज कोणा ३
म्हणे कान्होपात्रा अहो कृपानिधि । तोडीं हे उपाधि लिगाडाची४

७

जगाच्या कैवारा । कैसा धांवसी तूं त्वरा ॥ १ ॥
अंबऋषीसाठीं । गर्भवास तुज जगजेठी ॥ २ ॥

अर्जुनाकारणें। सारथीपणा येथें करणें ॥ ३ ॥
वरुषतां जळधर। उचलीला गिरिवर ॥ ४ ॥
ऐसा भक्ताचा अंकिला। अंकित अंकिलाचि ठेला ॥ ५ ॥
ही ऐकोनियां मात। कान्होपात्रा हृदयीं ध्यात ॥ ६ ॥

८

तूं उदार म्हणुनी भाकीतसें कींव। सोडवीं हा जीव पाशांतुनी॥१॥ गुंतलासे मीन लिगाडाचे गळीं। तैसा तळमळी देह माझा ॥ २ ॥ आशा मनशा तृष्णा तोर्डी यांचें जाळें। काढीं उतावेळें कडिये मज ॥ ३ ॥ तुझाचि भरंवसा जगीं हा विख्यात। बुडतें भवडोहांत विठाबाई ॥ ४ ॥ सर्वभावें तुज आलें मी शरण। कान्होपात्रेचें निर्वाण पाहूं नका ॥ ५ ॥

---

# ज्ञानदेव

निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान आणि मुक्ताबाई या चारी भावंडांचा नामदेवचरित्राशीं निकट संबंध आहे. परंतु यांची विस्तृत माहिती महाराष्ट्र कविचरित्राच्या सहाव्या भागांत दिलेली असल्यामुळें व जमल्यास पुढें मागें ज्ञानदेव महाराजांचें विस्तृत चरित्र लिहिण्याचा माझा विचार असल्यामुळें, येथें त्यासंबंधानें विशेष कांहीं लिहीत नाहीं. तथापि यवढें सांगणें जरूर आहे कीं, सगळ्या महाराष्ट्र संतमंडळांत आणि कवि-मंडळांत ज्ञानदेव महाराजांस जें आद्यस्थान प्राप्त झालेलें आहे, तें ध्रुवाप्रमाणें अगदीं अढळ आहे. आकांशांतील अनंत ग्रहमालेंत, भगवान् सूर्यनारायण जसा आपल्या असह्य आणि देदिप्यमान् तेजानें तळपून इतर सर्व ग्रह आणि तारे निस्तेज करून सोडतो तद्वत् महाराष्ट्रांत होऊन गेलेले इतर सर्व संत आणि कवि या ज्ञानसूर्याच्या प्रकाशानें कांहींसे निस्तेज झालेले दिसतात.

---

# चांगदेव

**माझें नमन असावें त्या सिद्धा नित्य चांगदेवातें ।**
**यन्नामयशें चंदन सुख निववुनि जेविं आंग दे वातें ॥**

सन्मणिमाला—मोरोपंत

चांगदेव हे आपल्या योगसामर्थ्याच्या जोरावर चौदाशें वर्षें जगले होते व आळंदी येथें ज्ञानदेवांच्या भेटीस येतांना ते वाघावर बसून आले होते वगैरे मनोरंजक कथा महीपतींच्या संतचरित्रविषयक ग्रंथांत वाचकांनीं वाचल्याच असतील. यासंबंधानें कै. विनायक लक्ष्मण भावे हे आपल्या 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथांत लिहितातः—" या चांगदेवाचीं चरित्रें अनेकांनीं गाइलीं आहेत, पण त्या सर्वांत इतका घोटाळा आहे कीं आज त्यांपासून फारसें कांहींच निष्पन्न होत नाहीं. तथापि त्या चरित्रांवरून व निरनिराळ्या ठिकाणच्या चांगदेवासंबंधीच्या उल्लेखांवरून असें दिसतें कीं हा पुरुष प्रथम योगमार्गी असून पुढें भक्तिमार्गांत शिरला होता. वयानें वृद्ध असून हा दीर्घायुषी असावा. प्रथम वटेश्वर या नांवाच्या पुरुषाचें शिष्यत्व पतकरून पुढें यानें प्रसिद्ध मुक्ताबाईची उपदेशदीक्षा घेतली होती. वटेश्वराचा शिष्य असल्यामुळें याला चांगा वटेश्वर असें म्हणत. ज्ञानेश्वरादि भावंडांबरोबर कांहीं दिवस घालविल्यावर यानें गोदावरीचे तीरीं ( पुणतांबें येथें ) शके १२२७ मध्यें क्रोधन संवत्सरीं ज्येष्ठ शुद्ध सप्तमीस समाधि घेतली. याचे ग्रंथ हल्लीं फारसे उपलब्ध नाहींत. 'योगेंद्रचिंतामणि' या नांवाचा याचा एक संस्कृत ग्रंथ आहे असें म्हणतात. मराठींत उत्तरपंचविशी या नांवाचें एक प्रकरण, एक आरती व सुमारें पांच पंचवीस अभंग इतकीच याची कृति हल्लीं उपलब्ध आहे." नामदेवी गाथ्यांत चांगदेवांच्या समाधीचें एक अभंगबद्ध प्रकरण सांपडतें त्यांत त्यांच्या समाधीचें विस्तृत वर्णन दिलेलें आहे. शिवाय त्यांचाच वंशज शामजी गोसावी यानें त्यांचें अभंग वृत्तांत एक मोठें चरित्र लिहिलेलें असून तें "महाराष्ट्र कवि" मासिकांत प्रसिद्ध झालेलें आहे. 'चांगदेव पासष्टी' हें प्रसिद्ध प्रकरण श्रीज्ञानदेव महाराजांनीं चांगदेवास उपदेश करण्यासाठींच लिहिलें अशीही आख्यायिका आहे. निवृत्तिनाथ व मुक्ताबाई यांच्या अभंगांत चांगदेवांचा उल्लेख अनेक ठिकाणीं आला आहे. पहाः—

**चांगा तो नोवरा बैसलासे पाटीं ।**
**मुक्ताबाई करवली हळदुली वाटी ॥**

चांगदेवांचे ७५ अभंग गाथ्यांत दिले आहेत, त्यांतले निवडक १० अभंग येथें देतों:—

१

मी माझें दुरित आशापाश चित्तीं । मोहममता भ्रांति अहंभावें॥१॥
हरितसे तेज अभिमान ताठा । एकतत्त्वें वैकुंठा हरिपाठें ॥ २ ॥
नाशवंत देह पंचतत्त्व मोळी । वायांचि वाहडुळी उडोनि जाये॥३॥
मुक्ताई जीवन चांगया दिधलें । निर्गुणीं साधिलें घर कैसें ॥ ४ ॥

२

चांगा जन्मला माध्यान्हकाळीं । मायबापें दोन्ही नाहींशीं जालीं॥१॥
मुळींच चांगा नाहींसा जाला। मुक्ताई म्हणे चांगया भला भला॥२॥
वटेश्वर चांगा मुळीं लागला । पोसणा घेतला मुक्ताईनें ॥ ३ ॥

३

पतिव्रता नारी व्यभिचार केला । परपुरुष पूजिला बाईयांनों ॥ १ ॥
पतिव्रता नारी ऐसें म्हणावें । नांव पैं ठेवावें अव्यक्तासी ॥ २ ॥
चांगा द्वैत तो अद्वैत जाहला । सोहं शब्दीं राहिला वटेश्वरीं ॥ ३ ॥

४

निरंजन वनीं केशव फुलला । डोंगर शोभला ब्रम्हगिरी ॥ १ ॥
तेथें सुमन झाडीन अनुहातें। शिष्ट अनुभवुनि बुद्धि तोचि जाला २
चांगा होता वटेश्वरीं केशव फुलला। भ्रमर जाला रस घ्यावया॥३॥

५

दीपकळिका शोधितां कांहींच नाहीं । मावळला गेला कवणे ठायीं ॥ १ ॥ दृष्टि तत्त्वसार शोधणें काई । भीतरी पाहतां बाहिजु नाहीं ॥ २ ॥ सेखीं जे सरले सरोनि जे उरले। चांगया दिधले चोरोनियां ॥ ३ ॥

६

वळे ना वरुषें नई पूर आला। कोरडिये नई जन बुडाला ॥ १ ॥ बुडतो काय बोंब न होय । थडियेचा पाहे कवतुक ॥ २ ॥ बुडाला बुडाला ऐसें जन लोक म्हणती । सेखीं उडी कोणी न घालिती ॥ ३ ॥ मुक्ताई सांगडी वटेश्वर तारू । चांगा पैलपारू उतरिला ॥ ४ ॥

७

आकार पूजितां निराकार जालें । शून्यीं बुडालें बाईयांनों ॥ १ ॥
शून्याचा अंकुर शून्य फळलें । व्योमाकार जालें मन तेथें ॥ २ ॥
तेथें फळ ना डाळ जातिना कुळ । वटेश्वर चांगा जाला निर्मूळ ३

८

क्रोधाची आगटी बांधोनियां पोटीं । सासुरिया पाठीं लागतसे ॥१॥
पहा वो इचें केवढें ढाल । आल्यासवें करितसे बोल ॥ २ ॥
लाज सांडोनि निःशंक जाली । पांचांही बांधिली पाठीवरी ॥ ३ ॥
चांगा म्हणे जीवींचें गुज । वटेश्वरीं मज सांगितलें ॥ ४ ॥

९

नोवरीचे हातीं चित्रीव काठी । नोवरी लागे संन्याशापाठीं ॥ १ ॥ नारायण म्हणा नारायण म्हणा । नारायण म्हणा वो नोवरीवो ॥ २ ॥ विश्वरूप नोवरी संन्याशा रातली । त्या आम्हा भली सोयरीक जाली ॥ ३ ॥ दिगंबर नोवरा क्षपणिक वऱ्हाडी । वटेश्वर चांगा वाहतो लुगडीं ॥ ४ ॥

१०

मृगजळावरी मुंगियांच्या हारी । दुरुनी नारी दावितसे ॥ १ ॥
मुंगी लाठी मुंगी लाठी । वैकुंठींच्या खुणा सांगतसे गोष्टी ॥ २ ॥
मुंगिचिया गळां तुळसीचा लोहडणा । चांगा वटेश्वर सांगतो खुणा ३

---

# जोगा परमानंद



जोगा परमानंद भक्त । बारसी ग्रामांत होता रहात ।
अखंड उदास आणि विरक्त । वैराग्यभरित सर्वदा ॥

—महिपति.

यांची कांहीं माहिती महीपतीनीं आपल्या भक्तविजयांत दिली आहे. हे जातीनें शूद्र होते असें महीपतीनीं म्हटलें आहे. यांचें स्वतःचें नांव जोगा व त्यांच्या गुरूचें

नांव परमानंद. जोगा परमानंद यांचें वैराग्य मोठें कडकडीत होतें. यांचें वास्तव्यस्थान बार्शी. हे अत्यंत विरक्त वृत्तीनें रहात असत. नित्य पहांटे स्नान करून व भगवद्गीतेचा एक श्लोक म्हणून, प्रत्येक श्लोकागणिक एक नमस्कार याप्रमाणें सातशें नमस्कार रोज घालावयाचे असा त्यांचा नियम होता. महीपति म्हणतात—

**कांहीं तरी नित्य नेम। केलियावांचून भक्षील अन्न।**
**तरी तो मनुष्य सूकरासमान। बोलिलें वचन धर्मशास्त्रीं॥**

एकदां जोगा परमानंद हे पंढरपूर येथें असतां, पुष्कळ पाऊस पडल्यामुळें सर्वत्र चिखल झाला होता आणि त्या चिखलांतच जोगा परमानंद हे आपल्या नित्यनियमाप्रमाणें देवास नमस्कार घालीत होते. महाद्वारीं कांहीं व्यापारी उतरले होते त्यांनीं जोगा परमानंद यांचें धोतर चिखलानें भरलेलें पाहून त्यांना त्यांची दया आली व त्यांपैकीं एका व्यापाऱ्यानें एक भारी किंमतीचा पीतांबर त्यांस दिला. तेव्हां जोगा त्याला म्हणाले, " मला गरिबाला हा पीतांबर कशाला ? यापेक्षां एखादें जीर्ण वस्त्र आपण मला द्याल तर बरें होईल. " परंतु व्यापाऱ्यानें त्यांना अतिशयच आग्रह केला, इतकेंच नव्हे तर तो पीतांबर जोगा यांस त्यानें स्वतः नेसविला. पीतांबर नेसल्यावर जोगा पुनः नमस्कार घालूं लागले, परंतु तें भारी किंमतीचें वस्त्र चिखलांत भरेल या शंकेनें त्यांनीं ओचे खोवले व ते फार जपून नमस्कार घालूं लागले. त्यामुळें, अर्थात्च, जसे नमस्कार घातले पाहिजे होते तसे ते घातले जाईनात; व दुपारचे बारा वाजले तरी ७०० नमस्कारांची संख्या पुरी होईना. मग आपल्या नित्यनियमांत अशा प्रकारें व्यत्यय येण्यास हा पीतांबरच कारणीभूत झाला, हें त्यांच्या लक्ष्यांत येतांच, पीतांबराच्या मोहानें नमस्कार घालतांना अंगचोरपणा करणाऱ्या आपल्या देहास त्यांनीं कडक शासन करण्याचें ठरविलें. महाद्वारासमोरून एक शेतकरी दोन बैल घेऊन रस्त्यानें चालला होता, त्याला हाक मारून ते म्हणाले, " अरे, हा दिव्य पीतांबर मी तुला देतों; हे तुझे दोन बैल तूं मला दे. " शेतकऱ्यानें तें कबूल केलें. मग जोगा त्यास म्हणाले, " आतां तूं असें कर, बैलांच्या मानेवर जूं ठेव आणि त्या जुंवाच्या दोन टोंकांस ज्या दोन खुंट्या मारलेल्या आहेत त्यांना माझे दोन पाय दोरानें बांधून टाक. आणि बैलांच्या पाठीवर चाबकाचा एकेक फटकारा लगावून, नंतर घरीं जा. " तो शेतकरी अगदींच अडाणी होता; परिणामाकडे लक्ष्य न देतां जोगा यांनीं सांगितल्याप्रमाणें त्यांचे पाय त्यानें जुंवास बांधले आणि बैलांना चाबकाचा एकेक फटकारा लगावून तो

चालता झाला. चाबकाचा तडाका पाठीवर बसतांच बैल उधळले आणि रानोमाळ पळत सुटले. रानांवनांतून, कांट्याखुट्यांतून, वाट फुटेल तिकडे ते सारखे पळत होते. त्यामुळें जोगा परमानंद यांस इतकी भयंकर इजा झाली कीं त्यांची कातडी सोलून निघाली व रक्ताची धार वाहूं लागली! " देहेदुःख तें सूख मानीत जावें " अशा कोटींतले ते असल्यामुळें या भयंकर दुःखाची त्यांनीं बिलकुल पर्वा केली नाहीं, उलट, आपल्या अपराधास हेंच शासन योग्य आहे असें त्यांस वाटलें. महीपति म्हणतातः—

**ऐसें समाधान मनीं मानून। मुखीं करीत नामस्मरण।**
**श्रीरामकृष्ण नारायण। पतितपावन करुणाब्धे॥**
**जय रुक्मिणीमानसरंजना। पयोब्धिवासा शेषशयना।**
**भक्तकैवारिया गुणनिधाना। जगज्जीवना पांडुरंगा॥**
**ऐशा रीतीं स्मरण करित। कंठ झाला सद्गदित।**
**वृषभ पळती अरण्यांत। त्यांमागें ओढत जातसे॥**

कातडें सोलून निघालें, नुसता अस्थिपंजर मात्र राहिला, तरी कंठीं प्राण धरून जोगा परमानंदानीं पांडुरंगाचें स्मरण चालविलेंच होतें. शेवटीं, पंढरिनाथास त्यांची दया येऊन तो तेथें धावून आला व दोर तोडून बैलांस त्यानें सोडून दिलें.—

**मग आपुले हस्तें सोडोनि चरण। तयासि दिधलें आलिंगन।**
**कृपादृष्टी पाहतांचि जाण। दिव्य शरीर जाहलें॥**
**जोग्यासि म्हणे रुक्मिणीरमण। एवढें कां मांडिलें निर्वाण।**
**कांहींच नसतां अन्याय जाण। केलें दंडन देहासी॥**

अशा प्रकारचे जोगा परमानंद हे अत्यंत वैराग्यशील संत होते. त्यांनीं पुष्कळ कविता लिहिली व ती उतरून घेण्याचें काम विसोबा खेचर हे करीत असत अशी दंतकथा आहे. यांची समाधि बार्शी येथें असून, यांचे पुण्यतिथिनिमित्त मार्गशीर्ष वद्य ४ थीस उत्सव होत असतो. हल्लीं, जोगा परमानंदांची फारच थोडी कविता उपलब्ध आहे, त्यांतलीं कांहीं पद्यें येथें देतों:—

**१ पद.**

**बैसोनि संतां घरीं हो। घेतली गुरगुडी॥ ध्रु०॥**
**आधीं ब्रह्मांड नारळ। मेरू सत्व तो अढळ।**
**निर्मळ सत्रावीचें जळ। सोहं गुरगुडी, गुरुगोडी॥**

चिलमी त्रिगुण त्रिविध । मीपण खडा तो अभेद ।
तम तमाखू जाळुन शुद्ध । वैराग्यविंगळ धडधडी ॥
सावधान लावुनियां नळी । मीपण झुरका विरळा गिळी ।
जन्ममरणाची मुरकुंडी संभाळी । धूर विषयाचा सोडी ॥
लागला गुरुगोडीचा छंद । त्याला प्रसन्न परमानंद ।
जोगा स्वामी तो अभंग । गुरुचरण न सोडी ॥
बैसोनि संतांघरीं हो घेतली गुरगुडी । गुरुगोडी ॥

२ अभंग.

उठोनि प्रातःकाळीं येती कृष्णाजवळी ।
पाहती नेत्रकमळीं कृष्णमुख ॥ १ ॥
धन्य दिवस जाहला श्रीकृष्ण भेटला ।
गोकुळीं उगवला बाळसूर्य ॥ २ ॥
दृष्टीचेनि सुखें सुखाचि कोंदाटे ।
अंतरीं प्रगटे तरि काय उणें ॥ ३ ॥
जोगा म्हणे तेणं परमानंदीं काज ।
गोकुळीं हें निज प्रगटलें ॥ ४ ॥

३

कृष्णाचें रूपडें डोंगर जाहले निळे ।
गोपाळ सांवळे दिसताती ॥ १ ॥
आनंदें मयोर करिताति किंकार ।
देखोनी सुंदर चक्रपाणी ॥ २ ॥
रूपाचेनि रूपें धरितो गोधनीं ।
कैवल्याचा दानीं पाहताती ॥ ३ ॥
जोगयाचा स्वामी कृष्णरूप देखोन ।
श्वापदालोचनीं प्रेम वाहे ॥ ४ ॥

४

सहांचे संगतीं चौघे अनुवादती ।
परी एकाचिये मती न कळे देखा ॥ १ ॥

तो गौळियाचे घरीं रांगणा पैं झाला ।
वाल्हा दुल्हा म्हणोनि दाम देती ॥ २ ॥
सत्यलोकीं ब्रम्हा कैलासीं शंकर ।
ध्याती मनोहर हरि देखा ॥ ३ ॥
जोगयाचा स्वामी नंदाचा खिल्लारी ।
हा बोल निरंतरीं वाढिन्नला ॥ ४ ॥

---

# चोखामेळा

गावा नच मानावा चोखामेळा महार सामान्य ।
ज्याच्या करि साधूंचा चोखा मेळा महारसा मान्य ॥

—सन्मणिमाला, मोरोपंत.

हा अस्पृश्य वर्गांतला महासाधु पंढरपूर येथें होऊन गेला असें महीपतींनीं आपल्या 'संतलीलामृत' ग्रंथाच्या ३० व्या अध्यायांत लिहिलें आहे. परंतु कै. विनायकराव भावे ह्यांनीं आपल्या ' महाराष्ट्र सारस्वतां ' त म्हटलें आहे कीं चोखामेळा हे मंगळवेढें येथें रहात असत. तत्कालीन संतमंडळांत चोखोबांची फार मान्यता होती, व साक्षात् पंढरिनाथ सगुणरूपानें त्यांना भेटत असे अशी कथा आहे. महीपति लिहितात—

काय कराल उंच वर्ण । सत्कर्म आचार शास्त्रपण ।
एक भक्तिभावावांचून । जगज्जीवन नातुडे ॥

ज्ञानदेवनामदेवादि संतांनीं उभारलेल्या भक्तिमार्गभागीरथींत स्नान करून स्वतःचा उद्धार करून घेण्यास जातिभेदाची आडकाठी नसल्यामुळें चोखामेळा महार, रोहिदास चांभार वगैरे अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींतील लोकही, आपल्या भक्तिवैभवानें, सदाचरणानें आणि वैराग्यशीलतेनें पंतांसारख्या पट्टीच्या विद्वान् ब्राम्हणांसही वंदनीय झाले. श्रीएकनाथ महाराजानीं संतांस विठोबाचीं भूषणें कल्पून त्यांची स्तुति केली आहे, त्यांत चोखोबांस 'चरणतळींची वीट निर्मळ । तो हा जाणा चोखामेळ ' असें म्हटलें आहे. ' चोखामेळा संत जीवासी आवडे । विसर न पडे त्याचा मज ' असे प्रेमळ उद्गार तुकाराम महाराजानीं काढले आहेत. आणखी एके ठिकाणीं त्यानीं ' चोखा-

मेळा वंका यातीचे महार । त्यांसी सर्वेश्वर ऐक्य करी ' व ' चोखामेळा तुझा झाडू । त्याचीं ढोरें लागसी ओढूं ' असें म्हटलें आहे. नामदेवांच्या अभंगांत चोखोबांचा नामोल्लेख अनेक स्थलीं झाला आहे. चोखोबांच्या पुढील अभंगांत विठोबा त्यांच्या घरीं जेवावयास गेल्याचा उल्लेख आहे:—

**विठोबा पाहुणा आला आमचे घरा ।**
**निंबलोण करा जीवें भावें ॥ १ ॥**
**पंचप्राण ज्योति ओंवाळूनि आरती ।**
**ओंवाळिला पति रुक्माईचा ॥ २ ॥**
**षड्रस पक्वान्न विस्तारिलें ताट ।**
**जेवूं एकवट चोखा म्हणे ॥ ३ ॥**

तसेंच, पंढरपुरचे पुजारी चोखोबांस देवळांत येऊं देत नसत व देवाजवळ जाऊन त्याचें दर्शन घ्यावें अशी तर चोखोबांची उत्कंठा. त्यामुळें त्यांनीं महाद्वारापर्यंत जावें आणि तेथूनच नमस्कार करून मागें फिरावें असें होऊं लागलें. पांडुरंगालाही भक्तावांचून चैन पडेना. तेव्हां एके दिवशीं त्यानें चोरून त्याला देवळांत आणून दर्शन दिलें. कांहीं वेळ त्यांचें संभाषण झाल्यावर, चोखोबा परत जाण्यास निघाले तेव्हां देवानें त्यांना रत्नहार, बुका, तुळसी इत्यादि प्रसाद दिला. दुसरे दिवशीं देवाचे गळ्यांतला रत्नहार नाहींसा झालेला पाहून पुजाऱ्यांनीं तपास केला, तेव्हां चोखोबांजवळ तो रत्नहार सांपडला. त्या वेळीं पुजाऱ्यांनीं त्यांना पुष्कळ मार दिला. पुढें कांहीं चमत्कार दाखवून देवानें त्यांचें रक्षण केलें. ह्या कथेचा उल्लेख चोखोबांच्या पुढील अभंगांत सांपडतो.—

**धांव घालीं विठो चालूं नको मंद ।**
**बडवे मज मारिती ऐसा काय तरी अपराध ॥ १ ॥**
**विठोबाचा हार तुझ्या कंठीं कसा आला ।**
**शिव्या देउनि ह्मणती महारा देव बाटविला ॥ २ ॥**
**कर जोडुनि चोखा विनवितो देवा ।**
**बोलिलों उत्तरें परि राग नसावा ॥ ३ ॥**

चोखोबा हे जातीनें महार असतांही त्यांची राहणी फार स्वच्छतेची होती. यदृच्छेनें वांट्यास आलेलें आपलें जातिकर्म आटोपल्यावर माध्यान्हकाळीं स्नान करून ते धूत-वस्त्रें परिधान करीत व गंध लावून पांडुरंगाचें ध्यान करीत. ते मांसाहार करीत नसत.

ज्ञानदेव नामदेवादि उच्चवर्णीय संतांच्या पंक्तींत चोखामेळा यांस मुक्तद्वार असे, व तेही त्यांच्या घरीं जाऊन खुशाल जेवीत !

पंढरपुरापासून आग्नेयीस जवळच मंगळवेढें गांव आहे तेथें गांवकुसूं घालण्यासाठीं पुष्कळ महार वेठीनें कामास लाविले होते, त्यांत चोखोबाही होते. चार महिन्यांनीं तें गांवकुसूं अकस्मात् कोसळून पुष्कळ महार चिरडून मरण पावले, त्यांतच चोखोबांचा अंत झाला. शा० शके १२६० वैशाख वद्य ५ स त्यांनीं वैकुंठीं गमन केलें. नंतर आठ दिवसांनीं पांडुरंगानें पंढरीहून नामदेवांस त्यांच्या अस्थि आणण्यास पाठविलें. ज्या अस्थींतून ' विठ्ठल विठ्ठल ' असा शब्द निघेल त्या चोखोबांच्या अस्थी अशी खूण विठ्ठलानें नामदेवांस सांगितली. नामदेव गांवकुसाजवळ जाऊन तेथें पडलेल्या अस्थि उचलून आपल्या कानास लावून पाहूं लागले. शेवटीं कांहीं अस्थींतून ' विठ्ठल विठ्ठल ' असा शब्द निघत असलेला त्यांच्या कानीं पडला तेव्हां त्याच चोखोबांच्या अस्थि आहेत असें जाणून त्या घेऊन ते पंढरपुरास आले. विठ्ठलाविषयींचें अनन्य प्रेम चोखोबांच्या अस्थींतही आहे हें पाहून नामदेवांस मोठें आश्चर्य वाटलें. नामदेवांनीं आणलेल्या चोखोबांच्या अस्थि पांडुरंगानें मोठ्या प्रेमानें पीतांबराच्या पदरांत घेतल्या. पदरांत पडतांच अस्थींनीं ' विठ्ठल विठ्ठल ' असा पुनः गजर केला. त्या अस्थी महाद्वारीं पुरल्या आणि त्यांजवर समाधि बांधली. सर्व संतांनीं मोठा जयजयकार केला. असें चोखोबांचें हें संक्षिप्त चरित्र आहे. हल्लीं महाराष्ट्रांतील महार लोक आपल्या जातीस ' चोखामेळा ' म्हणवूं लागले आहेत, आणि त्यांत कांहीं वावगें आहे असेंही नाहीं, परंतु एका गोष्टीबद्दल थोडेंसें वाईट वाटतें. चोखोबांच्या नांवाचा फायदा घ्यावयाचा असेल तर त्यांची शुचिर्भूतता, सदाचरण, मांसभक्षणत्याग इत्यादि गुणांचेंही थोडेंबहुत अनुकरण करून आपल्या जातीची राहणी सुधारण्याचा प्रयत्न आमच्या महार बंधूंनीं अवश्य केला पाहिजे, पण तसा तो त्यांजकडून होत असल्याचें कांहींच चिन्ह अद्याप दिसत नाहीं. असो.

चोखोबांची समकालीन प्रसिद्ध कवयित्री जनाबाई म्हणते—

**यातीहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा ॥**
**त्याचा झाला म्हणियारा । राहे घरीं करी थारा ॥**
**देव बाटविला त्यानें । हांसे जनी गाय गाणें ॥**

चोखोबांचे सुमारें ३५० अभंग गाथ्यांत छापलेले आहेत. त्यांची पत्नी सोयराबाई इचेही बरेच अभंग प्रसिद्ध असून त्यांत 'चोखियाची महारी' या शब्दांनीं तिनें स्वनामोल्लेख केलेला आहे. याशिवाय, कर्ममेळा, वंका, निर्मळा वगैरे चोखोबांच्या

नातेवाईकांचेही कांहीं अभंग उपलब्ध आहेत. चोखोबांविषयीं कै. विनायक लक्ष्मण भावे यानीं आपल्या ' महाराष्ट्र सारस्वत ' ग्रंथांत दिलेली पुढील माहिती वाचनीय आहेः—

" ब्राम्हणांत जसे ज्ञानदेव, सोपानदेव झाले किंवा शूद्रांत सांवता माळी, गोराकुंभार हे झाले तसेच अतिशूद्रांतही चोखामेळ्यासारखे व बंकासारखे विष्णुदास होऊन गेले. चोखामेळा हा मंगळवेढ्याचा राहणारा, जातीचा महार होता. हा सारा वेळ कामधंदा करीत असतांनाही तोंडानें भजन करी. याच्या बायकोचें नांव **सोयरा.** याला एक मुलगा होता त्याचें नांव **कर्ममेळा.** त्यांचेचजवळ चोख्याची बहीण **निर्मळा** हीही राहून तेथेंच असे व आपला संसार चालवी. संसाराचे त्रासानें व त्यांतील अडचणीनें संसाराला चोख्याचें मन अगदीं कंटाळून गेलें होतें. तो म्हणतो, " एकापुढें एक पडती आघात । सारितां न सरत काय करूं ? " अशा तापलेल्या मनाला शांति मिळावी व आराम वाटावा म्हणून चोख्यानें अनेक तीर्थयात्रा केल्या, पण कोठेंही त्याचें मन रमलें नाहीं. तो म्हणतोः—

**बहुत हिंडलों देश देशांतर । परि मन नाहीं स्थिर झालें कोठें ॥ बहुत तीर्थें फिरोनियां आलों । मनासवें झालों वेडगलचि ॥ बहुत प्रतिमा ऐकिल्या पाहिल्या । मनाच्या नाहीं राहिल्या येरझारा ॥ चोखा म्हणे पाहतां पंढरी भूवैकुंठ । मनाचे हे कष्ट दूर झाले ॥**

तो आणखी सांगतो—

**विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पंढरी ॥**
**होतो हरिनामाचा गजर । दिंड्या पताकांचे भार ॥**
**निवृत्ति ज्ञानदेव सोपान । अपार वैष्णव ते जाण ॥**
**हरिकीर्तनाची दाटी । तेथें चोखा घाली मिठी ॥**

आणि एकदां मिठी पडून तेथली गोडी लागल्यावर चोखोबाला आणखी संतसमागमाची जोड मिळाली. व तो पंढरीस गेल्यावर, " हरिनामाची पेठ । भूवैकूंठ पंढरी ॥ चंद्रभागा वाळुवंट । संत घनदाट नाचती ॥ टाळ मृदंग मोहरी । वैष्णव गजरीं आनंदें ॥ " असें त्याला दिसलें. आणि हें पाहून ' चोखा जाई लोटांगणीं । घेत पायवणी संतांचें. ' संतांच्या समागमाची व त्यांच्या अधिकारयुक्त वाणीची आणि गोड उपदेशाची चव मनाला कळल्यावर आपण आजपर्यंत संसाराच्या लिगा[1]-

---

१ **आजवरी पडलों लिगाडाचे गुंती । तेणेंचि फजिती झाली असे ॥ झाला दिसे मज मोकळा मोक्षमार्ग । धिक्कारोत जग मागें पुढें ॥**

डांत व्यर्थ गुंतून पडलों आणि विनाकारण फजीती करून घेतली असें त्याला झालें. व लोक कांहीं म्हणोत, त्यांचेकडे लक्ष न देतां, मोक्षाचा मार्ग तो चोखाळूं लागला. यापुढें पंढरीची वारी त्यानें कधींही चुकूं दिली नाहीं. तेथें जाऊन 'महाद्वारीं चोखामेळा । विठ्ठल पाहातसे डोळां." वारीचे वारकरी परत फिरले म्हणजे चोखामेळाही मंगळवेढ्यास परत जाई. पण पंढरीस काय आणि मंगळवेढ्यास काय चोखोबा कोठेंही असला तरी पंढरीचा विठोबा आणि पंढरीचे संत यांच्या ठिकाणीं त्याचें मन धांव घेत असे. पंढरीचे वारकरी जातायेतांना पाहिले म्हणजे त्याचें मन उड्या घेऊं लागे व

**कोणी पंढरीस जाती वारकरी । तयांचे पायांवरी भाळ माझें ॥**
**आनंदें तयांसी भेटेन आवडीं । अंतरींची गोडी घेइन सुख ॥**
**ते माझे मायबाप सोयरे सज्जन । तयांवरी तनुमन ओंवाळीन ॥**

असें त्याला सारा वेळ वाटे. जीवाचे मैत्र भेटले म्हणजे लहान मुलांना जो परमावधीचा आनंद वाटतो व त्या मैत्रिकीपुढें इतर सर्व गोष्टी जशा तुच्छ वाटतात, तो आनंद व तसें अव्याज सुख चोखोबाला कोणी विठ्ठलाचा वारकरी भेटला म्हणजे होई[1]. चोखोबाची बायको सोयरा हीही त्याच्याबरोबर भक्तिसुखाचें जेवण जेवून ढेंकर देत समाधानवृत्तीनें संसार चालवून असे. ती शरीरानें संसाराचा गाडा ओढी खरा, पण तें अवश्य कर्तव्य करीत असतांनाही त्यांतच गुरफटून न राहतां दृढविश्वास धरून ती मनानें हरिभक्ति करी. व आपल्या इतर आयाबहिणींनाही हाच उपदेश करी कीं,

**माझें माझें म्हणुनी गुंतले हांव भरी । वायां या संसारीं मृगजळीं ॥**
**आपुली आपण करा आठवण । संसारबंधन तोडा वेगीं ॥**
**नाम निजनौका विठ्ठल हें तारूं । भवाचा सागरू उतरील ॥**
**हाचि विश्वास धरावा अंतरीं । म्हणतसे महारी चोखयाची ॥**

चोखामेळाही सर्वांना अशीच दवंडी पिटतो—

**टाळी वाजवावी गुढी उभरावी । वाट ही चालावी पंढरीची ॥**
**पंढरीचा हाट कैवल्याची पेठ । मिळालें संतुष्ट वारकरी ॥**
**पताकांचे भार मिळाले अपार । गर्जे भीमातीर जयजयकारें ॥**
**खट नट यावे शुद्ध होउनि जावें । दवंडी पिटी भावें चोखामेळा ॥**

---

१ आजि दिवस धन्य सोनियाचा । जिवलग विठोबाचा भेटलासे ॥
तेणें सुखसमाधान जाहलीं विश्रांति । दुजें नाठवे चित्तीं कांहीं एक ॥

चोखामेळा, त्याची बायको व त्याच्या कुटुंबांतील इतर मंडळी हीं सर्व अभंग-रचना करीत असत. चोख्याचें ' विवेकदर्पण ' म्हणून एक प्रकरण उपलब्ध आहे. चोखोबाच्या बायकोनें कृष्णचरित्रावर कांहीं कथा गायिल्या असाव्यात. ''

या सर्वांची गुरुपरंपरा वंकानें ज्यांत दिली आहे तो अभंग येणेंप्रमाणें:—

**आदिनाथ गुरु सकळ सिद्धांचा । मच्छींद्र तयाचा मुख्य शिष्य ॥**
**मच्छींद्रानें बोध गोरक्षाला केला । गोरक्ष वळला गहिनीप्रती ॥**
**गहिनीप्रसादें निवृत्ति दातार । ज्ञानदेवा सार चोजविलें ॥**
**ज्ञानियाचा राजा ज्ञानेश्वर माउली । खेचरा वोळली कृपासिंधु ॥**
**ज्ञानदेवा चरणीं खेचर शरण । नामदेवा पूर्ण कृपा केली ॥**
**नामदेवें हात चोखयाचे शिरीं । विठ्ठल तीं अक्षरीं उपदेशिलें ॥**
**वंका ह्मणे माझी चोखा गुरु माउली । तियेचे पाउलीं लोटांगण ॥**

वंकानें दिलेल्या या माहितीवरून, चोखोबांस प्रत्यक्ष नामदेवमहाराजांचा उपदेश झाला होता हें उघड सिद्ध होतें. नामदेवांच्या अभंगांत चोखोबांच्या नांवाचा उल्लेख पुष्कळ ठिकाणीं सांपडतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे. अनंत भट या नांवाचा एक ब्राम्हण चोखोबांचे अभंग उतरून घेत असे अशी माहिती जुन्या ग्रंथांत सांपडते. चोखोबांचे व त्याच्या कुटुंबांतील मंडळीचे अभंग फार गोड आणि प्रेमळ आहेत. चोखोबांच्या अभंगाचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां, ते नुसते साक्षरच नव्हत, तर चांगले बहुश्रुत होते, अशी खात्री झाल्याशिवाय रहात नाहीं. ज्ञानेश्वरी-शींही त्यांचा पुष्कळच परिचय होता हें, त्या ग्रंथांतील कांहीं उपमा त्यांच्या कांहीं अभंगांत जशाच्या तशा सांपडतात, त्यावरून स्पष्ट दिसतें. आतां या सर्व मंडळीचे कांहीं निवडक अभंग येथें देऊन तूर्त त्यांचा निरोप घेऊं.

## चोखामेळा

१

**अनादि निर्मळ वेदाचें जें मूळ । परब्रम्ह सोज्वळ विटेवरी ॥**
**कर दोन्ही कटीं राहिलासे उभा । नीळवर्ण प्रभा फांकतसे ॥**
**आनंदाचा कंद पाउलें साजिरीं । चोखा म्हणे हरि पंढरीये ॥**

२

**गोजिरें साजिरें श्रीमुख चांगलें । ध्यानीं मिरवलें योगियांच्या ॥**
**पंढरी भूवैकुंठ भिवरेच्या तीरीं । वैकुंठींचा हरि उभा विटे ॥**

राही रखुमाई सत्यभामा नारी । पुंडलिकें सहपरिवारीं आणियेला ॥
वैजयंती माळ किरीट कुंडलें । प्रेमें आलिंगिलें चोखियानें ॥

३

ज्या कारणें वेदश्रुति अनुवादती । तो हा रमापति पंढरीये ॥
सुखाचें ठेवणें क्षीरसागरनिवासी । तो हा पंढरीसी उभा विटे ॥
भाविकाकारणें उभवोनिं हात । उदारपणें देत भुक्तिमुक्ति ॥
न पाहे उंच नीच याती कुळ । स्त्री शूद्र चांडाळ सरते पायीं ॥

४

मज तों नवल वाटतसे जीवीं । आपुली पदवी विसरलें ॥
कवणिया सुखा परब्रम्ह भुललें । गुंतोनी राहिलें भक्तभाके ॥
निर्गुण होतें तें सगुण पैं जालें । विसरोनी गेलें आपआपणा ॥
चोखा म्हणे ऐसा कैसा हा नवलाव । देवाधिदेव वेडावला ॥

५

देखिला देखिला योगियांचा रावो । रुक्मादेवीनाहो पंढरीचा ॥
पुंडलीकासाठीं युगें अठ्ठावीस । धरुनि बाळवेष भीमातटीं ॥
गाई गोपाळ वत्सें वैष्णवांचा मेळ । नाचती गोपाळ विठ्ठलछंदें ॥
चोखामेळा तेथें वंदितो चरण । घाली लोटांगण महाद्वारीं ॥

६

न करीं आळस जाय पंढरीसी । अवघी सुखराशी तेथें आहे ॥
पाहतां भिंवरा करीं एक स्नान । घालीं लोटांगण पुंडलीका ॥
कान धरोनि सुखें नाचा महाद्वारीं । तया सुखा सरी दुजी नाहीं ॥
पाहतां श्रीमुख हरे तहानभूक । चोखा म्हणे सुख विठ्ठपायीं ॥

७

भेदाभेदकर्म न कळे त्याचें वर्म । वाउगाचि श्रम वाहतां जगीं ।
नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । पाप ताप नयनीं न पडेचि ॥
वेदाचा अनुभव शास्त्राचा अनुवाद । नामचि गोविंद एक पुरे ॥
चोखा म्हणे मज कांहींच न कळे । विठ्ठलाचें बळें नाम घेतों ॥

८

आम्हा अधिकार उच्छिष्टसेवन । संतांचें पूजन हेंचि बरें ॥
सुलभ सोपारें विठोबाचें नाम । आणिक नाहीं वर्म दुजें कांहीं ॥

आवडीनें नाम गाईन उल्हासें । संतांच्या सहवासें खेळींमेळीं ॥
चोखा म्हणे माझी आवडी ही देवा । पुरवावी केशवा जन्मोजन्मीं ॥

९

आम्हा न कळे ज्ञान न कळे पुराण । वेदाचें वचन न कळे आम्हां ॥
आगमाची आठी निगमाचा भेद । शास्त्रांचा संवाद न कळे आम्हां ॥
योग याग तप अष्टांगसाधन । न कळेचि दान व्रत तप ॥
चोखा म्हणे माझा भोळा भाव देवा । गाईन केशवा नाम तूझें ॥

१०

नामाचें सामर्थ्य विष तें अमृत । ऐसी हे प्रचीत आहे जीवा ॥
तें नाम सोपें विठ्ठल विठ्ठल । नको काळ वेळ जपें आधीं ॥
नेमधर्म कांहीं न लगे साधन । सुखें नारायण जप करीं ॥
चोखा म्हणे मज भरंवसा नामाचा । येणें कळिकाळाचा भेव नाहीं ॥

११

शुद्धभाव शुद्धमती । ऐसें पुराणें वदती ॥ १ ॥
जयासाठीं जपतप । तो हा विश्वाचाचि बाप ॥ २ ॥
नामें पातकी तारिले । जड जीवां उद्धारिलें ॥ ३ ॥
विश्वास दृढ धरा मनीं । चोखा मिठी घाली चरणीं ॥ ४ ॥

१२

अवघा आनंद राम परमानंद । हाचि लागो छंद माझे जीवा ॥ १ ॥
हेंचि साधन निकें जगासि उद्धार । आणिक साचार दुजें नाहीं ॥ २ ॥
काम क्रोधांचे न पडती आघात । वाचे गातां गीत राम नाम ॥ ३ ॥
चोखा म्हणे ऐसा भरंवसा नामाचा । जेथें कळिकाळाचा रीघ नाहीं ४

१३

संतांचा अनुभव संतचि जाणति । येर ते हांसती अभाविक ॥ १ ॥
नामाचा प्रताप प्रल्हादचि जाणें । जन्ममरण येणें खुंटविलें ॥ २ ॥
सेवेचा प्रकार जाणे हनुमंत । तेणें सीताकांत सुखी केला ॥ ३ ॥
सख्यत्वें पूर्णता अर्जुना बाणली । ऐक्यरूपें चाली मिरवली ॥ ४ ॥
चोखा म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । तेथें मी पामर काय वानूं ॥ ५ ॥

१४

नवल पाहीं नवल पाहीं । पाहों जाणे तेणें पाहिलें नाहीं ॥ १ ॥
निर्गुणीं सगुण सगुणीं निर्गुण । दोहींचें कारण तेच ठाईं ॥ २ ॥
चोखा म्हणे पाहतां पाहणें लपालें । हृदयीं बिंबलें हृदयचि ॥ ३ ॥

१५

कर्मातें वाळिलें धर्मातें वाळिलें । सर्व हारपलें जेथिंचें तेथें ॥ १ ॥
विधीतें वाळिलें निषेधा गिळिलें । सर्व हारपलें जेथिंचें तेथें ॥ २ ॥
वेदातें वाळिलें शास्त्रातें वाळिलें । सर्व हारपलें जेथिंचें तेथें ॥ ३ ॥
चोखा म्हणे माझा संदेह फिटला । देहींच भेटला देव आम्हां ॥४॥

१६

देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥
तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥
आकारलें तितुकें नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥ ३ ॥
ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायी । चोखा मेळा जडला पायीं ॥ ४ ॥

१७

कोणी देखियेलें जग । पांडुरंग मी म्हणें ॥ १ ॥
मौन्यें पारुषली वाणी । शब्दखाणी विसरली ॥ २ ॥
एकाआधीं कैचें दोन । मजपासून मी नेणें ॥ ३ ॥
चोखामेळा म्हणती संत । होहि मात उपाधी ॥ ४ ॥

१८

उपजले विटाळीं मेले ते विटाळीं । राहिले विटाळीं तेहि जाती ॥१॥
रडती पडती तेही वेगें मरती । परि नाम न गाती भूलिभ्रमें ॥ २ ॥
काय रे हा देह सुखाचा तयासी । उघडाचि जासी अंतकाळीं ॥ ३ ॥
चोखा म्हणे याचा न धरीं भरंवसा । अंतीं यमफांसा गळां पडे ॥४॥

१९

पंचही भूतांचा एकचि विटाळ । अवघाचि मेळ जगीं नांदे ॥ १ ॥
तेथें तो सोंवळा वोंवळा तो कोण । विटाळाचें कारण देह मूळ ॥२॥
आदिअंतीं अवघा विटाळ संचला । सोवळा तो झाला कोण न कळे ३
चोखा म्हणे मज नवल वाटतें । विटाळापरतें आहे कोण ॥ ४ ॥

२०

नीचाचे संगतीं देवो विटाळला । पाणीयें प्रक्षाळिला सोंवळा केला ॥ १ ॥ मुळींच सोंवळा कोठें तो ओंवळा । पाहतां पाहणें डोळा जयापरी ॥ २ ॥ सोंवळ्याचे ठायीं सोंवळा आहे । वोवळ्या ठायीं वोवळा कां न राहे ॥ ३ ॥ चोखा म्हणे देव दोहींच्या वेगळा । तोचि म्यां देखिला दृष्टीभरी ॥ ४ ॥

२१

वेदासी विटाळ शास्त्रासी विटाळ । पुराणें अमंगळ विटाळाचीं ॥ १ ॥ जीवासी विटाळ शिवासी विटाळ । काया अमंगळ विटाळाची ॥ २ ॥ ब्रम्हीया विटाळ विष्णूसी विटाळ । शंकरा विटाळ अमंगळ ॥ ३ ॥ जन्मतां विटाळ मरतां विटाळ । चोखा म्हणे विटाळ आदि अंतीं ॥ ४ ॥

२२

कोण तो सोंवळा कोण ओंवळा । दोहींच्या वेगळा विठू माझा ॥ १ ॥ कोणासी विटाळ कशाचा जाहला । मुळींचा संचला सोंवळाचि ॥ २ ॥ पापांचा विटाळ एकाचिये अंगा । सोंवळा तो जगामाजी कोण ॥३॥ चोखा म्हणे माझा विठ्ठल सोंवळा । अरूप आगळा विटेवरी ॥ ४ ॥

२३

काळाचा विटाळ जीवशिवा अंगीं । बांधलासे जगीं दृढ गांठीं ॥ १ ॥ विटाळीं विटाळ चौदाही भुवनें । स्थावर जंगम व्यापुनि विटाळचि ॥ २ ॥ दुःखासी विटाळ सुखासी विटाळ । विटाळीं विटाळ वाढलासे ॥ ३ ॥ विटाळाचे अंगीं विटाळाचें फळ । चोखा तो निर्मळ नाम गाय ॥ ४ ॥

२४

बैसोनी निवांत करीन चिंतन । कायावाचामनसहित देवा ॥ १ ॥ नामाचा आठव हेंचि सोपें वर्म । अवघे कर्माकर्म पारुषती ॥ २ ॥

यापरतें साधन आन कांहीं नेणें। अखंड वाचे म्हणे रामकृष्ण ॥३॥ सुलभ हा मंत्र तारक जीवासी। येणें या भवासी उतार होय ॥४॥ चोखा म्हणे मज सांगितलें कानीं। रामकृष्ण वाणी जप सदा ॥५॥

२५

कांहीं तरी अभय न मिळे उत्तर। ऐसे कां निष्ठुर जालां तुम्ही ॥ १ ॥ मी तों कळवळोनी मारितसें हांक। तुम्हा पडे धाक कासयाचा ॥ २ ॥ बोलोनी उत्तरें करीं समाधान। येवढेंचि दान मज द्यावें ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझी पुरवावी आस। न करीं उदास माझे माये ॥ ४ ॥

२६

समर्थासी रंकें शिकवण जैसी। माझी वाणी तैसी बडबड ॥१॥ शुभ हें अशुभ न कळे बोलतां। परी करीं सत्ता लंडपणें ॥ २ ॥ उच्छिष्टाची आशा भुंकतसे श्वान। तैसा मी एक दीन आहें तुमचा ॥ ३ ॥ चोखा म्हणे एका घांसाची चाकरी। करितों मी द्वारीं तुमाचिया ॥ ४ ॥

२७

नाहीं देह शुद्ध याति अमंगळ। अवघे वोंगळ गुणदोष ॥ १ ॥ करूं जातां विचार अवघा अनाचार। आणिक प्रकार काय बोलूं ॥ २ ॥ वाणी नाहीं शुद्ध धड नये वचन। धिःकारिती जन सर्व मज ॥ ३ ॥ अंगसंग कोणी जवळ न बैसे। चोखा म्हणे ऐसें जीवित माझें ॥ ४ ॥

२८

ऊंस डोंगा परी रस नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ १ ॥ कमान डोंगी परी तीर नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥२॥ नदी डोंगी परी जळ नव्हे डोंगें। काय भुललासी वरलिया रंगें ॥ ३ ॥ चोखा डोंगा परी भाव नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ ४ ॥

२९

किती धांवाधांवी करावी कोरडी। न कळे कांहीं जोडी हानि लाभ ॥ १ ॥ जें जें करितों तें तें फलकट। वाउगेचि कष्ट दुःख

भोगीं ॥ २ ॥ निवांत बैसोनी नामाचें चिंतन । करूं जातां मन स्थिर नाहीं ॥ ३ ॥ दान धर्म करूं तों नाहीं धन पदरीं । जन्माचा भिकारी होउनि ठेलों ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसा करंटा मी देवा । काय तुझी सेवा करूं आतां ॥ ५ ॥

३०

अहो पंढरिराया विनवितों तुज । अखंड संतरज लागो मज ॥ १ ॥ नामाची आवडी उच्चार हा कंठीं । करीं कृपादृष्टि मजवरी ॥ २ ॥ पंगतीचें शेष उच्छिष्ट प्रसाद । तेणें सर्व बाध हरे माझा ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा हाचि पैं नवस । पुरवा सावकाश देवराया ॥ ४ ॥

३१

नाशवंतासाठीं करितोसी आटी । दृढ धरा कंठीं एक नाम ॥ १ ॥ भयासी तारक विठ्ठलचि एक । नाहीं आणिक सुख येथें जातां ॥ २ ॥ एक एक योनी कोटि कोटि फेरा । नरदेहीं थारा तईच लाभे ॥ ३ ॥ चोखा म्हणे येथें एकाचि साधन । संतांसी शरण जाई सुखें ॥ ४ ॥

३२

जोहार मायबाप जोहार । तुमच्या महाराचा मी महार ॥ १ ॥
बहु भुकेला जाहलों । तुमच्या उष्ट्यासाठीं आलों ॥ २ ॥
बहु केली आस । तुमच्या दासाचा मी दास ॥ ३ ॥
चोखा म्हणे पाटी । आणिली तुमच्या उष्ट्यासाठीं ॥ ४ ॥

चोखोबांचे सर्वच अभंग इतके सुंदर आहेत कीं त्यांतल्या बऱ्यावाइटाची निवड करण्यास जागाच नाहीं. रचनेचा प्रवाह अगदीं अस्खलित चाललेला असून, विचार मोठे उदात्त आणि भाषाप्रभुत्व तर आश्चर्यकारक आहे. 'विठ्ठलनाम उघडा मंत्र सद्भावें जपा । जपतां जपतां हृदयीं ध्यातां खंडन होय पापा ' अशा चरणांनीं प्रारंभित होणारें चोखोबांचें एक गोड पद माझ्या संग्रहीं असलेल्या एका जुन्या वहींत आहे. परंतु त्यांत बरेच अपपाठ असल्यामुळें, तें येथें उतरून घेतलें नाहीं. हें पद्य गाथ्यांत सांपडत नाहीं, यावरून चोखोबांची बरीच कविता अद्याप अनुपलब्ध असली पाहिजे हें उघड दिसतें.

## चोखोबांची स्त्री सोयराबाई हिचे अभंग.

१

येईं येईं गरुडध्वजा । विटेसहित करीन पूजा ॥ १ ॥
धूप दीप पुष्पमाळा । तुज समर्पूं गोपाळा ॥ २ ॥
पुढें ठेवोनियां पान । वाढी कुटुंबी तें अन्न ॥ ३ ॥
तुम्हा योग्य नव्हे देवा । गोड करूनियां घेवा ॥ ४ ॥
विदुराघरच्या पातळ कण्या । खासी मायबापा धन्या ॥ ५ ॥
द्रौपदीच्या भाजीपाना । तृप्ति झाली नारायणा ॥ ६ ॥
तैसी झाली येथें परी । म्हणे चोख्याची महारी ॥ ७ ॥

२

नाहीं उरली वासना । तुम्हां नारायणा पाहतां ॥ १ ॥
उरला नाहीं भेदाभेद । झालें शुद्ध अंतर ॥ २ ॥
विटाळाचें होतें जाळें । तुटलें बळें नामाच्या ॥ ३ ॥
चौदेहाची तुटली दोरी । म्हणे चोख्याची महारी ॥ ४ ॥

३

देहासी विटाळ म्हणती सकळ । आत्मा तो निर्मळ शुद्धबुद्ध ॥१॥
देहींचा विटाळ देहींच जन्मला । सोंवळा तो झाला कवण धर्म ॥२॥
विटाळावांचोनीं उत्पत्तीचें स्थान । कोण देह निर्माण नाहीं जगीं ॥३॥
म्हणुनी पांडुरंगा वानितसें थोरी । विटाळ देहांतरीं वसतसे ॥ ४ ॥
देहाचा विटाळ देहींच निर्धारीं । म्हणतसे महारी चोखियाची॥५॥

४

हीन दीन म्हणोनी कां गा मोकलिलें । परी म्यां धरिलें पदरीं तुमच्या ॥ १ ॥ आतां मोकलितां नव्हे नीत बरी । थोरा साजे थोरी थोरपणें ॥ २ ॥ शरण आलिया दावितसां पाठी । काय थोर गोष्टी वानूं देवा ॥ ३ ॥ सोयरा म्हणे अहो पंढरीनिवासा । तुमचा तो ठसा त्रिभुवनीं ॥ ४ ॥

५

आजी माझा सर्व पुरला नवस । देखिलें पायांस विठोबाच्या ॥१॥
अनंता जन्माचें फिटलें सांकडें । कोंदाटलें पुढें रूप त्याचें ॥ २ ॥

आठवीत होतें गोमटीं पाउलें । तींचि देखियेलीं विटेवरी ॥ ३ ॥
आनंद न समाय मनाचे अंतरीं । म्हणतसे महारी चोखियाची॥४ ॥

चोखोबा समाधिस्थ झाल्याचें समजतांच त्यांची बहीण निर्मळा ही पंढरपुरास आली. त्यानंतरचें तिचें चरित्र सोयराबाईनें पांच अभंगांत वर्णिलें आहे, तें येणेंप्रमाणें:--

६

चोखा बैसतां समाधीसी । निर्मळा आली पंढरीसी ॥ १ ॥
पाहुनि आनंद सोहळा । म्हणे विठ्ठला दयाळा ॥ २ ॥
चोखा मेळविला रूपीं । माझा आतां कोण गति ॥ ३ ॥
दैव बैसोनी निकटीं । निर्मळेसी सांगे गोष्टी ॥ ४ ॥
ऐसें देखोनियां नयनीं । सोयरा मिठी घाली चरणीं ॥ ५ ॥

७

ऐसा आनंद सोहळा । निर्मळा पाही आपुले डोळां ॥ १ ॥
आनंद न माये गगनीं । वैष्णव नाचती रंगणीं ॥ २ ॥
जेथें नाहीं भेदाभेद । अवघा भरला गोविंद ॥ ३ ॥
तया सुखाची सुखराशी । बोळली ती निर्मळेसी ॥ ४ ॥
सोयरा देखोनि आनंदली । वेळोवेळां विठू न्याहाळी ॥ ५ ॥

८

ऐशा आनंदांत एक मासवरी । राहिली निर्धारीं पंढरीये ॥ १ ॥
नित्य जावोनियां चंद्रभागे स्नान । घाली लोटांगण पुंडलीका ॥२॥
क्षेत्रप्रदक्षिणा नामाच्या गजरीं । येवोनि महाद्वारीं हरि वंदी ॥ ३ ॥
सोयरा म्हणे ऐसा सारोनियां नेम । वाचे गाय नाम विठोबाचें ४

९

चोखा निर्मळ एकरूप । दरुशनें हरे ताप ॥ १ ॥
वाटे विठ्ठल नामछंद । नाहीं भेद उभयतां ॥ २ ॥
तीर्थ उत्तम निर्मळा । वाहे भागीरथी जळा ॥ ३ ॥
ऐसी तारक मेहुणपुरी । म्हणे चोख्याची महारी ॥ ४ ॥

१०

पुसोनी सर्वांसी निर्मळा निघाली । येऊनि पोंचली मेहुणपुरीं ॥१॥
सर्व काळ छंद वाचे नाम गाय । आठवीत आहे चोखियासी ॥२॥

म्हणे विठोबा दयाळा मागणें आहे तुज। तुझा भक्तराज सांभाळीं तूं ॥ ३ ॥ सोयरा म्हणे ऐसा सुखाचा सोहळा। भोगी अवलीळा निमळा ती ॥ ४ ॥

कै. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वतां'तला उतारा मागें दिला आहे त्यांत त्यांनीं निर्मळा ही चोखोबांच्या शेजारीं मंगळवेढें येथेंच रहात असे असें लिहिलें आहे, परंतु वरील अभंगांतील माहितीवरून निर्मळा ही मेहणपुर नामक गांवीं रहात असे हें स्पष्ट दिसतें.

## निर्मळाबाईचे अभंग

१

आनंदें वोविया तुम्हासी गाईन। जीवें भावें वोवाळीन पायांवरी ॥ १ ॥ सुकुमार साजिरीं पाउलें गोजिरीं। ते हे मिरवलीं विटेवरी ॥ २ ॥ कटावरी कर धरोनी श्रीहरि। उभा भीमातीरीं पंढरीये ॥ ३ ॥ महाद्वारीं चोखा तयाची बहीण। घाली लोटांगण उभयतां ४

२

संसाराचें कोण कोड। नाहीं मज त्याची चाड ॥ १ ॥
एका नामींचि विश्वास। दृढ घालोनियां कास ॥ २ ॥
जेथें न चले काळसत्ता। विठोबाचें नाम गातां ॥ ३ ॥
शास्त्रें पुराणें वदती। नाम तारक म्हणती ॥ ४ ॥
निर्मळा म्हणे नाम सार। वेदशास्त्रांचा निर्धार ॥ ५ ॥

३

आजिवरी तुम्ही तयासी पाळिलें। अपराध साहिले चोखियाचे १ तयाचिये पाठीं आमुचा कंटाळा। आला कां दयाळा सांगा मज २ हीन दीन मी तों पातकाची राशी। शरण पायांसी जीवेंभावें ॥३॥ निर्मळा म्हणे तुम्ही तों दयाळ। म्हणोनी सांभाळ करा माझा ४

४

मज नामाची आवडी। संसार केला देशधडी ॥ १ ॥
सांपडलें वर्म सोपें। विठ्ठल नाममंत्र जपें ॥ २ ॥

नाहीं आणीक साधन । सदा गाय नारायण ॥ ३ ॥
निर्मळा म्हणे देवा । छंद येवढा पुरवावा ॥ ४ ॥

५

तिहीं त्रिभुवनीं विस्तारली कीर्ति । तो हा श्रीपति उभा विटे ॥ १ ॥
अनाथाचा नाथ पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ॥ २ ॥
नामधारकाच्या लागेन चरणीं । घेईन पायवणी पोटभरी ॥ ३ ॥
आनंदें निर्भर नाचेन महाद्वारीं । संत अधिकारी तेथींचे जे ॥ ४ ॥
निर्मळा करी प्रेमाची आरती । करोनी श्रीपति ओवाळित ॥ ५ ॥

चोखोबांची कांता सोयरा ही नऊ महिन्यांची गर्भवती असतां, घरांत बाळंतपणाची कांहींच सामग्री नसल्यामुळें, चोखोबा घरांतून पळून, मेहूणपुरास आपल्या बहिणीकडे गेले होते व त्याबद्दल निर्मळेनें त्यांची चांगली कानउघडणी केली होती, असें निर्मळेच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या कांहीं अभंगांवरून समजतें.

## वंका याचे अभंग

१

पांडुरंगावांचोनी दुजा कोण सखा । निर्वाणींचा देखा मायबाप ॥ १ ॥
तारीतसे एका नांवासाठीं जगा । ऐसा हा पैं बा श्रेष्ठाचार ॥ २ ॥
गणिका गजेंद्र यांसी उद्धरिलें । प्रत्यक्ष तारिलें अजामेळा ॥ ३ ॥
वंका म्हणे ऐसा आहे हा भरंवसा । मज तंव सर्वेशा विठोबाचा ४

२

संसारदुःखें पीडिलों दातारा । किती येरझारा जन्ममरण ॥ १ ॥
सोडवीं गा देवा भवाची कांचणी । जातों आडरानीं विषयसंगें ॥ २ ॥
भवाचिया डोहीं बुडतों वेळोवेळां । कां नये कळवळा तुज देवा ॥ ३ ॥
वंका म्हणे तुम्ही जरी मोकलिलें । कवणातें वहिलें शरण जाऊं ॥ ४ ॥

३

नाहीं प्रेमभाव न कळे मान्यता । सलगी बोलतां सुख वाटे ॥ १ ॥
अखंड नामावळी गाइन वेळोवेळीं । नित्य ती दिवाळी आम्हां घरीं २
संतसमागम वैष्णवांचा हाट । पंढरीये पेठ दुमदुमली ॥ ३ ॥
वंका म्हणे सुख तयाचे संगतीं । बैसेन पंगती हरिदासा ॥ ४ ॥

नामदेवांसाठीं देव दूध प्याला, मिराबाईचा विषाचा पेला देवानें पिऊन टाकला; जनीबरोबर देव दळण कांडण करीत असे, चोखामेळ्याचीं ढोरें देवानें ओढलीं वगैरे गोष्टींचा उल्लेख वंकाच्या अभंगांत सांपडतो; इतकेंच नव्हे तर सेना न्हावी, सजण कसाई, नरसी मेहता यांच्याही कथा त्यानें वर्णिल्या आहेत ! ज्ञानदेव, नामदेवादि संतांनंतर १००।१५० वर्षांनीं होऊन गेलेल्या सेना न्हाव्याचा आणि नरसी मेहत्याचा उल्लेख, ज्ञानदेव–समकालीन वंकाच्या अभंगांत कसा व्हावा, हें एक मोठें कोडेंच आहे. जनीच्या अभंगांत एकनाथांचा उल्लेख सांपडतो ! अशा स्थितींत, या कालविपयासाचें निराकरण करावयाचें तरी कसें ? पुष्कळ वर्षांच्या अवलोकनानें आणि विचारानें माझी तर अशी ठाम समजूत झालेली आहे कीं, इसवी सनाच्या तेराव्या शतकांत होऊन गेलेल्या ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, नामदेव, नारा, महादा, गोंदा, विठा, राजाई, गोणाई, परिसा भागवत, गोराकुंभार, सांवता मांळी, विसोबा खेचर, चोखामेळा, कान्होपात्रा, सोयराबाई, निर्मळा, वंका, जनाबाई, जोगा परमानंद, जगमित्र नागा वगैरे संतांचे जे अभंग हल्लीं उपलब्ध आहेत त्यांत प्रक्षिप्त अभंगांचा भरणा फारच मोठा असला पाहिजे. अशी शंका घेण्यास दुसरें एक बलवत्तर कारण आहे तें हें कीं या जुन्या संतांच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या या हजारों अभंगांची भाषा तुकारामबुवांच्या भाषेपेक्षांही अर्वाचीन आहे. ज्ञानेश्वरींत न सांपडणारे अनेक उर्दू शब्द या अभंगांत सांपडतात, पण ज्ञानेश्वरींतले जुने मराठी शब्द मात्र त्यांत मुळींच सांपडत नाहींत. यामुळें या अभंगांच्या कर्तृत्वाविषयीं मन अतिशय साशंक होतें व दुसऱ्याच एखाद्या मनुष्यानें या संतांच्या नांवावर घुसडून दिलेले अभंग, त्यांचेच म्हणून वाचकांना सादर करण्यांत आपल्या हातून कांहीं वंचना तर होत नसेल ना अशीही रुखरुख मनाला लागून राहते. असो.

वंका महार याचा मृत्यु शालिवाहन शके १२४० कालयुक्त नाम संवत्सर, माघ शुद्ध पौर्णिमा रोजीं झाला, असें चोखोबांनीं आपल्या एका अभंगांत म्हटलें असल्याचें कै. श्रीपतिबुवा भिंगारकर यांनीं ‘ श्रीज्ञानेश्वर महाराजांचा कालनिर्णय ’ या आपल्या निबंधांत लिहिलें आहे.

वंकाच्या कांहीं अभंगांत चोखोबांच्या चरित्राचा कांहीं भाग आला आहे तो येणें-प्रमाणें:—चोखोबांस पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांची पत्नी सोयराबाई ही आपणास पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून पांडुरंगांची नेहमीं प्रार्थना करीत असे. एके दिवशीं वृद्ध ब्राह्म-

णाचें रूप धारण करून पांडुरंग तिच्या घरीं आला व घर कोणाचें, घरांत मुलें बाळें किती आहेत वगैरे चौकशी करूं लागला. तेव्हां सोयराबाईनें त्याला सांगितलें कीं,—

**म्हणे घरधन्यासी विठोबाचा छंद ।**
**आठविती गोविंद रात्रंदिवस ॥**
**संसारीं सुख नाहीं अणुमात्र ।**
**सदा अहोरात्र हायहाय ॥**
**पोटींही संतान न देखेंचि कांहीं ।**
**वायां जन्म पाहीं झाला माझा ॥**

मग पांडुरंग तिला म्हणाला, "बाई, मी एक प्रवासी आहें, मला फार भूक लागली आहे. जर कांहीं फराळाचें देशील तर खाऊन घोंटभर पाणी पिईन." हें ऐकून सोयराबाईनें त्यास सांगितलें, "महाराज, आम्ही महार आहोंत. आमच्या घरचें अन्न तुम्हास कसें चालेल?" वृद्ध विप्रवेषधारी पांडुरंग तिला म्हणाला, "बाई, तुमची जात कोणतीही असो, त्याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. मला कांहीं तरी खायाला दे म्हणजे झालें. मी भुकेनें अगदीं व्याकुळ झालों आहें." ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून विचारी सोयराबाई मोठ्या विचारांत पडली. या ब्राह्मणाला आपण अन्न द्यावें तर, ब्राम्हणाला बाटविलें म्हणून लोक आपणास मारतील, न द्यावें तर ब्राम्हण विन्मुख होऊन परत जातो! मग तिनें भटजींना नमस्कार करून म्हटलें, "महाराज, तुम्ही ब्राम्हण, आम्ही महार; आमच्या घरचें अन्न जर मी तुम्हास दिलें तर लोक आम्हाला मारहाण करतील." ब्राम्हण म्हणाला, "पुढें काय होईल तें पाहूं. तूं अगोदर मला अन्न दे." निरुपाय होऊन सोयराबाई घरांत गेली आणि वाटीभर दहींभात आणून तिनें तो ब्राह्मणापुढें ठेविला. पांडुरंगानें तो भात मोठ्या अधाशीपणानें खाल्ला. मग तो सोयराबाईस म्हणाला, "बोल, तुला मी आतां काय देऊं?" तिनें सांगितलें, "आपलें उच्छिष्ट प्रसाद म्हणून मला द्या म्हणजे झालें." पांडुरंग म्हणाला, "ठीक आहे. हें घे. हीं उरलेलीं भाताचीं शितें तूं खा म्हणजे तुला पुत्र होईल." हें ऐकून सोयराबाईस मोठा आनंद झाला. तिनें ब्राम्हणाचें तें उच्छिष्ट अन्न मोठ्या भक्तिभावानें ग्रहण केलें. ब्राम्हण पूर्वींच निघून गेला होता. कांहीं वेळानें चोखोबा घरीं आले तेव्हां सोयराबाईनें घडलेली हकीकत त्यांस सांगितली. ती ऐकून चोखोबा तिला रागें भरले. ते म्हणाले, "वेडे, तूं हें काय केलेंस? आपण बोलून चालून महार, आपल्याकडचें अन्न तूं ब्राम्हणाला दिलेंस, ही

तुझ्या हातून अगदीं अनुचित गोष्ट घडली. " असो. पुढें, पांडुरंगाच्या कृपेनें सोयरा-बाई गर्भवती झाली व नऊ महिने भरतांच पुत्र प्रसवली, त्याचें नांव कर्ममेळा.

## कर्ममेळाचे अभंग

१

चोख्यासाठीं देवें बहु नवल केलें । तयांचें खादलें भात दहीं ॥ १ ॥
म्हणोनि ब्राह्मणें बांधविला चोखा । सोडविलें देखा तुम्ही त्यासी २
तयाचिया मागें आमुचा सांभाळ । कैसा तूं दयाळ करितोसी ॥३॥
कर्ममेळा म्हणे पंढरिरायातें । आतां आहे आमुतें कोण सांगा ॥४॥

२

आणिक वासना नाहीं दुजी मना । संतचरणीं जाणा मस्तक हें ॥१॥
घालिन लोटांगण वंदिन पायधुळी । पूर्वकर्मा होळी होय तेणें ॥२॥
नामाची आवडी सर्वकाळ वाचे । दुजें साधनाचि नेणें कांहीं ॥ ३ ॥
कर्ममेळा म्हणे ही माझी वासना । पुरवा नारायणा सर्वभावें ॥ ४ ॥

३

आहेसी ठाउका मागां संतजनां । रिणाईत जाणा बहुतांचा ॥ १ ॥
घेणें ज्याचें त्यास देणें नाहीं हरि । ऐसी हे परी जाणतसों ॥ २ ॥
साजतसे तुम्हा थोर थोरपण । आमुचें कारण आम्हीं जाणों ॥३॥
कर्ममेळा म्हणे पंढरीनिवासा । आपुला तो ठसा सांभाळावा ॥ ४ ॥

४

बहु अपराध घडले मजसी । म्हणोनी तुम्हासी पडली तुटी ॥ १ ॥
आमुचें संचित जैसें जैसें आहे । तैसें तैसें होय आपेंआप ॥ २ ॥
तुम्हासी हो बोल नाहीं नारायणा।आमुच्या आचरणा ग्वाही तुम्ही३
कर्ममेळा म्हणे तुम्हासी बोल । वायां काय फोल वेंचूं देवा ॥ ४ ॥

५

न कळे न कळे तुमचें महिमान । सलगी पायीं जाण करितसें ॥१॥
कमाविलें जेणें तेंचि देईं मज । येवढेंचि काज माझें आहे ॥ २ ॥
जाणीव शाहणीव नको भरोवरी । नेणतें मी हरी पोसणें तुमचें ३
कर्ममेळा म्हणे जीवींची निजखूण । दाखवा चरण तुमचे देवा ॥४॥

महीपतीनीं आपल्या **भक्तविजया**च्या २३ व्या अध्यायांत चोखोबांचें चरित्र दिलें आहे त्यांत ते म्हणतात, "पंढरिनाथानें चोखोबांस देवळांत नेल्यामुळें ब्राह्मण चोखोबावर फार रागावले व 'तूं गांवात राहूं नकोस; चंद्रभागेच्या पलीकडे जाऊन रहा,' अशी त्यांनी त्यांस आज्ञा केली. तेव्हां चोखोबांनीं पैलतीरीं, पांडुरंगाच्या मंदिरासमोर एक दीपमाळ बांधली व तेथें वस्ती केली. ही दीपमाळ अद्याप तेथें आहे असें सांगतात. एके दिवशीं, निंबाच्या झाडाखालीं बसून पांडुरंग चोखोबांबरोबर जेवीत असतां तेथें एक पुजारी आला. त्यानें जेव्हां तो प्रकार पाहिला तेव्हां त्याला मोठें आश्चर्य वाटलें. निंबाच्या झाडावर कावळे बसले होते त्यांनीं खालीं निंबोळ्या टाकल्या. तेव्हां चोखोबा त्यांस म्हणाले, "अरे कावळ्यांनों, येथें पांडुरंग जेवीत आहे, त्याच्या अंगावर निंबोळ्या पाडून त्याला त्रास देऊं नका." सोयराबाई वाढीत होती. दहीं वाढतांना तिच्या हातांतलें भांडें खालीं पडून पांडुरंगाचा पीतांबर दह्यानें भरला. तेव्हां चोखोबा तिलाही रागें भरले. पुजाऱ्यास वाटलें कीं चोखोबा व्यंगोक्तीनें आपलाच उपहास करीत आहेत! मग त्यानें अकस्मात् जाऊन चोखोबांच्या एक थोबाडींत दिली आणि गांवाकडे धूम ठोकली! चंद्रभागेंत आंघोळ करून तो जेव्हां देवळांत गेला तेव्हां पांडुरंगमूर्तीचा पीतांबर दह्यानें भरलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्यानें देवाच्या तोंडाकडे पाहिलें तों त्याचा एक गाल सुजला असून त्याचे डोळे पाण्यानें भरून आलेले आहेत असें त्याला दिसलें. चोखोबास आपण शिक्षा केली तिचें हें प्रत्यक्ष चिन्ह भगवंतानें आपणास दाखविलें असें मनांत येऊन पुजाऱ्याला मोठा पश्चात्ताप झाला. मग तो पैलतीरीं गेला आणि चोखोबांस म्हणाला,

**नेणतां भक्तीचें महिमान। म्यां व्यर्थचि केलें तुझें छलन।**
**जेवीं अमूल्य हिऱ्यासी मारूनि घण। आणिला शीण आपणासी॥**
**तुज मी शिक्षा केली येथें। तों राउळीं शिणले पंढरिनाथ।**
**गाल सुजला देखोनि मनांत। भयभीत मी जाहलों॥**
**तरी आतां निज भक्तराया। सत्वर चलावें त्या ठाया।**
**कांहीं उपचार करूनियां। पंढरीराया तोषवावें॥**

इतकें बोलून व चोखोबांस हातीं धरून तो त्यांसह देवळांत आला. पांडुरंगमूर्ति दृष्टीस पडतांच चोखोबांनीं त्याला मोठ्या प्रेमानें आलिंगिलें. त्याबरोबर देवाच्या गालावरची सूज नाहींशी झाली. तेव्हांपासून ब्राह्मणांनीं चोखोबांस देवळांत येऊन पांडुरंगाचें दर्शन घेण्याची सदर परवानगी दिली.

## सांवता माळी

**जें सांवता करुनि दे उदर श्रीमंदिरा भवन माळी ।**
**त्यांत प्रेमें वसवुनि मानि श्रीमंदिराभ वनमाळी ॥**

—सन्मणिमाला, मोरोपंत

या प्रसिद्ध सत्पुरुषाची कथा महीपतिकृत 'भक्तविजय' ग्रंथाच्या १६ व्या अध्यायांत आली आहे. पंढरपुरापासून कांहीं कोसांवर अरणभेंडी नामक गांव आहे तेथें सांवता माळी हे रहात असत. ते पांडुरंगाचे निस्सीम उपासक होते. एकदां, ज्ञानदेव आणि नामदेव यांस बरोबर घेऊन पांडुरंग लहूळ येथें कूर्मदासाच्या भेटीस चालला असतां, वाटेंत सांवता माळी यांचा अरणभेंडी हा गांव लागला. तेव्हां, " तुम्ही येथेंच बसा, मी सांवत्यास भेटून येतों, " असें ज्ञानदेव व नामदेव यांस सांगून पांडुरंग सांवत्यांकडे गेला व त्यांस म्हणाला, " सांवत्या, मला आधीं कोठें तरी लपव. ते पहा दोन चोर माझ्या मागें लागले आहेत. चल आटोप. " सांवत्यानीं खुरपें घेऊन एकदम आपलें पोट चिरलें व पांडुरंगास आंत घालून वर उपरणें गुंडाळलें. येवढा मोठा पांडुरंग सांवत्यांच्या पोटांत कसा मावला अशी शंका कोणी घेईल तर तिचें निराकारण महीपति करितातः—

**कृष्णावतारीं यशोदा सुंदरी । घुसळीत होती निज मंदिरीं ।**
**तेव्हां डेरियांत रिघोनि श्रीहरि । नवनीत झडकरी खातसे ॥**
**कीं एक गोपी प्रेमें भुलोन । म्हणे विकावयासी आणिला कृष्ण ।**
**तेंचि सत्य करावया वचन । देव मडक्यांत सांठवला ॥**

शिवाय, विश्वरूप धारण करणाऱ्या भगवंतास सूक्ष्म रूप धारण करणें काय अशक्य आहे ? असो. अशा रीतीनें पांडुरंग सांवत्यांचा उदरांत गडप होऊन बसला असतां, देव अद्याप परत कसा येत नाहीं, अशा काळजींत नामदेव पडले व पांडुरंगाचा शोध करीत इकडे तिकडे फिरूं लागले. इतक्यांत, मळ्यांत बसलेले सांवता माळी त्यांच्या दृष्टीस पडले. सांवता ब्रह्मानंदांत अगदीं तल्लीन झालेले पाहून, याजपाशींच पांडुरंग असला पाहिजे असें नामदेवास वाटलें. मग त्यांनीं, " माझी आणि पांडुरंगाची भेट करून दे ' अशी विनंति सांवता माळी यांस केली. नामदेवांचा शब्द ऐकून, त्यांना भेटण्याची उत्कंठा देवासही लागून राहिली होती. सांवत्यांनीं त्याला बाहेर काढतांच त्यानें

नामदेवांस मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर ती सर्व मंडळी, लहूळ येथें कूर्मदास नामक सत्पुरुष रहात असत त्यांच्या भेटीस निघून गेली. सांवतामाळी यांचा उल्लेख निवृत्तिनाथांच्या अभंगांत कांहीं ठिकाणीं आला आहे. सांवत्याच्या समाधिकालाविषयीं पुढील अभंग प्रसिद्ध आहे:

**उठोनि प्रातःकाळीं करूनियां स्नान । घालुनी आसन यथाविधि ॥ १ ॥ नवज्वरें देह झालासे संतप्त । परि मनीं आर्त विठोबाची ॥ २ ॥ प्राणायाम करुनी कुंभक साधिला । वायु निरोधिला मूळतत्त्वीं ॥ ३ ॥ बारा शतें सतरा शालिवाहन शक । मन्मथ नामक संवत्सर ॥ ४ ॥ ऋतु ग्रीष्म कृष्ण आषाढ चतुर्दशी । आला उदयासी सहस्रकर ॥ ५ ॥ सांवता पांडुरंगस्वरूपीं मिनला । देह समर्पिला,ज्याचा त्यासी ॥ ६ ॥**

शके १२१७ मन्मथ नाम संवत्सर, ग्रीष्म ऋतु, आषाढ कृष्ण १४ या दिवशीं सांवता माळी यांनीं वैकुंठीं प्रयाण केलें. त्यांचे थोडेसे अभंग गाथ्यांत छापले आहेत ते फार प्रेमळ आहेत. खालील अभंग पहा:—

१

**कांदा मुळा भाजी । अवघी विठाबाई माझी ॥ १ ॥**
**लसूण मिरच्या कोंथिंबिरी । अवघा झाला माझा हरी ॥ २ ॥**
**मोट नाडा विहीर दोरी । अवघी व्यापिली पंढरी ॥ ३ ॥**
**सांवता म्हणे केला मळा । विठ्ठलपायीं गोंविला गळा ॥ ४ ॥**

२

**नको तुझें ज्ञान नको तुझा मान । माझें आहे मन वेगळेंचि ॥ १ ॥**
**नको तुझी भुक्ति नको तुझी मुक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच २**
**चरणीं ठेवुनि माथा विनवितसे सांवता । ऐकौ पंढरिनाथा विज्ञापना ३**

३

**भली केली हीन याती । नाहीं वाढली महंती ॥ १ ॥**
**जरी असता ब्राम्हण जन्म । तरि हें अंगीं लागतें कर्म ॥ २ ॥**
**स्नान नाहीं संध्या नाहीं । याति कुळ संबंध नाहीं ॥ ३ ॥**
**सांवता म्हणे हीन याती । कृपा करावी श्रीपती ॥ ४ ॥**

४

**विकासला नयन स्फुरण आलें बाहीं । दाटलें हृदयीं करुणाभरितें १**
**जातां मार्गीं भक्त सांवता तो माळी । आला तयाजवळी पांडुरंग ॥२॥**
**नामा ज्ञानदेव राहिले बाहेरी । मळियाभीतरीं गेला देव ॥ ३ ॥**
**माथां ठेवुनि हात केला सावधान । दिलें आलिंगन चहूं भुजीं ॥४॥**
**चरणीं ठेवुनि माथा विनवितो सांवता । बैसा पंढरिनाथा करिन पूजा**

सावंतामाळी यांचे अभंग काशिबा गुरव नामक मनुष्य लिहून ठेवीत असे असें महीपतींनीं आपल्या भक्तविजयांत म्हटलें आहे असो.

येथपर्यंत, नामदेवांच्या समकालीन संतांपैकीं बहुतेक प्रमुख संतांची थोडक्यांत माहिती दिली. यांशिवाय राका कुंभार, साळ्या रसाळ, भानुदास, कान्हो पाठक, वछरा, कूर्मदास, आसंद, सुदामा वगैरे अनेक संत त्या कालीं होऊन गेले. त्यांपैकीं राका कुंभाराची एक कथा नामदेवचरित्रांत पूर्वीं आलीच आहे. त्याची अधिक माहिती कोणास पाहिजे असल्यास भक्तविजय ग्रंथाचा १७ वा अध्याय पहावा. कूर्मदासांची माहिती त्याच ग्रंथांच्या १६ व्या अध्यायांत सांपडेल. साळ्या रसाळ यांचा 'रसाळ रामायण' नामक ग्रंथ आहे, परंतु तो प्रसिद्ध झालेला नाहीं. नामदेवांचे समकालीन भानुदास हे एकनाथांचे प्रपितामह जे पैठणकर भानुदास त्यांहून निराळे. यांची कथा चिद्‌घन स्वामीकृत 'भक्तकथामृतसार' ग्रंथाच्या १३ व्या अध्यायांत दिली आहे. कान्हो पाठक हे पुणें जिल्ह्यांतील केंदूर गांवचे रहिवासी. वछरा, आसंद व सुदामा या तिघांविषयीं कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. वछरा यांचे कांहीं अभंग मात्र प्रसिद्ध आहेत. नमुना पहाः—

**शरीर विनटलें सेवे तुझे । ध्यानीं रंगलें मन माझें ॥ १ ॥**
**शिर विकलें चरणासी । वाचा तुझीया नामासी ॥ २ ॥**
**ऐकें पंढरपुरवासी । नयन तुझीया रूपासी ॥ ३ ॥**
**परिचर्या दंडपाणी । देह लोटीं ये धरणीं ॥ ४ ॥**
**श्रवणीं कीर्तन गोविंदा । तुळशी घ्राण मकरंदा ॥ ५ ॥**
**चरणीं जेउतें चालणें । तेउतीं भेटी नारायणें ॥ ६ ॥**
**वत्सरा म्हणे संतसंगीं । कांहिंच नुरे पापालागीं ॥ ७ ॥**

**श्रीकृष्णार्पणमस्तु.**

# पुरवणी

प्रस्तुत ग्रंथ छापून बहुतेक पुरा होत आला इतक्यांत, पुणें येथील **भारत इतिहास संशोधक** मंडळाच्या त्रैमासिकाचे ६ व्या वर्षाचे चार अंक एकदम हातीं आले. त्यांत, रा. ' पांडुरंगशर्मा ' नामक संशोधकांचा ' वारकऱ्यांच्या वसाहती ' हा महत्त्वाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखांत, रा. पांडुरंग शर्मा यांनीं पंजाबांत ' घोमान ' येथें असलेल्या नामदेवी संप्रदायाची जी माहिती दिली आहे ती अपूर्व असून फार मनोरंजक आहे. वरील घोमान गांवींच नामदेवांनीं समाधि घेतली व तेथें ते १८ वर्षें राहिले होते असें तिकडील नामदेव सांप्रदायी लोकांचें म्हणणें असून नामदेवचरित्रावर हिंदींत लिहिलेला एक ग्रंथही त्यांच्या संग्रहीं आहे. या ग्रंथांत दिलेल्या नामदेवचरित्रविषयक कांहीं कथा, महीपतीनीं लिहिलेल्या नामदेवचरित्रांतील कथांशीं जुळतात, पण कांहीं जुळत नाहींत. ज्ञानदेवमहाराजांबरोबर नामदेव हे उत्तरेकडे तीर्थयात्रेस गेले होते त्या वेळीं पंजाबांत त्यांनीं आपल्या उपदेशाचा प्रसार केला. त्यांचा तेथें पुरस्कर करणारे बहोरदास, जयदेव, जाल्होन व लद्धा हे चार पंजाबी होते, त्यांपैकीं जाल्होन यास नामदेवांनीं आपल्याबरोबर पंढरीस आणून भक्तीच्या विद्यापीठांत प्रेमवृत्तीचें जिवंत शिक्षण देऊन त्याला परत पंजाबांत पाठविलें. उलट 'केशव' नामक एका महाराष्ट्रीयास नामदेवांनीं पंजाबांत ठेविलें होतें. घोमान येथें असलेल्या ज्या ग्रंथाचा वर उल्लेख केला त्याचें नांव ' जन्मसाखी ' असें आहे. यासंबंधानें विशेष खुलासेवार माहिती कोणास पाहिजे असेल तर त्यानें रा. पांडुरंग शर्मा यांचा मूळ लेख वाचावा.



